# महात्मा जोतीराव फुले ह्यांचे चरित्र

लेखक

संतसेवक पांडुरंग बाळाजी कवडे

नांदगाव (जि. नासिक)

( श्रीसंत गाडगेमहाराज, संतश्रेष्ठ तुकाराममहाराज, श्रीक्षेत्र शिर्डीचे महान् संत श्रीसाईमहाराज व श्रीछत्रपती शिवाजी महाराज वगैरे चरित्रांचे लेखक )



प्रथमावृत्ती १९६८) ( किं. २ रु.

प्रकाशक :

रंगनाथ त्र्यंबक रत्नपारखी
नांदगाव, जि. नासिक.

वासुदेव भालचंद्र पटवर्धन
नांदगाव, जि. नासिक.

संतसेवक पांडुरंग बाळाजी कवडे
नांदगाव, जि. नासिक.

प्रथमावृत्ती ता. २४ फेब्रुवारी १९६८.

मुद्रक:

सौ. व. द. पोतनीस,
यशवंत प्रिंटींग प्रेस, नासिक.

# निवेदन

**'तुका म्हणे नाही चालत तातडी। प्राप्त काळ घडी आल्याविन ।।**

प्रातःस्मरणीय पुण्यश्लोक श्री छत्रपती शिवाजी महाराज यांच्या चरित्राच्या दोन्ही आवृत्तींचे प्रकाशन नामदार यशवंतराव चव्हाणसाहेब यांच्या हस्ते झाले. त्यानंतर म. फुले यांच्या चरित्रासंबंधी त्यांनी सूचना केली. त्यामुळे चरित्र लिहिण्यास सुरवात झाली. परंतु म्हातारपण व प्रकृती यामुळे बराच काळ निघून गेला.

माझे स्नेही रंगनाथराव त्र्यंबकराव रत्नपारखी ऑ. मॅजिस्ट्रेट व वासुदेवराव भालचंद्र पटवर्धन, नांदगाव यांनी माझ्यामागे नेट लावला. हे दोघेहि प्रागतिक विचाराचे खरे ब्राह्मण आहेत. त्यांनी आग्रह धरला की," महात्मा फुले हे युगपुरुष आहेत. त्यांचे चरित्र हे सर्व समाजास खरे मार्गदर्शक असे आहे." त्यांच्या आग्रहामुळे चरित्र पुढे लिहिण्यास सुरवात केली.

म. फुले यांच्या इंग्रजी चरित्राचे सुप्रसिद्ध लेखक श्री. धनंजयराव कीर, मुंबई यांची भेट घेतली. त्यांच्याकडून मार्गदर्शन मिळाले. माझे शिक्षण फक्त प्राथमिक, त्यामुळे त्यांच्या सर्वांगसुंदर व माहितीपूर्ण अशा इंग्रजी चरित्राचा मला पाहिजे तसा लाभ घेता आला नाही. महात्मा फुले यांचे जुने चरित्रकार खासदार पंढरी सीताराम पाटील, चिखली, (जि.—बुलढाणा) यांच्या भेटीचाहि उपयोग झाला. प्रा. नलिनी पंडित, एम्. ए. मुंबई यांच्याशी चरित्रासंबंधी चर्चा केली. म. फुले यांच्या कार्यासंबंधी त्यांनी माहिती दिली.

नांदगावचे श्री. व्ही. व्ही धोंगडे, बी. ए., एलएल्. बी. बी., टी. यांचे साह्य लाभले. श्री. सुधाकरराव पुंडलिक पवार, एम. ए., बी. एड्. नासिक यांची बहुमोल अशी मदत झाली. चरित्र वेळेवर प्रकाशित होण्यास त्यांचे खरे साह्य झाले. श्री. द. स. झोडगे, संपादक, गावगाडा मासिक, पुणे यांनी महात्मा फुले यांची जन्मतारीख देऊन उपकृत केले.

वेदशास्त्रसंपन्न काशीनाथ गणेश पटवर्धन, नासिक यांना स्वातंत्र्यवीर सावरकर यांचा प्रत्यक्ष सहवास घडला होता. ते सांगत," स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणत, म. फुले यांचे समाजसुधारणेचे ध्येय हे खरे राष्ट्रकार्य आहे."

वे. शा. सं. श्री. पटवर्धन यांना वयाच्या पंच्याऐंशीव्या वर्षी नुकताच एक महिन्यापूर्वी स्वर्गवास घडला. त्यांनी चरित्राच्या कार्यास सक्रिय मदत केली. ते स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्याप्रमाणे राष्ट्रीय विचारांचे सुधारक होते.

म. फुले यांचे वंशज श्री. विश्वनाथ महादेव फुले, पुणे यांची समक्ष भेट झाली. त्यांचाहि चरित्राच्या कामी लाभ घडला.

सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक प्रा. न. र. फाटक, मुंबई यांनी आमच्या मागील पुस्तकास प्रस्तावना दिली त्याप्रमाणे याहि पुस्तकास देऊन उपकृत केले. देशभक्त द. शं. तथा दादासाहेब पोतनीस, नासिक यांनी आपल्या उदारवृत्तीस अनुसरून आमच्या मागील प्रकाशनास साह्य केले; तद्वत या पुस्तकाच्या कामी विशेष अशी मदत केली हे त्यांचे ऋण आहे.

कै. रा. ब. नारायणराव सोपानराव बोरावके यांनी आम्हांस याकामी विशेष साह्य केले. या कामाची पूर्तता त्यांना पाहता आली नाही हे समाजाचे दुर्दैव होय.

दि सासवड माळी शुगर फॅक्टरीचे संचालक मंडळ व माळीनगर येथील म. फुलेप्रेमी अशा अनेक स्त्री–पुरुषांनी या चरित्रप्रकाशनाच्या कामी उदार साह्य केले.

श्री. लिंगराज गंगाधर एक्कुंडी व त्यांच्या धर्मपत्नी सौ. सुनीतीबाईसाहेब एक्कुंडी, पुणे यांनी मदत केली. चरित्र प्रकाशित होण्यास त्यांचे खरे साह्य झाले. समाजभूषण डॉ. जी. एम्. भोसले, जे. पी. व त्यांच्या धर्मपत्नी सौ. डॉ. शकुंतलाबाई भोसले, मुंबई. दानवीर श्रीमान् शामराव सीतारामजी चव्हाण, मुंबई, श्री. राजाराम जी. पाटील व त्यांच्या धर्मपत्नी सौ. विमलाबाई पाटील, नासिक यांची बहुमोल मदत झाली.

ज्या दयाघन प्रभोच्या कृपेने म. फुले यांची अल्पशी सेवा जनता जनार्दनासमोर मांडता आली त्याला अनन्यभावे शरण जाऊन ज्या अनेकांनी साह्य केले त्यांचे ऋण मानतो.

नांदगाव
ता. २४ फेब्रुवारी १९६८

संतसेवक
**पांडुरंग बाळाजी कवडे**
नांदगाव

# प्रास्ताविक

इसवीसनाचे एकोणिसावे शतक हे अर्वाचीन (ब्रिटीश राज्यकालीन) महाराष्ट्राचे एक विविध क्षेत्रातील नेतृत्वाच्या दृष्टीने मोठे भाग्याचे शतक समजावे लागते. विविध क्षेत्रांपैकी सामाजिक व राजकीय क्षेत्रातील पुढारी आपल्या कर्तृत्वाने इतिहासात सदैव चमकणारे आहेत. सहज त्यांचे स्मरण करू गेल्यास लोकहितवादींपासून तो लोकमान्य टिळकांपर्यंत कितीतरी जणांची नावे जनतेच्या उद्धाराचे पाईक या नात्याने डोळ्यांपुढून जातात. लोकहितवादी (गोपाळ हरी देशमुख) यांनी कालगतीची नवी दिशा विनचूक दाखवून त्याला शोभेशा नव्या विचारांचा प्रसार आरंभला. नवे विचार आणि जन्या मताच्या लोकप्रियतेचे साहचर्य कधीच असत नाही. नव्या विचारांच्या पुरस्कर्त्यांना लोकांचा धिक्कारच सहन करावा लागतो. कालांतराने धिक्कार मागासतो व त्याची जागा सत्कार घेतो. मात्र नव्या विचारांच्या पुरस्कर्त्यांचा आत्मविश्वास धिक्काराच्या तडाख्याने न हादरणारा पाहिजे. अशा नव्या विचारांच्या प्रवर्तकामध्ये जोतीबा गोविंदराव फुले या महात्माभिधानांच्या पुरुषाची गणना केली जावी, हे त्याच्या कामगिरीकडे पाहता अतिशय उचित असल्याचे कोणीहि कबूल करील. त्यांची कीर्ती ही आज एक शक्ती झालेली आहे.

म. फुले यांची आजवर अनेक चरित्रे लिहिली गेली. आता श्री. पांडुरंग बाळाजी कवडे यांनी मराठीत विस्तृत चरित्र निर्माण केले आहे. त्याची विस्तीर्णता सामान्य जनतेला फुले यांच्या कर्तृत्वाची भूमिका समजावून देणाऱ्या मजकुराने साधलेली आहे. बराचसा भाग श्रद्धेच्या अतिशयाने उद्भवणाऱ्या अतिरंजनासारखा वाटेल. परंतु 'भिन्नरुचिर्हि लोकः' या सुभाषिताने या प्रकाराचे समर्थन करणे शक्य आहे. म. फुले यांच्या जीवनात त्यांचे वर्णनपर अवश्य असे प्रसंग थोडेच आहेत. ज्या लोकस्थितीत हे प्रसंग घडले त्या लोकस्थितीचा भरपूर परिचय करून दिला नाही तर त्या प्रसंगाचे रहस्य सामान्य वाचकाला आकलन होणार नाही अशी श्री. कवडे यांची समजूत असल्याने

त्यांनी ती लोकस्थिती जागजागी सविस्तर चितारून काढली आहे. म. फुले यांच्या योग्यतेच्या तुलनेत ज्या प्राचीन महापुरुषांची नावे आलेली आहेत, ती कुणाकुणाला म. फुले यांच्याविषयीच्या लेखकाच्या श्रद्धातिरेकाची दर्शक वाटली तरी श्रद्धेला मर्यादा नसते हे ध्यानात ठेवून या प्रकाराचा विचार करणे चांगले.

देवाच्या भक्तीपुरता महाराष्ट्रातील साधुसंत सामाजिक समतेचा उपदेश करणारे होते. तो उपदेश सर्वांगीण, सामाजिक व्यवहाराला व्यापणार नव्हता. इंग्रजी राज्याने व शिकवणीने त्या उपदेशाला अडवून धरणारी देवाच्या भक्तीची अटक ओलांडण्याचा उत्साह व आवेश ज्या शंभर वर्षांपूर्वी, विचारवंतांमध्ये उत्पन्न केला त्यामध्ये म. जोतीबा हे अग्रगण्य ठरतात. त्यांनी सामाजिक समतेची प्रत्यक्ष कृती केली. महारांची शाळा त्यांनी स्थापन केली हे तेंव्हाच्या परिस्थितीकडे पाहता अद्भुत वाटण्यासारखे कृत्य होते. जातपात न मानणाऱ्या खिरस्ती इंग्रजी राज्यकर्त्यांनी अस्पृश्य वर्गाच्या मुलांसाठी स्वतंत्र शाळा तर काढली नाहीच, पण शाळातून स्पृश्य मुलांच्या बरोबर अस्पृश्य मुलांना बसू देणेसुद्धा धोक्याचे आहे असे त्यांना वाटत असल्याचे पुरावे शाळाखात्याच्या दप्तरात दृष्टीस पडतात. जेथे राज्यकर्ते उदासीन तेथे इतरांची काय कथा! 'महारांची शाळा' या जोतीबांच्या कृतीला अद्भुत म्हटले ते यासाठीच. सामाजिक विषमता त्यांच्या हृदयाला किती झोंबत असावी, याची प्रस्तुत शाळेची स्थापना ही एक बिनतोड साक्ष आहे.

"मुलींची शाळा" हा जोतीबांच्या कर्तृत्वाचा दुसरा उन्मेष होता-तो जोतीबा व पुणे शहर यांच्यापुरता आश्चर्यकारक होता. पुण्याबाहेर महाराष्ट्रात अन्यत्र मुलींच्या शाळा निघाल्या होत्या. कलकत्ता, मुंबई व पेशव्यांच्या काळापासून इंग्रजांच्या ताब्यात असलेली कोकणपट्टी येथे मुलींच्या शाळा पुण्याआधी निघालेल्या होत्या. उदा.–मुंबईस मुलींची शाळा १८३७ साली निघाली होती. त्यामुळे केवळ मुलींची शाळा यात अपूर्वता नव्हती पुण्यात एखाद्या ब्राह्मणाने मुलींची शाळा घातली असती तर तिचे कौतुक नव्हते. फारसे शिक्षण न झालेल्या एका अब्राह्मणाने व तीहि पुण्यासारख्या

सनातनी मनाच्या केंद्रस्थानी मुलींची शाळा काढावी ही त्या शाळेची खरी अपूर्वता आहे ; व यासाठीच महात्मा या संज्ञेने चिरगौरवास जोतीबा पात्र आहेत. जोतीबांचे तिसरे महत्कृत्य अनाथ बालकाश्रमाचे आहे. आपले पाप उघडकीस येऊ नये म्हणून स्त्री–पुरुषांनी कुठेतरी टाकून दिलेल्या अर्भकांच्या संगोपनाची व्यवस्था जोतीबांनी 'अनाथ बालकालय' अस्तित्वात आणून केली. जोतीबांची संस्था आज तेच अर्भकरक्षणाचे काम करणाऱ्या संस्थांना बीजासारखी उपयोगी पडली.

याप्रमाणे संस्था जन्मास घालतांना जोतीबांच्या अंतरंगात जे विचार घोळत होते, त्याची परिणती १८७३ साली त्यांनी स्थापलेला 'सत्यशोधक समाज' ही होय. धर्म, शास्त्र, रूढी व त्यांचे प्रत्यक्ष व्यवहारात येणारे कटू अनुभव या सर्वांचे मंथन करून जोतीबांनी माणसाच्या प्रगतीला नडणारे हे अडथळे काढून टाकण्याचा निश्चय केला. सत्यशोधक समाजाच्या ध्येयाचे तपशील पाहिल्यास त्यांच्या उपदेशाची आंगोपांगे लक्षात येतील. बहुजनसमाजच नव्हे तर त्याहून वरच्या कोटीतला समाजसुद्धा गुलामगिरीतच आहे, हे जोतीबांना स्पष्ट दिसत होते. या कोटीतली माणसे आपल्या कोटी बाहेरची प्रचंड जनसंख्या, स्पर्शास्पर्शाच्या, विद्याहीनत्वाच्या, जनमान्य रूढ चालीरीतींच्या दास्यातून मुक्त व्हावी असे लिहित होती, बोलत होती. परंतु ती माणसे शहरात राहणारी व खेड्यातली जनता निरक्षर. या तफावती मुळे त्यांचा सामाजिक वैषम्य घालविण्याचा उपदेश खेड्यापर्यंत पोचवून तेथील लोकांना सहज समजावा, अशी स्थिती नव्हती. आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली म्हणजे जोतीबांच्या प्रभावाचे रहस्य गळी उतरेल. ज्या समाजाचा उद्धार करावयाचा त्याच समाजातले जोतीबा असल्यामुळे त्यांचे विचार त्या समाजाला जवळचे अनुभवसिद्ध किंवा आपुलकीचे वाटणे स्वाभाविक होते. ही सहानुभूती आणि प्रत्यक्ष स्वानुभव यातील भेद आहे. पोट भरलेल्या माणसाने अन्नान्न दशेतल्या माणसाबद्दल कींव बाळगणे आणि उपास मार घडणारांनी आपली व्यथा समान दशेतल्याशी व्यक्त करणे यातला फरक कळण्याला अवघड नाही. याच फरकामुळे जोतीबा बहुजनसमाजाच्या

आघाडीवर आले. देव एकच एक व निराकार असून त्याच्या भक्तीला कोणा मध्यस्थाची आवश्यकता नाही. सर्व माणसे माणूस या नात्याने समान योग्यतेची आहेत. हे आचरणात आणावयाचे तर जातिभेद मोडले पाहिजेत. समाजाचा प्रत्येक घटक, सज्ञान, निदान साक्षर असावा; अशा अर्थाच्या काही तत्त्वांवर जोतीबांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. यातली सगळी तत्त्वे जोतीबांचा अभिमान बाळगणारांनी अमलात आणली असे म्हणता येणार नाही. देव सगुण साकार मानला की, त्या बाबतीत आकार परत्वे बंधन अर्थात गुलामगिरी उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाही. देवदेवता वारीने समाज विभागतो. देवाच्या भक्तीला मध्यस्थ पाहिजे या समजुतीच्या गुलामगिरीने जी पुजाऱ्यांपासून परंपरा सुरू होते तिचे शेवटचे टोक गुरुमाहात्म्य किंवा बवाबाजी हे होय. माणसामाणसात जन्मपरत्वे भेद स्वीकारून एक उच्च तर दुसरा नीच ही कल्पना बौद्धिक गुलामगिरीची दर्शक, आहे. ब्राह्मण ज्ञानाने बुद्धीचा उत्कर्ष साधणारा, पण त्या ज्ञानाने जे आचार नियम एकदा रूढ होऊन बसले, त्यांच्या युक्तायुक्ततेचा, लाभहानीचा विचार न करता त्या आचार नियमांना तो कवटाळून वागणारा एकूण गुलामच पण बाकीच्या समाजात त्याचे एकदा असामान्य वर्चस्व होते. त्यालाच जोतीबांनी 'ब्राह्मणांची गुलामगिरी' हे नाव देऊन आपल्या हृदयातली सामाजिक समानतेची तळमळ व्यक्त केली आहे.

जोतीबांची विचारप्रणाली नवी नव्हती, त्यांची स्वमतप्रतिपादनाची भाषा मात्र नवी होती. १८६७ साली मुंबईस अवतरलेल्या प्रार्थना समाजाचे जे ध्येय होते तेच सत्यशोधक समाजाचे होते. १८७५ मध्ये मुंबईत प्रथम संघटनारूपाने अस्तित्वात आलेला स्वामी दयानंदाचा 'आर्य समाज' वेदप्रामाण्य कायम ठेवून समाजसमानतेसाठी सत्यशोधक समाजाचेच विचार सांगत होता. प्रार्थना समाज व सत्यशोधक समाज यांनी वेदप्रामाण्य अंगिकारलेले नव्हते. १८७५ मध्येच मुंबईत थिऑसॉफी संप्रदायाने मूळ धरले. त्याच्या शिकवणीचे धोरण सामाजिक वैषम्य घालविण्याचेच होते.

प्रार्थना, आर्य, थिऑसॉफी या संप्रदायांचे कर्ते पुरूष एकाहून एक

विद्वान होते. जोतीबांजवळ विद्वत्तेचे नसले तरी प्रत्यक्ष कर्तृत्वाचे भांडवल मोठे होते. व त्यालाच जगात खरे महत्त्व प्राप्त होत असते. 'यस्तु क्रियावान पुरुषः स विद्वान' जो क्रियावान तोच विद्वान–हे सुभाषित यामुळेच उत्पन्न झाले आहे. मनात जे स्फुरेल ते लोकहिताचे असल्यास त्याकरिता दीर्घ विचारात वेळ न घालविता तावडतोब कृतीत उतरावयाचे असा जोतीबांच्या स्वभावाचा एक विशेष होता. पुस्तकी विद्वत्ता, संपत्ती वगैरे इतर साधनांच्या अभावी जोतीबांना समाजात मान्यता मिळाली याचे कारण कृतिशीलतेखेरीज दुसरे सापडणार नाही. त्यांची कृतिशीलता निर्विघ्न नव्हती. विचारांच्या नवेपणाला बुडवू पाहणारी विघ्ने समाजातील परंपरागत समजुतीच्या अभिमानाने उत्पन्न होतात. त्या अभिमानाचे आघात जोतीबांना आपल्या कर्तव्याच्या प्रारंभी सोसावे लागले. या अभिमानात अगदी अलीकडे जोतीबा खिरस्ती झाले होते असा मिथ्यारोप घोषित करून जोतीबांच्या कीर्तीला किंचित काळ ग्रासल्याचे स्मरण पुढाऱ्यांना असेल. जोतीबांच्या हयातीत त्यांच्यावर प्रतिकूल टीकेचा मारा झाला होता. असे झाले नसते तर आश्चर्य. प्रतिकूलतेचा हल्ला सहन करीतच नव्या विचारांचा प्रसार होत असतो. सामाजिक समतेचे प्रतिपादन जोतीबांनी आपल्या पद्धतीने केले. ते प्रतिपादन आवेशाने धिक्कारणारे आज मागे पडले आहेत. देशातल्या समाजाला एकजिनसी बनवून त्याच्यात अभेद्य सामर्थ्य उत्पन्न करणे यालाच सामाजिक समानता समजतात.

महात्मा जोतीबांनी राष्ट्राच्या प्रगतीला हातभार लावणारी, त्यांचे कालमान, शिक्षणसाधने, पाहता धाडसाप्रमाणे वाटणारी, जी कार्ये केली त्याचा थोडक्यात येथवर परिचय करून दिला. श्री. कवडे यांनी हा परिचय जास्त तपशीलानीशी आपल्या या पुस्तकात मांडलेला आहे. तो जोतीबांच्या चरित्र वाङ्मयामध्ये निःसंशय भर टाकणारा आहे. श्री. कवडे हे एक मराईत लेखक असून आजवर त्यांनी संत गाडगे महाराज, संत तुकाराम महाराज, श्री छत्रपती शिवाजी महाराज, श्री साईबाबा यांची अभ्यासपूर्वक चरित्रे लिहिली आहेत. हे त्यांच्या लेखणीतून उतरलेले पाचवे चरित्र आहे. श्री. कवडे यांचा मुख्य गुण चिकाटीची श्रमशीलता हा होय. ते मना-

वर घेतील त्या विषयाचा साधनासाठी पिच्छा पुरवून अभ्यास करतात. मूळचे शिक्षण जुजबी असूनहि त्यांनी वरच्यासारख्या परिश्रमानें लेखनकार्यात जी कौतुकास्पद निपुणता संपादन केली आहे; तिची साक्ष त्यांची पुस्तके पटविल्यावाचन राहात नाहीत. त्यांच्या मागील पुस्तकाप्रमाणे याहि पुस्तकाचे महाराष्ट्रात योग्य स्वागत होईल, असा विश्वास वाटतो.

**न. र. फाटक**
(सुप्रसिद्ध इतिहास संशोधक
व मराठीचे मान्यवर प्रोफेसर)

मुंबई, ता. २८–१–६८.

संचालक, समाज कल्याण विभाग,
म. रा., पुणे.

# अभिप्राय

महात्मा जोतीबा फुले म्हणजे समाजोन्नतीची ज्योतच आहे. त्यांना लोक संत म्हणत नसले तरी संतात व त्यांच्यात काय कमी होते ते मला कळत नाही. म. गांधी समाजकारणी, राजकारणी व विधायक रचनात्मक कार्य करूनहि महात्मा ठरतात! सावता महाराज शेतीभाती करूनहि संत ठरतात. गोरा महाराज मडकी घडवून तर कबीर शेले विणूनहि संत ठरतात. तर जोतीबांनी समाजसेवेसाठी समाजाचे टीकास्त्र सहन करूनहि आपला आवाज मागे न घेता मागासलेले, स्त्रिया, मुली व अस्पृश्य यांना शिक्षण देऊन आपला देश उन्नतीला नेण्याचा हट्ट धरला व बहुजन समाजाची अंतापर्यंत सेवा केली हे काय कमी संतपण आहे?

लोक प्रगत करणे, लोकांना सेवेला लावणे, व देशाभिमानी बनवणे हेच संतांचे महत् कार्य मी समजतो. आणि या अर्थाने महाराष्ट्राचे फार मोठे हित जोतीबांनी केले. या ग्रंथांत त्यांचे चरित्र लिहून श्री. पांडुरंग बाळाजी कवडे यांनी संतसेवक म्हणून सेवा केली आहे. यापूर्वी त्यांनी संत गाडगे महाराज, संतश्रेष्ठ तुकाराम महाराज, शिर्डीचे महान् संत साईबाबा, श्री छत्रपती शिवाजी महाराज व आता महात्मा फुले यांचे चरित्र ओजस्वी व प्रभावी रीतीने लिहिले आहे. जनतेला प्रगत मार्गाने जाण्यासाठी ह्या चरित्राचा उपयोग होईल. त्यांच्या कार्याचा मी यथोचित गौरव करून जनतेने या ग्रंथाचा लाभ घ्यावा अशी शुभकामना करतो.

—तुकड्यादास
(राष्ट्रसंत तुकडोजी महाराज)

# आगाऊ पुस्तकें घेण्याचे आश्वासन देणारे बंधू-भगिनी

## मुंबई

पुस्तके

५०१ .. श्रीमान सीताराम पांडुरंग चव्हाण, गोखले रोड (साऊथ).
१५१ .. मेसर्स भिकाजी विठ्ठल मोकळ, भाजीपाल्याचे व्यापारी, हस्ते, दिनकरराव भिकाजी, भाजीबाजार, भायखळा,
१०१ .. मुरलीधर प्रेमाजी भरवीरकर, कमिशन एजंट, भायखळा
१०१ .. मेसर्स बमाजी मनाजी मेहेर, भायखळा.
१०१ .. महादेव कृष्णाजी वायकर, भायखळा.
७५ .. मुकुंद टकोजी पाटील, भायखळा.
५१ .. राणोजी मोहनाजी भुजबळ, जुना भायखळा
५१ .. रघुनाथ गेणूजी टिळेकर, भायखळा
५१ .. भागोजी कृष्णाजी दलाल, भायखळा
२५ .. श्रीमती इंदिराबाई शालिग्राम राऊत, शिवाजी पार्क
२५ .. सौ. जयश्रीबाई अंकुशराव सारंग, वरळी
२५ .. डॉ. सौ. शकुंतलाबाई गणपतराव भोसले, वरळी

## पुणे

२५१ .. सौ. गंगुबाई हरिभाऊ गिरमे वत्सला भुवन, प्रभातरोड.
२५१ .. सौ. पार्वतीबाई हरिभाऊ गिरमे वत्सला भुवन प्रभातरोड.
१०१ .. सौ. सुनीतीबाई लिंगराज एक्कुंडी, १०२०/८ शिवाजी नगर.
५१ .. लक्ष्मीबाई नारायणराव चव्हाण, हस्ते– ज्ञानेश्वर नारायण
५१ .. गणेश हरि दरोडे, मातृछाया. पुणे ४.
२५ .. राजाराम काशिनाथ भुजबळ. शिवाजी नगर १६
५१ .. विश्वनाथ महादेव फुले. (म. फुले यांचे वंशज).
५१ .. रामकृष्णराव गंगारामजी पाषाणकर वडिलांचे स्मरणार्थ.
५१ .. सौ. भागीरथीबाई रामकृष्णराव पाषाणकर, कै. सौ. सोनबाई पाषाणकर यांच्या स्मरणार्थ.

पुस्तके

५१ .. रामकृष्णराव गंगारामजी पाषाणकर, कै. डॉ. रघुनाथराव जी. पाषाणकर यांच्या स्मरणार्थ.

२५ .. पांडुरंग लक्ष्मण बोराटे, बी. ए. फ्रूट कमिशन एजंट

२५ .. संजीव भागोजी कलावंत फोटोग्राफर व म. फुले फोटोचे प्रकाशक.

२५ .. लक्ष्मणराव तुळशीराम कुदळे, नवा सदाशिव पेठ

२५ .. चंद्रकांत किसनराव कुदळे, (बी. ई. सिव्हि.) शुक्रवार पेठ.

२५ .. सौ. सुंदराबाई सोपानराव लांडगे (कै. बाबूराव फुले यांच्या कन्या)

२५ .. सोपानराव गणपतराव लांडगे, बी. ए. एल. एल. बी.

२५ .. विठ्ठलराव गंगाराम कुदळे कचरेवाडी..
चव्हाण. शनिवा पेठ.

२५ .. दशरथराव बाबुराव उरसळ. फ्रूट कमिशन एजंट

२५ .. पांडुरंग विठ्ठल पिंगळे, मुंढवा (जि. पुणे)

२५ .. उद्धवराव रावसाहेब काळभोर लोणी (जि. पुणे)

## माळीनगर जि. सोलापूर

२०१ .. सौ. वेणुबाई शंकरराव राऊत.

१५१ .. पंढरीनाथ हणमंतराव गिरमे, चेअर.-सा. मा. शु. फॅ.

१११ .. सौ. इंदुमतीबाई पंढरीनाथराव गिरमे.

१०१ .. माधवराव भाऊराव राऊत.

१०१ .. चंद्रकांत शंकरराव कुदळे बी. एस्सी. (अॅग्रि.) डा. मा. शु. फॅ.

१०१ .. पुंडलीकराव हरीभाऊ गिरमे, चेअरमन. पाणी पुरवठा.

१०१ .. सौ. अहिल्याबाई पंडलीकराव गिरमे.

१०१ .. भगवानराव कृष्णाजी एकतपुरे.

१०१ .. सौ. गयाबाई भगवानराव एकतपुरे.

१०१ .. अनंतराव मारुतीराव पांढरे, डाय. सा. मा. शु. फॅ.

७५ .. शंकरराव मारुतीराव पांढरे, डाय. सा. मा. शु. फॅ.

५१ .. सदाशिवराव कृष्णाजी एकतपुरे.

५१ .. सौ. लक्ष्मीबाई सदाशिवराव एकतपुरे.

पुस्तके

५१ .. यशवंतराव सगोबा ताम्हाणे.
५१ .. श्रीमती सावित्रीबाई सगोबा ताम्हाणे.
५१ .. सौ. सुनीताबाई चंद्रकांत कुदळे.
५१ .. गोपाळराव भगवंतराव गिरमे.
५१ .. सौ. कमलाबाई गोपाळराव गिरमे.
५१ .. सौ. शकुंतलाबाई नामदेवराव भोंगळे.
५१ .. नामदेवराव महादेव भोंगळे.
५१ .. कुमार रमेश शंकरराव पांढरे.
५१ .. अरुणराव अनंतराव पांढरे, बी. ए.
५१ .. सौ. अनुसयाबाई अनंतराव पांढरे, सदस्या, माळशिरस ता. पं. समिती
५१ .. जगन्नाथराव गणपतराव रासकर, व्हा. चेअरमन सा फॅ.
५१ .. दामोदर शंकरराव इनामके, डाय. सा. मा. शु. फॅ.
५१ .. बबनराव शंकरराव रासकर.
५१ .. सदानंद शंकरराव राऊत, डेप्यु. सरपंच, अकलूज ग्रा. प.
५१ .. सौ. सरलाबाई शंकरराव पांढरे.
२५ .. सौ. रुक्मिणीबाई यशवंत ताम्हाणे
२५ .. निवृत्तीराव बाळकोबा टिळेकर
२५ .. रामचंद्र नारायण गिरमे.
२५ .. सौ. रुक्मिणीबाई बाळकोबा टिळेकर.
२५ .. नामदेवराव बाळकोबा टिळेकर.
२५ .. सौ. इंदुमतीबाई सदानंदराव राऊत.
२५ .. कु. शैलजा सदानंदराव राऊत.
२५ .. सौ. यमुनाबाई जगन्नाथराव रासकर, अध्यक्षा, महिला मंडळ
२५ .. विलासराव निवृत्तीराव टिळेकर.
२५ .. हरिभाऊ यशवंतराव नेवसे.
२५ .. सौ. चंद्रभागाबाई हरीभाऊ नेवसे

पुस्तके

२५ .. नामदेवराव यशवंतराव नेवसे.

२५ .. सौ. विमलाबाई नामदेव नेवसे

## अकलूज (जि. सोलापूर)

१०१ .. नारायणराव बाबाजीराव एकतपुरे, डाय. यश. सह. सा. का.

२५ .. सौ. लक्ष्मीबाई नारायणराव एकतपुरे

२५ .. कृष्णाजी आबाजी शिंदे

२५ .. धनंजय कृष्णराव शिंदे बी.एस्सी. (अ‍ॅग्रि.)

२५ .. सौ. प्रभावतीबाई धनंजय शिंदे

२५ .. शंकरराव रामजी बोरावके.

## नासिक

२०१ .. मराठा विद्या प्रसारक समाज नासिक हस्ते बी. जे. ठाकरे सरकारी वकील, नासिक जिल्हा

२०१ .. मेसर्स मगनलाल देवशंकर बीवाले (विजयानंद)

१२५ .. वे. शा. सं. काशीनाथ गणेश पटवर्धन (स्वातंत्र्यवीर सावरकरांचे एकनिष्ठ भक्त)

१०१ .. श्रीमान रावजीसा यमासा क्षत्रिय, सुप्रसिद्ध विडी कारखानदार

१०१ .. महाराष्ट्र प्रबोधन सेवामंडळ.

९१ .. महिपतराव जबाजी वाघ, दी हिंदुस्थान मोटर्स ट्रॅन्स्पोर्ट कं.

२५ .. निवृत्तीराव त्र्यंबकराव वझरे, माजी म्युनि. प्रेसिडेंट, नासिक.

२५ .. श्रीमती गंगूबाई स. नाईक

२५ .. शिवाजी महादेव निकम (गणेशवाडी)

२५ .. सुखदेवरावं वेडूजी पगार, गव्ह. कॉन्ट्रॅ.

२५ .. बी. व्ही. जाधव, न्यूजपेपर एजंट

२५ .. सौ. सुचिताबाई बाबुराव चव्हाण

## नासिकरोड

१५१ .. रामचंद्र गोपाळराव लोणकर (माळी) आणि बंधू.

१२५ .. त्र्यंबकलाल जयरामभाई चौहान (बिटको कं.)

पुस्तके
१२५ .. सौ. रतनबाई जयरामभाई चौहान (बिटको कं.)
२५ .. बी. एस्. सिन्नरकर, पायो. आयर्न स्टील वर्क्स.

## त्र्यंबकेश्वर (जि. नासिक)

५१ .. सौ. विमलताई भाऊराव पाटील
५१ .. भाऊराव शंकरराव पाटील

## मालेगाव (जि. नासिक)

२०१ .. म. गांधी विद्यामंदिर, मालेगाव कॅम्प, हस्ते ना.हिरे.
५१ .. मेसर्स माळी कंपनी, साडी अडत दुकान.
२५ .. गोपाळराव केदा माळी, संगमेश्वर
२५ .. दोधा माणकोजी महाजन

## नांदगाव (जि. नासिक)

१५१ .. श्रीमान सुरेशकुमार शांतीलालशेठ कासलीवाल, नगरशेठ
१०१ .. देवराम महादेव आहिरे, अध्यक्ष–जिल्हा दलित फेडरेशन
५१ .. गोपीचंद भागूजी जाधव (गंगादरी)
२५ .. वसंतराव हरिभाऊ सुरसे
२५ .. भिका तुकाराम मोकळ
२५ .. धर्मराज भिमाजी मोरे

## मनमाड (जि. नासिक)

२०१ .. महाराष्ट्र शेतकरी सेवा मंडळ,
७५ .. तुकाराम बारकोजी सोनवणे, माजी म्यु. प्रेसि.
५१ .. नामदेवराव भागूजी गायकवाड, श्रीकृष्ण सॉ मिल
५१ .. सौ. आनंदीबाई व सौ. ताराबाई तुकाराम पाटील, सोनवणे

## भुसावळ

३१ .. मोतीराम काळूराम झवर, हस्ते मदनलाल

## चाळीसगाव

२५ .. विठ्ठल संभु महाजन, सायगाव (ता. चाळीसगाव)

## सिन्नर

पुस्तके

१०१ .. सुप्रसिद्ध भिकुसा यमासा प्रा. लि. सिन्नर

## ता. कोपरगाव, जि. नगर

१५१ .. श्रीमती सुगंधाताई रघुनाथ गिरमे,ऑ.मॅजिस्ट्रेट, म्यु.मे. कोपरगांव
१२५ .. श्रीमती काशीबाई शंकरराव बोरावके, शंकरबाग–कोपरगांव
१०१ .. दिगंबरराव बापुराव बोरावके, कै. मातोश्री पार्वतीबाई यांच्या स्मरणार्थ–कोपरगांव
१०१ .. प्रभाकर तुकारामजी बोरावके, कोपरगांव
५० .. नारायणराव राघुजी गिरमे, कोपरगांव
२५ .. गोविंदराव लक्ष्मण रांधव, पोहेगांव–कोपरगांव
२५ .. शंकरराव संभाजीराव झगडे, चांदेकसरे–कोपरगांव
२५ .. केशवराव राणूजी गिरमे, जेऊर कुंभारी–कोपरगांव
२५ .. शंकर बाळकू मेहोत्रे, जेऊर कुंभारी–कोपरगांव
२५ .. तुकाराम शंकर मेहेत्रे, कै. सौ. आनंदीबाई यांच्या स्मरणार्थ जेऊर कुंभारी–कोपरगांव
२५ .. सौ. वेणुबाई नारायणराव गिरमे, कोपरगांव
२५ .. सौ. शैलाबाई प्रभाकरराव गिरमे, कोपरगांव
२५ .. सौ. भामिनाबाई दिगंबर बोरावके. कोपरगांव
५१ .. मारुती रावजी डाके, नगराध्यक्ष, संगमनेर नगरपालिका
५१ .. माळी विकास मंडळ, मुंबई तर्फे मधुकर भिकाजी मोकळ.



# अनुक्रमणिका



# अर्पणपत्रिका

युगप्रवर्तक, राष्ट्रसंवर्धक, दलितोद्धारक,
नवमत नवविचाराचे प्रेरक व स्वातंत्र्य-
मार्गदर्शक

**महात्मा जोतीराव फुले**

यांच्या अठ्याहत्तराव्या पुण्यतिथीनिमित्त
त्यांच्या पुण्यस्मृतीस स्मरून अल्पशी कृती

**राष्ट्रभूषण ना. यशवंतराव साहेब चव्हाण**
गृहमंत्री, भारत सरकार

व त्यांच्या धर्मपत्नी

**सौ. वेणुताईसाहेब चव्हाण**

या उभयतांच्या हस्ते समर्पण–

ग्रंथकर्त्यांतर्फे

राजाराम जी. पाटील, नासिक
दौलतराव पांडुरंग कवडे, नांदगाव
रामराव पांडुरंग कवडे, बी. ए., म्यु. प्रेसि.– नांदगाव

नामदार यशवंतराव चव्हाणसाहेब, गृहमंत्री, भारत सरकार आणि
सौ. वेणूताईसाहेब चव्हाण.



हे उभयता पतिपत्नी म. फुले यांचे एकनिष्ठ भक्त आहेत.

युगप्रवर्तक महात्मा जोतीराव फुले



महाराष्ट्राचे आद्य समाजसुधारक, स्त्रिया, अस्पृश्यजन व बहुजनसमाजाचे उद्धारकर्ते.

# महात्मा जोतीराव फुले ह्यांचे चरित्र

## प्रकरण पहिले

## पूर्वज व जन्म

काय वाणू आता न पुरे ही वाणी। मस्तक चरणी ठेवितसे ।।
थोरवि सांडिली आपुली परिसे। नेंणे शिवो कैसे लोखंडासी ।।
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती। देह कष्टविती उपकारे ।।
भूतांची दया हे भांडवल संतां। आपुली ममता नाही देही ।।
तुका म्हणे सुख पराचिया सुखे। अमृत हे मुखे स्रवतसे ।।

युगप्रवर्तक, स्वराज्य-संस्थापक, धर्मसंरक्षक, पुण्यप्रतापी, प्रातः-स्मरणीय, क्षत्रियकुलवतंस श्री छत्रपती शिवाजी महाराज हे सन १६२७ साली जन्मास आले. क्षत्रिय माळी समाजात महात्मा जोतीबा फुले सन १८२७ साली जन्मास आले. युगप्रवर्तक हे काही शतकांनी जन्मास येतात. या तत्त्वानुसार शिव छत्रपतींच्या जन्मानंतर बरोबर दोनशे वर्षांनी हा श्रेष्ठ असा महात्मा जन्मास आला.

शिवप्रभूंच्या अवतारकार्यामुळे सुमारे सातशे वर्षांची गुलामगिरी नष्ट झाली. स्वराज्याची स्थापना होऊन हिंदू धर्माचे रक्षण झाले. कविभूषण आपल्या 'शिवबावन्नी' या काव्यात छंद १९ मध्ये सांगत आहे—

"काशीकी कला जाती थी। मथुरेकी मसजिद बनती थी ।।
एक शिवाजी न होता। तब सबकी सुन्नत होती थी ।।"

शिवप्रभूने अशक्य भासणारी गोष्ट शक्य करून दाखविली; शून्यातून स्वराज्य निर्माण केले. धर्मरक्षणाचे व स्वराज्यसंवर्धनाचे कार्य करण्याचे

धैर्य जनतेत निर्माण केले. तद्वत हजारो वर्षांपासून चालत आलेली धार्मिक व सामाजिक गुलामगिरी हिला मूठमाती देण्याचे धैर्य महात्मा फुले यांच्यामुळेच जनतेत निर्माण झाले.

**भगवान बुद्धानंतर**

**“बुद्ध देवाने वेदातील धर्म पुन: प्रकाशात आणला; अगदी खालच्या वर्गापर्यंत त्याचा प्रसार करून त्याने भारतभूमीचे रक्षण केले.”**

**– स्वा. विवेकानंद**

वेदान्त धर्म कर्मकांडाच्या अवडंबराखाली झाकला गेला. जपजाप्य, यज्ञयाग, व्रतवैकल्य, यज्ञात पशूंची होणारी बेसुमार हत्या यांमुळे तो अवनत दशेच्या मार्गास लागला. कृत्रिम वर्णाश्रमास जोर येऊन जातिजातींमध्ये भेदाचे पडदे निर्माण झाले. वर्णाश्रम हा जन्मजातीवर ठरला गेला. त्यामुळे बहुजनसमाज धर्मज्ञानापासून दूर राहू लागला. अशा वेळी भगवान बुद्धाने समता व समभाव या तत्त्वांचा प्रसार करून सांगितले: धर्मज्ञानाच्या बाबतीत स्त्री–पुरुष समान आहेत. परमेश्वरप्राप्तीबाबत कृत्रिम वर्णाश्रमाथास महत्त्व नाही. सर्व मानवप्राण्यास परमेश्वरप्राप्तीचा समान अधिकार आहे. वगैरे सनातन तत्त्वांचा प्रसार करून जनतेत स्वत: कृतीने समाजोद्धाराचे कार्य केले. त्यामुळे सत्य–सनातन धर्मसंरक्षण झाले.

**“ज्ञातिभेद मोडणारा, विशिष्ट हक्कांचा विध्वंसक व सर्वत्र समता या तत्त्वाचा उपदेशक अशा अर्थाची विशेषणे बद्ध देवाला लावली असल्याचे माझ्या वाचनात आहे.” – स्वा. विवेकानंद**

काही काळानंतर वर्णाश्रम धर्माने पुन: डोके वर काढले. भगवान बुद्धाच्या तत्त्वज्ञानास कृत्रिम जातिभेदाच्या इमारतीच्या पायात गाडण्यात आले. काल्पनिक दशावताराच्या मालिकेत भगवान बुद्धाला दहावा अवतार म्हणून जबरीने कोंबण्यात आले. त्याच्या तत्त्वज्ञानाचा खर्दा केला. बौद्ध धर्मास भारतातून नामशेष करण्याचा कर्मठांनी प्रयत्न केला.

**“आचार्यांची (आद्य शंकराचार्य) बुद्धिमत्ता वस्तऱ्याच्या धारेसारखी तीव्र होती, यांत शंका नाही. ते उत्कृष्ट पंडित होते. आणि वादविवादात प्रतिपक्षाला चीत करण्याची हातोटी त्यांना चांगली साधली होती यात शंका नाही. तथापि बुद्धीच्या विशालतेइतकी अंत:करणाची विशालता त्यांच्या-**

**पाशी नव्हती. त्यांना ब्राह्मण्याचा अत्यंत अभिमान होता. वेदान्तसूत्रावर लिहिलेल्या भाषांतरात ब्राह्मणेतरांना परमज्ञान प्राप्त होणार नाही असे अट्टाहासाने म्हटले आहे.' – स्वा. विवेकानंद**

जातिभेदाची प्रखरता व कृत्रिम वर्णाश्रमाची परंपरा ही आद्य शंकराचार्यांपासून रूढ झाली. या अनिष्ट गोष्टींच्या रक्षणासाठी अनेक शास्त्रीपंडितांनी प्रयत्न केले. फक्त काही संतांनी याच्याविरुद्ध अल्पसा प्रयत्न केला. या धर्मघातक व राष्ट्रघातक परंपरेवर म. जोतीरावांनी प्रथम हल्ला केला. भगवान बुद्धानंतर बोलण्याप्रमाणे प्रत्यक्ष कृती करणारे म. फुले हेच ! म्हणून भगवान बुद्धाप्रमाणे ते आदर्श असे महात्मे ठरले. संत सावता महाराजांनंतर क्षत्रिय माळी समाजात हाच अद्वितीय असा सर्वश्रेष्ठ महापुरुष जन्मास आला.

## पूर्वज

महाराष्ट्राच्या जागृत इतिहासात अनेक दृष्टींनी सातारा जिल्ह्यास महत्त्व आहे. परंतु महाराष्ट्राचेच नव्हे तर अखिल भारताचे दुर्दैव ह्याच साताऱ्यात जन्मास आले.

इ. स. ६५० च्या सुमारास सिंध प्रांतातील सिंधूराज साहसी निपुत्रिक असता मृत्यू पावला. त्याचा 'चच' या नावाचा ब्राह्मण दिवाण होता. राजाच्या मृत्यूनंतर मंत्र्याने त्याचे राज्य बळकाविले. राजसत्ता हाती येताच 'चच' याने निरनिराळ्या जातीतील क्षत्रियांवर निरनिराळे निबंध घालून क्षात्र वृत्ती जवळजवळ ठार करण्याचे प्रयत्न केले. त्याचे फळ म्हणजे मीर कासीमने सिंध प्रांतावर स्वारी केली. हिंदूंच्या वर्णाश्रमाच्या भेदावर उभारलेल्या राष्ट्रभावनेस आक्रमणाची आग लावली. हिंदू जात व हिंदू राष्ट्र यांच्या नाशाचा मार्ग त्याने मुसलमानांस मोकळा केला. त्यामुळे मूठभर मुसलमानांनी या खंडप्राय देशावर अनेक शतके राज्य केले. सुलतानी सत्ता गाजवून हिंदूस हिंदू म्हणून जगणे कठीण केले.

साताऱ्याचे छत्रपती शाहू महाराज निपुत्रिक असता मरण पावले. त्यांचे राज्य बाळाजी विश्वनाथ ह्या पेशव्याने बळकावून नंतरच्या छत्रपतीस नामधारी बनविले. या एकाच घटनेत महाराष्ट्राचे नव्हे तर भारताचे दुर्दैव

जन्मास आले. सिंधूराज साहसी याचे राज्य 'चच' या दिवाणाने बळकावून मुसलमानी सत्तेस आमंत्रण दिले. तद्वत पेशव्यांनी मराठ्यांचे राज्य गिळून इंग्रजांस भारतावर राज्य करण्यासाठी मार्ग मोकळा केला. कारण सुमारे सातशे वर्षात परकीय सत्तेस पायबंद घालण्याचे धैर्य कोणत्याहि प्रांतास शक्य झाले नाही. ते फक्त महाराष्ट्राने केले. तोच महाराष्ट्र लढाऊ वृत्ती-पासून पेशव्यांनी परावृत्त केला व जातिधर्म व वर्णाश्रम यांचे मुख्य केंद्र महाराष्ट्र हे त्यांनी बनविले. महाराष्ट्रभर ब्राह्मणी सत्ता सर्वत्र दिसू लागली. इतकेच नाही तर खेड्यापाड्यातून तो उघडा नाच करू लागली. खेड्या-पाड्यातील कुळकर्णी व ब्राह्मण सावकार हे गावापुरते प्रति—सरकार बनून बहुजनसमाजावर हवा तो जुलूम करू लागले.

सातारा जिल्ह्यात कडगुण म्हणून गाव आहे. हेच चरित्रनायकाच्या पूर्वजांच्या वतनाचे गाव! तेथे त्यांच्या अनेक पिढ्या नांदल्या. क्षत्रिय-मराठी समाजातील गोरे हे या गावचे चौगुलेपणाचे हक्कदार होते. गोरे यांनी बराच नावलौकिक मिळविला होता. चौगुलेपणाचे काम करून ते शेती करीत. कडगुणचे कुलकर्णी सावकार व गोरे यांच्यात वाकडेपणा आला. तो दिवसेंदिवस वाढू लागला. निष्कारण कुरापती काढून कुलकर्णी गोरे यांना त्रास देऊ लागले. गोरे हे कर्तबगार असून करारी होते. त्यामुळे कुळकर्ण्यांचे प्रयत्न निष्फळ होऊ लागले. म्हणून गोरे यांच्यावर सावकारी पाश व लेखणीची करामत करण्याचे कुलकर्ण्यांनी ठरविले. गोरे अशिक्षित असल्यामुळे कुलकर्णी सावकाराच्या कृष्ण कारस्थानांचा थांगपत्ता त्यांना लागला नाही. गोरे यांची जमीन गिळंकृत करण्याचा कुलकर्ण्याने अखेर डाव साधला व गोरे यांना परागंदा होण्याचा मार्ग मोकळा केला.

मृगाचा भरपूर पाऊस पडला. शेतकरी आनंदाने पेरणीस लागले. पेरणीचे महत्त्व हे प्रत्यक्ष शेती करणाऱ्यासच! संत तुकाराम महाराज सांगतात—"**मेले मढे झाकुनी। करिती पेरणी कुणबिया वानी ।।**" मोठ्या उत्साहाने गोरे शेतात पेरणीस गेले; सुरवात केली. अशा वेळी कुलकर्णी मोठ्या ऐटीने व गुड्डयुद्धीने शेतात आला. हुकमी आवाजात त्याने पेरणीस हरकत केली. तो म्हणाला, "जमीन माझी आहे; कायद्याने मी तिचा मालक बनलो; तुला पेरणी करता येणार नाही." कुलकर्ण्याचे ते शब्द नसून

प्रत्यक्ष वज्राघातच आहे असे गोरे यांना भासले. त्यांचे धैर्य गळाले व कर्तबगारी मावळली; हताश होऊन त्यांनी कपाळावर हात मारला. कर्म फुटले ! असे म्हणून ते मटकन खाली बसले. भरल्या मनाने अंत:करणाच्या जागत्या भावनेने ते शेतीकडे पाहू लागले. शेतीबद्दलचा उमाळा आला तो डोळ्यातून वाहू लागला. जमिनीची अखेरची शांती त्यांनी अश्रूंनी केली व नाइलाजाने ते घरी परतले. असल्या प्रकारचे अन्याय हल्लीच्या प्रकाशित कायद्याच्या काळात सुद्धा काही घडत आहेत. मग त्या काळी घडणे काय अशक्य ?

**प्राणापेक्षा प्रिय**

जो स्वत: शेतीची सेवा करतो तो तिला जीविताचे सर्वस्व समजतो. तिच्या सेवेसाठी तो रात्रंदिन मृत्यूशी झगडत असतो. रणांगणातील शूर वीराप्रमाणे तो तळहाती शिर घेऊन रात्रंदिन राबत असतो. कारण त्या वेळी कापलेल्या पिकाजवळ तो उशाशी साप घेऊन एखाद्या योग्याप्रमाणे निर्धास्त झोपत असतो. शेतीस तो आपले आद्य दैवत समजत असतो. स्वत:च्या काळजाइतकेच तो आपल्या काळ्या आईला (शेतीला) महत्त्व देत असतो. तिच्या रक्षणासाठी तो देहास तृणवत् समजतो. प्रत्यक्ष शेती करणारास शेती ही प्राणापेक्षा प्रिय असते. तिच्यासाठी तो देहावर सदैव उदार असतो.

**वतनवाडीचा कायमचा त्याग**

प्राणापेक्षा प्रिय अशी जमीन अन्यायाने व कायद्याच्या नावाखाली कुलकर्ण्याने लबाडीने हरण केली. नुसती जमीनच घेतली नसून त्याने आपले सारे जीवन मातीमोल केले. अशा विचाराने गोरे बेभान झाले. प्राणाची आशा सोडली. संसारचक्र स्वहस्ते मोडण्याचा निश्चय केला. अन्यायाचा प्रतिकार जो प्राणावर उदार होऊन करतो, तोच खरा क्षत्रिय ! तोच खरा संत महात्मा ! कुलकर्ण्याने केलेला उघडा अन्याय पाहण्याइतके गोरे यांचे मन मेलेले नव्हते. अन्यायाचा बदला घेण्याचे त्यांनी निर्धारपूर्वक ठरविले. मध्यरात्री घरातून बाहेर पडले. हातात तलवार होती. कुलकर्ण्याच्या घरी गेले. त्याला जागे केले व आत्यंतिक निर्धाराच्या स्वरात म्हणाले, "अन्यायाने व लबाडीने प्राणापेक्षा प्रिय अशी माझी जमीन घेणाऱ्या दुष्टा, तुझा प्राणच घेतो." असे म्हणून कुलकर्ण्यावर प्राणांतिक जोरदार असा वार

केला. कडगुणच्या भूमीस अखेरचा नमस्कार त्यांनी केला व रस्ता मिळेल तिकडे रातोरात धावपळ करीत कुटुंबासह निघून गेले.

प्राण वाचविण्यासाठी गोरे यांनी वतनवाडीचा कायमचा त्याग केला. परंतु प्राणापेक्षा प्रिय अशी जमीन गेली हे दुःख त्यांच्या हृदयात कायम सलत राहिले. कारण ज्याप्रमाणे ध्येयनिष्ठ योगी हा केवळ आपल्या मोक्षध्येयासाठीच जगत असतो तद्वत प्रत्यक्ष शेती करणारा हा फक्त शेतीच्या मालकीसाठीच जगत असतो. त्याची खरी जाणीव फक्त शेतीत रात्रंदिन घाम गाळणाऱ्यासच ! इतर नामधारी शेतकऱ्यांस नसते.

## "शेतकऱ्यावर होणारा अन्याय वेशीवर कोण टांगणार ?

सत्तेने मदांध झालेले राजे इतर राजांच्या प्रांतांवर स्वाऱ्या करून त्या देशातील जनतेची लूट करतात. अन्यायाचा व जुलमाचा कहर करून तेथील जनतेस त्राहि भगवान म्हणण्याची पाळी आणतात. अशा जुलमी राजाच्या नावाने इतिहासकार खडे फोडतात व त्यांच्या एकंदर कृत्यांस राक्षसी स्वरूप देऊन इतिहासाची पाने रंगवितात. परंतु सत्ताधीश राजांपेक्षा शेतकऱ्यांवर सावकार भयंकर असा जुलूम करतात. त्यांची शेती गिळंकृत करून त्यांना देशोधडीस लावतात. त्यांच्या मुलाबाळांसच नव्हे तर पुढील कित्येक पिढयान् पिढयांस अन्नास महाग व कपडयांस पारखे करतात व त्यांना जगणे अशक्य करीत असतात. सावकारशाहीचा हा अन्याय व उघडा जुलूम शेकडो वर्षे राजरोस धिंगाणा घालीत आहे. त्याबाबत लेखक, समाजसेवक व धर्ममहात्मे म्हणविणारे मूग गिळून अप्रत्यक्ष रीत्या सावकारशाहीच्या जुलमास एक प्रकारे साहाय्य करीत आहेत.

## सावकाराची बाजू घेणारे देशभक्त

महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध पत्रकार श्री. पां. वा. गाडगीळ यांनी ता. ११-४-१९६५ च्या 'नवशक्ती' पत्रात लेख लिहिला. त्यावरून सावकाराची बाजू देशभक्त व समाजोद्धारक कशी घेतात हे स्पष्ट होत असल्याने केवळ शेतकऱ्यांच्या माहितीसाठी व हितासाठी त्यातील काही माहिती देत आहोत.

"सावकाराच्या कचाटयात सापडलेला शेतकरी देशोधडीस लागू नये म्हणून ब्रिटीशांनीं जमीन महसूल कायद्याची दुरुस्ती सुचविली. पण

टिळकांनी सावकारांची बाजू घेतली. तेव्हा ह्या प्रकरणी त्यावेळच्या ब्रिटीश लोकशाहीने शेतकऱ्यांची बाजू घेतली होती. त्या काळी शेतकऱ्यांच्या जमिनी सावकारांनी गिळंकृत करून शेतकऱ्यांना कफल्लक करण्याचा जो सपाटा चालविला होता, त्यापासून शेतकऱ्यास वाचविण्यासाठी त्या वेळच्या गव्हर्नरांच्या कौन्सिलात जमीन महसूल कायदा दुरुस्ती विधेयक आणले. त्या विधेयकाविरुद्ध टिळकांनी जूनपासून सप्टेंबरपर्यंत दहा अग्रलेख लिहिले. त्याबाबत सरकारची बाजू काय आहे ती समजून घेण्यासाठी मी नुकतीच १९०१ च्या कौन्सिलाच्या कामकाजाच्या वृत्तातील सुमारे १४० पाने वाचून काढली. ती सारा मजकूर फारच बोधप्रद आहे.

"केवळ टिळकांनीच शेतकऱ्यांविरुद्ध सावकाराची बाजू घेतली असे नव्हे. तर त्यावेळच्या कौन्सिलात असलेले फिरोजशहा मेहता, सर भालचंद्र भाटवडेकर,. दाजी आबाजी खरे, गोपाळ कृष्ण गोखले, या सर्वांनी सरकारच्या भूमिकेविरुद्ध सावकाराची बाजू घेऊन सरकारवर कडाडून हल्ला केला व सरकारने हे विधेयक लांबणीवर टाकण्याचे नाकारले म्हणून सरकारच्या निषेधार्थ पाच सभासदांनी सामुदायिक सभात्याग केला."

महाराष्ट्रात इंग्रजांचे राज्य स्थिर होऊन सुमारे ८०-८५ वर्षांचा काळ लोटला होता. इंग्रजी सत्तेच्या विरुद्ध व स्वराज्याच्या मागणीसाठी हाका मारणारे लो. टिळक यांनी सावकारांची बाजू घेऊन शेतकऱ्यांच्या विरुद्ध 'केसरी' पत्रातून लेख लिहिले. भारतीयांस राजकीय हक्क जास्त प्रमाणात मिळून कारभाराची सूत्रे आमच्या हाती आली पाहिजेत असे म्हणणारे सुप्रसिद्ध देशभक्त व राष्ट्रभक्त हे शेतकऱ्यांच्या विरुद्ध सावकारांची बाजू घेण्यासाठी किती निकराने झटत होते हे वरील लेखावरून स्पष्ट होत आहे. जागृतीच्या व कायद्याच्या प्रकाशित काळात सावकाराची बाजू घेऊन शेतकऱ्यास देशोधडीस लावण्यास त्यांना काहीच वाटत नव्हते. मग पेशवाईच्या सुरुवातीच्या काळात गोरे यासारख्या अशिक्षित शेतकऱ्याची जमीन घेण्यास त्या काळी सावकारास सहजच शक्य झाले असेल.

## गोरे स्थायिक झाले

चौगुलेपणाचे वतन, घरदार, वंशपरंपरेचे गाव, व आप्तस्वकीय या सर्वांचा गोरे यांनी केवळ अन्यायाच्या प्रतिकारासाठी कायमचा त्याग केला.

सत्य आणि त्याग या दोन गोष्टींचा लाभ जोतीरावांना पूर्वजापासून वारसा हक्काने मिळालेला दिसतो. **स्वामी विवेकानंद** म्हणतात, **"प्रत्येक अवतारी पुरुष हा पूर्वजांचा प्रतिनिधी असतो."** गोरे भटकत भटकत पुणे प्रांतातील पुरंदर तालुक्यातील खानवडी या गावी स्थायिक झाले. हे जोतीरावांचे पणजोबा होत. करारी पुरुष कसल्याही प्रतिकूल परिस्थितीवर कर्तबगारीची मात करू शकतो. त्याचप्रमाणे गोरे यांनी खानवडी गावात आपला जम उत्तम प्रकारे बसविला. वाढत्या उमेदीने ते संसार करू लागले. त्यांना पुत्ररत्नाचा लाभ झाला. नांव शेटीबा ठेवले. गोरे यांनी हवे ते प्रयत्न केले. पण अखेरपर्यंत जमिनीचा लाभ त्यांना झाला नाही. शेवटी जमीन जमीन म्हणत ते देवाघरी गेले. यांनाच महात्मा फुले यांचे मूळपुरुष समजण्यात येते.

## गोरे पुण्यास स्थायिक झाले

वडलांच्या मृत्यूनंतर शेटीबाने खानवडीचा त्याग केला व ते पुणे शहरी आले. पुणे हे त्या काळी पेशव्यांच्या राजधानीचे शहर होते. तेथील वैभव कळसास पोहचले होते. पण त्या वैभवाचा लाभ फक्त ब्राह्मण, शेट–सावकार व सरदार यानाच होत असे. बहुसंख्य लोक जगण्यासाठीच केवळ जगत होते. त्याच्या हालांस व दुःखांस पारावार नव्हता. अशा वेळी एका मळेवाल्याचा आश्रय शेटीबाने घेतला. कष्टाची हौस, करारीपणा व चौकस बुद्धी यांमुळे मळेवाल्याचा लोभ शेटीबावर विशेष जडला. मळेवाला आपल्या कुटुंबापैकी त्यांना समजू लागला. काही दिवसांनंतर शेटीबास कृष्णा, राणू व गोविंदा असे तीन पुत्र झाले. शेवटचे गोविंदराव हेच आमच्या चरित्रनायकाचें जन्मदाते. शेटीबा स्वतः शेतीचे काम करीत असे. मुले, गुरे–ढोरे व शेळयामेंढ्या सांभाळू लागले. सामान्य मजुरांच्या जीवनासारखा त्यांचा काळ हलाखीत व कष्टांत जाऊ लागला. हे दृश्य पाहून मळेवाल्याचे निर्मळ असे शेतकरी मन कळवळून आले. **"प्रसूतीच्या वेदना, नाही वांझोटीच्या मना"** (तुकाराम महाराज) प्रत्यक्ष शेतीत कष्ट करणाऱ्याच्या दुःखाची, हलाखीची व दैन्याची कल्पना फक्त शेतीत राबणाऱ्यासच ! इतरांस त्याची जाणीव काय ? शेटीबासारखा हुशार व चौकस माणूस मुलाबाळांसह रात्रंदिवस राबत असून त्याचे हाल होत आहेत हे पाहून मळे-

वाल्याने त्याला फुलांचा धंदा करण्यास सुचविले. कारण त्यावेळी पुणे शहरात त्या धंद्यास विशेष चलती होती.

## गोरे 'फुले झाले'

शेतीचा मजूर हा मरेपर्यंत मजूर असतो. पगारात वाढ होत नाही किंवा त्याला पगारी रजाहि मिळत नाही. फार काय ? शेतात राबतांना काही इजा झाली अगर आजारी पडला तर त्याच्या रोजंदारीत खाडे (बिनपगारी) धरले जातात. असल्या गोष्टींचा शेटीबाच्या चौकस बुद्धीने विचार केला. मळेवाल्याने सुचविल्याप्रमाणे शेतमजुरी सोडून त्यांनी फुलांचा धंदा करण्याचे ठरविले.

पुणे शहरात फुलांच्या धंद्यास चलती होती. खुद्द पेशव्यांच्या वाड्यात दररोज शेकडो हार लागत. शहरात प्रामुख्याने ब्राह्मण वस्ती होती. ब्राह्मणांस ते सरकार विशेष मदत करीत होते. त्यामुळे हार, डोक्यातील वेण्या यांचा खप मोठ्या प्रमाणात होत असे. सुखवस्तू व श्रीमंत लोक सायंकाळी हातात फुलांचे गजरे घालून फिरण्यास निघत. त्यामुळे शेटीबाचा फुलांचा धंदा चांगल्या प्रकारे वाढीला लागला. तिन्ही मुले मेहनती असून हुशार होती. त्यांची मदत होऊ लागली. खुद्द पेशव्यांच्या वाड्यात शेटीबाचे हार जाऊ लागले. या धंद्यातील कौशल्यामुळे त्यांना लोक फुले म्हणू लागले. त्यामुळे गोरे हे नाव मागे पडून फुले हे नाव रूढ झाले. शेटीबाने शेतीवाडी संपादन केली. त्याच्या सर्व मुलांची लग्ने झाली व संसाराचा गाडा सुरळीत चालू लागला.

## जन्मस्थान पुणे

**पवित्र ते कुळ, पावन तो देश । तेथे हरीचे दास जन्म घेती ।।**

**—तुकाराम महाराज**

भारताच्या इतिहासात पुणे प्रांत व पुणे शहर यांची पुण्यायी विशेष आहे. याच प्रांताने सर्वश्रेष्ठ अशा नररत्नास जन्म दिला आहे. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज, श्री छत्रपती शिवाजी महाराज व महात्मा जोतीराव

फुले या त्रयीच्या अवतारकार्यामुळेच महाराष्ट्र पावन होऊन अखिल भारत उजळून निघाला.

सन १५९८ साली संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचा जन्म झाला. वेदान्त धर्माच्या नावाखाली सनातन सत्य धर्माची तत्त्वे रूढीधर्माच्या भाराखाली दडपली गेली होती. ती अखिल मानव जातीसाठी त्यांनी उघडी ठेवली. परमेश्वरप्राप्तीचा अधिकार सर्व जातींच्या व पंथांच्या लोकांना (स्त्री–पुरुषास) समान आहे. परमेश्वराच्या भक्तीसाठी मध्यस्थाची अगर गुरू म्हणविणारांची मुळीच गरज नाही. वर्णाश्रम हा जातींवर नसून तो गुणांवर आहे. देवास सर्व समान आहेत.

**ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळाही अधिकार ।।**
**बाळे नारी नर । आदिकरोनी वेश्याही ।।**

कृत्रिम उच्च नीच भेद भक्तीत आडवे येत नाहीत, वगैरे मानवी कल्याणाच्या तत्त्वांचा प्रसार अभंगांद्वारे स्वानुभवाच्या आधारे तुकाराम महाराजांनी केला. त्यांच्या अभंगात सकल धर्माचे सारसर्वस्व आहे. भक्तिभावाने त्यांनी अखिल महाराष्ट्र खडबडून जागा केला. हिंदू समाजात धार्मिक स्वास्थ्य व स्वधर्मप्रेम निर्माण केले. शिवप्रभूच्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यास त्यांनी अनुकूल असे जिवंत वातावरण निर्माण केले होते. त्यांच्या अभंगांच्या गाथ्याचा सुमारे पन्नास लाख प्रतींचा प्रसार झाला आहे. त्यांच्या अभंगवाणीचे भाषांतर अनेक पाश्चात्य देशात झालेले आहे. पृथ्वीच्या पाठीवरील अनेक देशात त्यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार होत आहे. अशा संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांचे जन्मस्थान त्याच पुणे प्रांतात देहू हे गाव आहे. त्यांच्या कीर्तनाचा योग पुणे शहरास अनेकदा लाभला होता. इसवी सनापूर्वी ३२७-मध्ये भारतातील सुप्रसिद्ध अशा पौरस ह्या राजाचा सिकंदर बादशहाने पराभव केला. त्या काळापासून भारत हा परकीयांपुढे शरणांगती पत्करून गुलामी पचविणारा देश आहे हे लांछन अनेक शतके भारताच्या माथ्यावर होते. ते नष्ट करण्याचे प्रथमचे श्रेय श्री छत्रपती शिवाजी महाराज यांनाच आहे. ज्याचे चरित्र व चारित्र्य जगातील इतिहासकारांस आकर्षित करीत आहे अशा शिवप्रभूचा जन्म पुणे प्रांतात सन १६२७ मध्ये शिवनेरी किल्ल्यावर झाला. त्यांचे बालपण पुणे शहरात गेले आहे.

आजपर्यंत जगात जे धर्मसंस्थापक, राष्ट्रवर्धक व समाजोद्धारक झाले अशांच्या मालिकेत विशेष शोभून दिसणारे महात्मा जोतीराव फुले यांचा जन्म पुणे याच शहरी सन १८२७ साली झाला.

**जन्म**

इ. सन १६२७ हे साल ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाचे आहे. तद्वत १८२७ साल मानव जातीच्या कल्याणाच्या दृष्टीने महत्वाचे आहे. याच वर्षी गोविंदराव व चिमणाबाई यांच्या पोटी पुणे शहरी जोतीबा तारीख ११ एप्रिल सन १८२७ रोज बुधवार चैत्र शुद्ध १५ शके १७४९ या दिवशी जन्मास आले. जोतीबांच्या जन्माऐवजी 'नवा मनूच जन्मास आला' हे म्हणणे अधिक सयुक्तिक दिसेल. **"जगाचे कल्याण व्हावे एवढयाकरिता गौतम बुद्धाचा जन्म झाला, असे कोणी म्हटले आहे ते अगदी बरोबर आहे." (स्वा. विवेकानंद).** पददलित मानव, अस्पृश्य, स्त्रिया यांच्या उद्धाराच्या नव्या युगास आरंभ करण्यासाठी भारतात हा पहिला महात्मा पुणे शहरात जन्मास आला. (म. जोतीराव फुले यांची जन्मतारीख द. स. झोडगे पुणे यांनी शोधली आहे.)

## आई चिमणाबाई

**हरिभक्त जन्मे तिचे कुशी। अवघे त्रैलोक्य वंदिती तिशी।।**

कनकाईने संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांस जन्म दिला. जिजामातेच्या पोटी शिवाजी महाराजांनी जन्म घेतला. चिमणाबाईच्या उदरी महात्मा फुले आले. या तीन मातांनी नरश्रेष्ठास जन्म देऊन मानव जातीस उपकृत केले आहे. चंद्रसूर्य जोपर्यंत आहेत तोपर्यंत या श्रेष्ठ मातांसंबंधी समाजाच्या मनात आदर व कृतज्ञता जिवंत राहील.

कोल्हापूरजवळ जोतीबाच्या डोंगरावर जोतीबा या देवतेचे सुप्रसिद्ध स्थान आहे. चैत्र शुद्ध पौर्णिमेस या देवतेची यात्रा भरत असते. बहुजन-समाजाचे हे आराध्य दैवत आहे. चिमणाबाईची जोतीबा देवतेवर भावना होती. आपणास पुत्रलाभ यात्रेच्या दिवशीच झाला या धार्मिक कल्पनेने मुलाचे नाव जोतीबा ठेवण्यात आले. यावेळी गोविंदरावांची सांपत्तिक स्थिती चांगली असल्याने बारसे वगैरे समारंभ मोठ्या थाटामाटाने केला.

## मातेचा वियोग

**जिचे हाती पाळण्याची दोरी। ती जगाते उद्धरी।।**

वरील म्हण दैवाने खोटी ठरविली. जिने प्रत्यक्ष वैराग्यास जन्म देऊन त्यागाचे दूध पाजले व मानव धर्माचे आच्छादन ज्याच्यावर घातले अशी ती असामान्य माता चिमणाबाई जोतीबाच्या जन्मानंतर सुमारे नऊ महिन्यांनी देवाघरी गेली. ह्या दुर्धर दैवी आपत्तीने गोविंदराव अगदीच गडबडून गेले. परंतु एका थोर अशा नरवीरास जन्म देणारा तो पुरुष धैर्यवान व निश्चयी होता. पूर्ण विचारान्ती जोतीबाचे पालनपोषण करून त्याला वाढविण्याचे त्यांनी ठरविले. जोतीबासाठी स्वतःच्या सुखास व वासनेस त्यांनी तिलांजली देण्याचे ठरविले. जोतीबा हेच आपले सर्व सुख असे मानून त्याच्यासाठी हवे ते कष्ट गोविंदराव घेऊ लागले. दैवी आपत्तीच्या काळजीत असता दैवयोगाने एका हुशार बाईची गाठ पडली. ती बाई माळी समाजातील असून तिचे नाव गुणाबाई होते. गुणाबाई ही नावाप्रमाणेच खरोखरच गुणवान होती. पुण्यातील सुशिक्षित व मिशनरी लोकांशी तिचा परिचय होता. ती निरक्षर होती. परंतु हुशारी व चौकसपणा तिच्या ठिकाणी विशेष होता. ती धार्मिक वृत्तीची होती. अशा योग्य बाईकडे जोतीबास सांभाळण्याचे व पालनपोषणाचे काम गोविंदरावांनी दिले. जोतीबाचा सांभाळ अगदी वात्सल्याने गुणाबाई करू लागली. त्याच्यासाठी तिने आपल्या जिवाचे अगदी रान केले. भावी काळात जो अत्यंत श्रेष्ठ व कर्तृत्ववान महापुरुष ठरणार अशाचे पालनपोषण करण्याचा योग परमेश्वराने आपणांकडे दिला आहे अशी भावना नकळत जणू तिला जागी करीत होती. "आईची माया दाईजवळ नसते" ही म्हण गुणाबाईने सर्वस्वी खोटी ठरविली. जन्म देणारे आईबाप यांचे जेवढे उपकार समाजावर असतील त्यापेक्षा कितीतरी पटींनी जास्त गुणाबाईचे आहेत. कारण समाजोद्धारक असा पुरुष वाढविण्याचे सर्व श्रेय त्या अज्ञात बाईस आहे. दीनोद्धाराची प्रत्यक्ष ज्योत म्हणजे जोतीराव! ती प्रज्वलित करण्याचे महान कार्य गुणाबाईने केले.



## प्रकरण दुसरे

# बालपण व शिक्षण

साहूनिया टाकी घाये । पाषाण देवचि झाला पाहे ।।
( तुकाराम महाराज)

गोविंदरावाचे अपत्यप्रेम व गुणाबाईची कर्तव्यजागृती यामुळे जोतीबाची योग्य अशी जोपासना झाली. जन्मतःच पिंड चांगला, हाडपेर मजबूत. यामुळे वयाच्या सहाव्या सातव्या वर्षी जोतीबा हे खऱ्या वयापेक्षा मोठे भासू लागले. गोविंदराव हे अत्यंत विचारी असून बुद्धीने हुशार होते. शेतकऱ्याच्या जीवनाचा त्यांना पूर्ण अनुभव होता. ते पिढीजात शेतकरी होते. बालपणी अनवाणी पायाने शेळ्या-गुरे त्यांनी राखली होती. प्रत्यक्ष शेतीत त्यांनी घाम गाळला होता. त्यामुळे शेतकऱ्यांच्या हलाखीची व कष्टांची प्रत्यक्ष जाणीव त्यांना होती. रात्रंदिवस जनावरापेक्षा जास्त कष्ट करावेत, रक्ताचे पाणी करून घाम गाळावा, उपाशी पोटी शेतात राबावे, तरी अंगभर वस्त्र व पोटास अन्न मिळत नाही. शेतकऱ्याची दीन-दीन स्थिती चोहोंकडे दिसत आहे. त्याचे खरे कारण त्याचे अज्ञान या विचाराने जोतीबास शाळेत घालण्याचे गोविंदरावाने ठरविले. परंतु ती गोष्ट प्रत्यक्ष अमलात येण्यास त्या काळी अनेक अडचणी होत्या.

पुणे हे पेशव्यांच्या राजधानीचे ठिकाण होते. तेथे ब्राह्मण्य अत्यंत जागृत असे होते. राज्य गेले तरी जातिभेद भुताच्या स्वरूपात सर्वत्र नाचत होता. पुण्यात सार्वजनिक शाळा सरकारने सुरू केली तरी तिच्यात सर्वच स्पृश्य जातीस प्रवेश मिळणे बरेच कठीण होते असे रा. ब. तर्खडकर यांच्या चरित्रात दिसत आहे. "मुंबईमध्ये सुशिक्षित लोकांचे ऐकून इंग्रज सरकारने मराठा, माळी, कोळी, भंडारी वगैरे जातींची मुले शाळेतून काढून टाकली. कारण लोक शिकले तर आपले महत्त्व कायम रहाणार नाही" यावरून इंग्रज सरकारचे धोरणसुद्धा मागासलेल्या लोकांच्या शिक्ष-

णाच्या बाबतीत कसे प्रतिकूल होते हे कळेल. " मुंबई इलाख्यात मौंट स्टुअर्ट एल्फिस्टन यांनी अर्वाचीन शिक्षणाचा पाया घातला. त्यांची दृष्टीहि मुख्यत: राजकीय होती. त्यामुळे उच्चवर्णीयांच्या धर्मभावनांना ते फार जपत असत. समाजाच्या वरच्या थरात पाश्चात्य विद्येचा व संस्कृतीचा प्रसार अगोदर व्हावा अशी त्यांची अपेक्षा होती. बहुजनसमाजाच्या शिक्षणाबद्दल मात्र त्यांना तेवढी उत्कंठा नव्हती. उलट खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांना सरकारने हात राखून उत्तेजन द्यावे, असा त्यांचा अभिप्राय होता."

इ. स. १८१८ मध्ये पेशव्यांचे राज्य इंग्रजांनी घेतले तरी शिक्षणाचे पाऊल त्यांनी मंद गतीने उचलले. याला कारण पुढारलेल्या वर्गाचा विरोध असणे शक्य आहे. हे पुढील माहितीवरून स्पष्ट होत आहे. " इ. स. १८४९ मध्ये जिल्हा पुणे शाळा २२ मुले १११३, अहमदनगर जिल्हा शाळा २९ मुले १६४५, सोलापूर जिल्हा शाळा १४ मुले ६३६, खान्देश जिल्हा (त्यावेळचा) शाळा ९ मुले ५०४. याप्रमाणे इतर जिल्ह्यांचे प्रमाण आहे."

सन १८३४ च्या सुमारास पुण्यास मागासलेल्या जातींच्या विद्यार्थ्यांस शिक्षणाच्या बाबतीत किती तरी अडचणी असतील. अशाहि परिस्थितीत गोविंदरावांनी जोतीबास शाळेत पाठविण्याचे ठरविले. एका गावठी शाळेत त्यांचे नाव दाखल केले. जोतीबा शाळेत जाऊ लागले. गोविंदरावांचा आनंद गगनात मावेनासा झाला. कारण त्यांच्या घराण्यात यापूर्वी कोणासहि शिक्षणाचा गंध लागला नव्हता." शिक्षण हा तिसरा डोळा" ही म्हण त्यांना परिचित होती. आपले आजोबा निरक्षर होते. त्यांच्या अज्ञानाचा फायदा कुलकर्णी सावकारांनी घेतला. जिवापलीकडे जतन केलेली काळी आई केवळ लेखणीच्या बळावर सावकारांनी हरण केली. घराणे देशोधडीस लागले. गोरगरिबांचे दारुण कष्ट व जमीन शिकलेले लोक सहज हरण करू शकतात याची जाणीव त्यांना होती.

### शाळेत

युगप्रवर्तक, राष्ट्रोद्धारक, धर्मसंस्थापक, समाजोद्धारक आजपर्यंत जे निर्माण झाले ते जन्माबरोबरच काही विशिष्ट गुण घेऊन येतात, हे इतिहासावरून स्पष्ट होत आहे. जोतीबांची एकंदर हुशारी पाहून त्यांचे शिक्षक

आश्चर्यचकित होत. जोतीबा शिक्षण घेत नसून शिक्षण होऊनच त्यांच्याकडे धाव घेत आहे असा भास शिक्षकांस होत असे. आपल्यापेक्षा कोणीहि श्रेष्ठ होऊ नये हा मनुष्यस्वभाव! परंतु आपल्या मुलाने आपल्यापेक्षा सवाई व्हावे अशी त्यांची नैसर्गिक भावना! तद्वत खरा शिक्षक हीच इच्छा करतो-शिष्याने आपल्यापेक्षा श्रेष्ठ बनावे. या तत्त्वानुसार जोतीबांचे विशिष्ट गुण पाहून शिक्षक त्यांना मनापासून शिकवित असत.

## दिवाणजी व दिवाण

शेटजीचा दिवाण (कारकून) व राजाचा दिवाण (प्रधान) हे भयंकर पाताळयंत्री असतात. मालकास केव्हा गोता देईल याचा भरंवसा नसतो. भारताच्या इतिहासात दिवाणांच्या बाबतीत अत्यंत भयंकर अशी उदाहरणे असून ती आश्चर्यकारक आहेत. इ. स. ६५० च्या सुमारास सिंधूराज साहसीचे राज्य 'चच' नावाच्या ब्राह्मण दिवाणाने बळकावून मुसलमानांस भारतावर येण्याचा मार्ग मोकळा केला. इ. स. १२९३ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने देवगिरीचे राज्य खिळखिळे केले. याला यादवांचा दिवाण हेमाद्री कारणीभूत असावा असे काहींचे म्हणणे आहे. गुजराथचा राजा कर्णराय याचे राज्य अल्लाउद्दिनास जिंकता आले याचे कारण कर्णरायाचा दिवाण. सन १२९९ मध्ये रतनभोरचा बळकट किल्ला अल्लाउद्दिनास मिळवून देण्यास राजा हंबीररावाचा दिवाण कारणीभूत. विजयनगरचा राजा सदाशिवराय हा दिवाणाच्या बंदीतच होता. इ. स. १६८० मध्ये शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांच्या दिवाणांनी छत्रपती संभाजीच्या विरुद्ध कट करून राजारामास गादीवर बसविले. सन १७४९ मध्ये साताऱ्याचे शाहू छत्रपतींचे राज्य पेशव्यांनी घेऊन छत्रपती जवळजवळ नाममात्र केले. इ. स. १८८२ मध्ये कोल्हापूरचे छत्रपतींस चौथे शिवाजी यांचे दिवाण बर्वे यांनी मानवी मनास न शोभणारे कृत्य छत्रपतींविरुद्ध केले. अशी अनेक उदाहरणे इतिहास सांगू शकेल. तद्वत दिवाणजी (कारकून) मालकास केव्हा कसा बद्सल्ला देईल याचा नियम नसतो.

## कारकुनाचे कारस्थान

"इंग्रजांच्या मनात असलेल्या तिरस्कार बुद्धीहूनहि जातिद्वेषा-

पासून उत्पन्न झालेली आमची तिरस्कार बुद्धी अधिक तीव्र आहे.

– स्वा. विवेकानंद

जोतीबांची अभ्यासातील प्रगती व हुशारी पाहून गोविंदरावांचा ब्राह्मण कारकून अगदीच बैचेन झाला. परंपरेचा वर्णद्वेष व जातिमत्सर त्याच्यात जागृत झाला. माळी जातीतील मुलाने शिक्षण घेणे हा आपल्या श्रेष्ठपणावर घालाच आहे अशा विचाराने जोतीरावांच्या शिक्षणात व्यत्यय आणण्याचे प्रयत्न त्याने सुरू केले. मुलास शिक्षण देणे हे तुमच्या घराण्यास बरे नाही. कारण शिक्षणामुळे शेतीचे व कष्टांचे काम तो करू शकणार नाही. तो आळशी व ऐदी बनेल. त्यामुळे त्याचा संसार धड होणार नाही. वगैरे प्रकारे गोविंदरावांस कारकुनाने सांगितले. त्याच्या सांगण्याकडे गोविंदरावांनी लक्ष दिले नाही व पुढेहि ते देणार नाहीत अशी कारकुनाची खात्री झाल्यावर त्याने पापपुण्याचे, स्वर्ग–नरकांचे, काल्पनिक धार्मिक गुलामगिरीचे अस्त्र गोविंदरावावर सोडण्याचे ठरविले. पेशवाई काळातील स्वर्ग–नरकांचे माजलेले थोतांड गोविंदरावने प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले होते. त्यामुळे धार्मिक भावनेच्या बाबतीत त्यांचे मन दुबळे होऊन भित्रे बनले होते. त्याची कल्पना कारकुनास होती. त्याच अस्त्राचा उपयोग त्याने अखेर गोविंदरावांवर केला. तो म्हणाला," तुम्ही मुलाला शाळेत घातले हेच धर्माच्या विरुद्ध केले. साता-समुद्राच्या पलीकडून इंग्रज या देशात आले. ते नुसते राज्य करण्यासाठीच आले नसून त्यांचा खरा हेतू शिक्षणाच्या द्वारे, तुम्हा शूद्र लोकांस ख्रिश्चन करणे आहे. म्हणून त्यांनी या देशात शाळा काढण्यास सुरुवात केली. पेशवाईत अशा शाळा मुळीच नव्हत्या. कारण शास्त्राने शूद्रास शिक्षण घेण्याची मनाई केली आहे.' ज्योतिबाने शिक्षण घेतले. तो हुशार झाला व शेवटी ख्रिस्ती बनला तर तुम्हीच काय, पण तुमच्या सात पिढ्या नरकात जातील." ह्या काल्पनिक नरकवासाच्या भीतीने गोविंदरावांनी जोतीबास शाळेतून काढले.

**"तुमचा इतिहास, तुमचे वाङ्मय, तुमच्या दंतकथा आणि तुमची शास्त्रेपुराणे या साऱ्यांनी मिळून लोकांस अगदी घाबरून टाकण्याचा उद्योग केला. तू अमक्या नरकात जाशील. यमधर्म तुला अमुक शिक्षा करील. अशा भेसूर गोष्टी आजपर्यंत लोकांच्या मनावर सारख्या पडत आहेत."**

**– स्वा. विवेकानंद**

हिंदूंच्या अनेक पुराण ग्रंथात स्वर्गसुख व नरकवास यांचे वर्णन आहे. त्यामुळे हिंदू समाज व हिंदू धर्म लुळापांगळा बनला. स्वर्ग व नरक यांचा प्रत्यक्ष पुरावा आजपर्यंत कोणासहि दाखविता आलेला नाही. पुराणकारांनी त्याचे वर्णन करून जनतेत गोंधळ मात्र निर्माण केला. गोविंदरावांच्या कारकुनाने केवळ जातिद्वेष म्हणून जोतीबास शाळेतून काढण्यासाठी असे प्रयत्न केले.

मागासलेल्या वर्गातील लोकांनी शिक्षण घेऊ नये असे प्रयत्न विसाव्या शतकाच्या सुरुवातीस पुढारलेला वर्ग करीत असे. रूढीधर्माच्या दडपणामुळे बहुजनसमाजातील लोक कोणत्याहि गोष्टीस सुरुवात करतांना ग्रामजोश्यास विचारीत– मुलाच्या नशिबात विद्या आहे किंवा नाही. याला शाळेत पाठवू किंवा नको असे भटजीस विचारीत. मुलाचा हात पाहून भटजी सरळ सांगत, याच्या नशिबात विद्या नाही. असे ठराविक उत्तर देऊन मानसिक हिंसा करीत व जातिद्वेषास उजाळा देत. सन १९०८ सालात प्रस्तुत लेखकाच्या आईने ब्राह्मणास हात दाखवून याला शाळेत घालू किंवा नको असा प्रश्न केला. भटजीने ठराविक उत्तर दिले, ' याच्या नशिबात विद्या नाही. शाळेत पाठवू नये. ' त्यामुळे काही दिवस लोकांची ढोरे सांभाळावी लागली. मातृप्रेम जागे झाले. आईने भटजीच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून शाळेत पाठविले. त्या काळी मास्तर बहुजनसमाजातील विद्यार्थ्यांस कठोर शिक्षा करीत. अशा वेळी आमची अशी समजूत व्हावी की, आपल्या नशिबात विद्या नाही. अशा स्थितीत कसे तरी फक्त प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले.

## भवितव्यता

गोविंदरावास नरकवासाची भीती दाखवून ब्राह्मण कारकुनाने जोतीबास शाळेतून काढण्याचे पुण्य संपादिले होते. शिक्षण सोडून जोतीबा मळ्यात काम करू लागले. जन्मतःच ते कर्मयोगी होते. कष्ट करण्यासाठीच जणू त्यांचा जन्म होता. बालवयात जिवापाड श्रम ते करीत. प्रत्येक कामात त्यांचे बुद्धिकौशल्य दिसून येई. बागेचे काम करतांना अंगातून घामाच्या धारा निघत. ते पाहून गोविंदरावांचे मन कळवळून येत असे. फिरून शाळेत घालावे असे त्यांचे मन त्यांना सांगत असे. परंतु काल्पनिक नरकवासाच्या भीती-

मुळे तसे धैर्य त्यांना होत नसे. खोटी धार्मिक भावना साध्याभोळ्या लोकांच्या गळयात बांधून पुढारलेल्या वर्गाने महापाप केले. कारण अव्वल इंग्रजीत हुशार व लायक विद्यार्थ्यांचे जे नुकसान झाले असेल, त्याची कल्पना करणे अशक्य आहे. हातात कुदळ, फावडे (खोरे) घेऊन उन्हातान्हात रक्ताचे पाणी करणारा हाच जोतीबा राष्ट्राचा पहिला महात्मा ठरणार; हजारो वर्षांपासून चालत आलेल्या धार्मिक व सामाजिक गुलामगिरीविरुद्ध जाहीर बंड पुकारून पहिला क्रांतिकारक होणार; स्त्रिया, विधवा, अस्पृश्य व पददलित यांचा उद्धारकर्ता बनणार; समता, समभाव व मानवी धर्म यांच्या पुरस्काराचो पताका हाच उभारणार; सर्व मानव प्राण्यासंबंधीचा समभाव याच्याच मुखावाटे निघणार; वर्णाश्रम धर्माचा कृत्रिम खोटेपणा दाखविणारा पहिला समाजोद्धारक म्हणून दिगंत कीर्तीचा धनी म्हणून गाजणार; विद्यादेवीच्या मंदिरात सर्व जातींच्या व पंथांच्या स्त्रीपुरुषास घुसण्याचा समान हक्क आहे असे निधड्या छातीने गर्जून सांगणार; महाराष्ट्राचा नव्हे तर अखिल भारताचा आदर्श असा पुरुष म्हणून मानवी मनात निरंतरचे आदराचे स्थान मिळविणार असले भविष्य त्यावेळी प्रत्यक्ष भवितव्यतेने जरी सांगितले असते तरी त्याच्यावर कोणाचा विश्वास बसला नसता. भवितव्यता ही आपल्या अंतःकरणातील गूढ गोष्टींचा थांगपत्ता कोणासहि लागू देत नाही. म्हणून अशा गोष्टी आश्चर्यकारक ठरतात. या भवितव्यतेची कल्पना त्या काळी गोविंदरावांच्या कारकुनास कशी येणार?

## परधर्मीयांच्या उदार धोरणामुळे शिक्षणाचा योग

**"माझे कोटयवधी बांधव निरक्षर आणि बुभुक्षित असता त्यांच्याच खर्चाने सुशिक्षित होऊन त्यांची यत्किंचितही काळजी न करणाऱ्या प्रत्येकास मी देशद्रोही समजतो."—स्वा. विवेकानंद**

गोविंदरावांच्या बागेजवळ गफारबेग मुनसी या नावाचे मुसलमान गृहस्थ रहात होते. उर्दू व फारसी ह्या भाषा त्यांना अवगत होत्या. ते दयाळू व परोपकारी होते. त्याच भागात जेलीटसाहेब हे इंग्रज गृहस्थ रहात होते. त्यांची वृत्ती मिशनरी असून परोपकारी होती. त्या दोघांचा स्नेह होता.

जोतीबास एका प्रसंगी त्यांनी विचारले, 'तू शाळेत का जात नाहीस ?' या प्रश्नाने जोतीबांचे शिक्षणासंबंधीचे प्रेम डोळ्यातून ओघळून बाहेर आले. ते म्हणाले," वडलांनी मला शाळेतून काढून घेतले. माझी शिक्षण घेण्याची फार इच्छा आहे. सवड सापडताच मी वाचन करीत असतो." जोतीबाचे शिक्षणविषयक प्रेम पाहून त्या उभयतांनी गोविंदरावांची मुद्दाम भेट घेण्याचे ठरविले. भेटीत गोविंदरावास मुलाचे शिक्षण बंद करण्याचे कारण त्यांनी विचारले. गोविंदराव म्हणाले," मुलास शाळेत घातले होते, परंतु शिक्षणामुळे धर्म बुडेल असे आमच्या ब्राह्मण कारकुनाने सांगितल्यावरून त्याचे शिक्षण बंद केले." मुनसी म्हणाले, "शिक्षण धर्माच्या आड येत नाही. आमच्या धर्माची अशी आज्ञा आहे की, कुराण वाचण्याचा प्रत्येक मुसलमान स्त्र पुरुषास समान हक्क आहे. शिक्षणामुळे धर्माचे खरे ज्ञान होते." जेर्लीटसाहेब म्हणाले, "शिक्षण देऊन इंग्रज तुमच्या मुलांना ख्रिश्चन बनविणार ही चुकीची समजूत तुमच्यातील पुढारी वर्ग करीत आहे. यात त्यांची लबाडी आहे. सरकारने सुरू केलेल्या प्रत्येक शाळेत ब्राह्मण लोक गर्दीने आपल्या मुलांना घुसवीत आहेत. या गोष्टींचा विचार करा व मुलाला शाळेत पाठवा."

**"देशाच्या ज्या ज्या भागात इंग्रज सरकारने नव्या पद्धतीचे शिक्षण सर्रास सुरू केले आणि द्रव्यार्जनाचे नवे नवे मार्ग उघडले त्या त्या भागातील ब्राह्मण आपला वंशपरंपरागत चालत आलेला पुरोहितपणाचा धंदा सोडून या नव्या मार्गाकडेच धावत सुटले."—स्वा. विवेकानंद**

त्या परधर्मीय लोकांचे सत्य सांगणे गोविंदरावास पटले. त्यांनी जोतीबास फिरून शाळेत घालण्याचे ठरविले. राष्ट्राचा सर्वश्रेष्ठ असा महात्मा निर्माण करायचे खरे श्रेय या दोन परधर्मीयास पर्यायाने देणे भाग आहे.

हिंदू समाजाची उभारणी जातिभेद व वर्णभेद यांवरच उभारलेली आहे. त्यामुळे वरिष्ठ वर्ग स्वजातीचे महत्त्व कायम रहावे म्हणून इतर जातींच्या शिक्षणास पूर्वापार विरोध करीत आहे. याबाबत कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज यांनी एका शिक्षण परिषदेत सांगितले, "पूर्वी ज्ञान संपादण्याचे इतके कठीण होते की, साताऱ्च्या महाराजांनासुद्धा (अर्थात प्रतापसिंह महाराज) मध्यरात्री आपले धडे तयार करावे लागत, मग

इतरांची काय कथा ?" इतर जातींच्या शिक्षणास विरोध करणे पुढारलेल्या वर्गाचे जणू ध्येयच ठरले होते असे वाटते.

महात्मा जोतीबांनी सार्वत्रिक शिक्षणप्रसाराचा पाऊस महाराष्ट्रभर पाडला. त्यामुळे ज्ञानगंगा खेड्यापाड्यातूनसुद्धा खळखळून वाहू लागली. अशा विसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळी हव्या त्या मार्गांनी बहुजनसमाजाच्या शिक्षणप्रसारास वरिष्ठ वर्ग विरोध करीत होता. ज्या शिवप्रभूंने अशक्य भासणारी गोष्ट शक्य करून जागृत असा चैतन्यठेवा राष्ट्रासाठी दिला त्या छत्रपती शिवाजी महाराजांविषयी अत्यंत गैरसमज पसरविण्याचा राष्ट्रघातकी प्रयत्न केला. शिवाजी महाराजांस लिहिता वाचता येत नव्हते, फार काय त्यांना आपली सहीसुद्धा करता येत नव्हती, लिहिणेवाचणे ही कारकुनाची कामे आहेत असे क्रमिक पुस्तकातून मुलांना शिकविण्यात येत होते. यात मुख्य उद्देश शिवाजी महाराजांसारख्या सर्वश्रेष्ठ पुरुषास लिहिता-वाचता येत नव्हते, मग आपल्या मुलास शिक्षण देण्याची काय आवश्यकता अशी बहुजनसमाजाची भावना व्हावी हाच होता. प्रस्तुत लेखकाने मराठी चौथ्या इयत्तेत सन १९१३ साली अभ्यासक्रमासाठी असलेल्या क्रमिक पुस्तकात हे वाचले आहे.

विद्यामंदिराची द्वारे सताड उघडण्यासाठी प्रथम आरोळी जोतीरावांनी ठोकली. तिचा ध्वनी विसाव्या शतकाच्या सुमारास खेड्यापाड्यापर्यंत गोहोचला. त्यामुळे बहुजनसमाज शैक्षणिक बाबतीत जागृत होऊ लागला. आपल्या मुलांना शाळेत पाठवू लागला. अशा वेळी पुढारलेल्या वर्गातील शिक्षक मुद्दाम कठोर शिक्षा करून विद्यार्थ्यांना शाळा सोडण्यास भाग पाडीत अगर निष्कारण अपमानकारक शब्द बोलून शिक्षणाबाबत विद्यार्थ्यांची मने बेचैन करीत. अशा रीतीने विद्यार्थ्यांची संख्या शाळेत कमी होऊ लागली. तरी त्याकडे वरिष्ठ ब्राह्मण अधिकारीहि दुर्लक्ष करीत. वरिष्ठ वर्गाची ही प्रवृत्ती विसाव्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत कमीअधिक प्रमाणात सर्वत्र दिसत होती.

### इंग्रजी शाळेत

तुका म्हणे आले समर्थांचे मना ।
तरी होय राणा रंका त्याचा ।।

परमेश्वरी संकेतास मानवी मनाने कितीहि मोडता घातला तरी त्याचे प्रयत्न निष्फळ ठरतात. भगवान बुद्धाने वैराग्याच्या मार्गाचा अवलंब करू नये म्हणून त्याच्या प्रत्यक्ष पित्याने हवे ते प्रयत्न केले. शिवाजी महाराजांनी स्वराज्यस्थापनेच्या कार्यास लागू नये म्हणून दादोजी कोंडदेवाने मोडता घातला. आर्य समाजाचे संस्थापक दयानंद सरस्वती यांनी आपले ध्येय सोडावे म्हणून त्यांच्या वडलांनी हवे ते प्रयत्न केले. परंतु परमेश्वरी इच्छेमुळे त्यांचे सर्व प्रयत्न लुळे पडले. त्याप्रमाणे गोविंदरावांच्या कारकुनाने आपल्या जिवाचा आटापिटा केला, तरी जोतीबा शिक्षणाच्या मार्गास लागले.

सन १८४१ साली ज्योतीबांनी मिशनरी शाळेत प्रवेश केला. त्या वेळी त्यांचे वय सुमारे पंधरा वर्षांचे होते. इतर मुलांच्या मानाने ते मोठे होते. शिवाय वडिलांनी लग्नाची बेडीही अडकावून दिली होती. लहान मुलात बसण्यात त्यांना संकोच वाटू लागला. हे शिक्षकांच्या लक्षात आले. जोतीबास त्यांनी इंग्रजी पहिल्या इयत्तेत बसविले. जोतीबाच्या इंग्रजी शिक्षणास सुरुवात झाली.

शिक्षणासाठी जोतीबांनी नेटाने प्रयत्न केले. सालोसाल ते उत्तम प्रकारे पास होऊ लागले. इंग्रजांचे राज्य म्हणून त्यांनी इंग्रजी भाषेवर जोर देण्याचे ठरविले. शाळेच्या वेळानंतर ते सकाळ–संध्याकाळ वाचन करू लागले थॉमस पेनचे 'मानवी हक्क', मार्टिन ल्यूथर, जॉर्ज वॉशिंग्टन, नेपोलियन बोनापार्ट वगैरे थोरांची चरित्रे त्यांनी इंग्रजीतून वाचली. मार्टिन ल्यूथरच्या चरित्राचा त्यांच्या तरुण मनावर विशेष परिणाम झाला. देव आणि मनुष्य यांच्यामध्ये धर्मगुरूची दलाली नको, या महान तत्त्वाचा ल्यूथरने कृतीने पुरस्कार केला. समाजसुधारणेसाठी त्याने जीवापाड प्रयत्न केले. या तत्त्वासाठी प्रत्यक्ष मृत्यूच्या भेटीसहि त्याची तयारी होती. आपल्या अतुल धैर्याने त्याने रूढीधर्मास जबरदस्त धक्का दिला. वगैरे तत्त्वांचा जोतीबा मनाशी विचार करू लागले. मराठी भाषेतील श्री छत्रपती शिवाजी महाराज यांचे चरित्र व भागवतधर्मीय संतांचे वाङमय त्यांनी वाचले. शिवाजी महाराजांच्या ठिकाणी त्यांची उपजत भावना होती. त्यामुळे त्यांच्या मनावर नकळत सुसंस्कार होऊन ध्येय रुजण्यास सुरुवात झाली. संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांच्या

अभंगांमुळे सामाजिक समतेची दृष्टी त्यांच्यात उदय पावू लागली. शिक्षणाबरोबर त्यांनी वाचनहि मोठ्या प्रमाणावर केले.

## जिवलग ब्राह्मण मित्र

जोतीबांच्या ठिकाणी संग्राहक शक्ती मोठ्या प्रमाणावर होती. त्यामुळे त्यांच्याभोवती सर्व जातीतील व पंथातील मित्रसंग्रह मोठ्या प्रमाणावर जमला होता. त्यांपैकी सदाशिव गोवंडे, मोरोपंत वाळवेकर व सखाराम परांजपे हे जातीने ब्राह्मण असून जोतीबांचे अत्यंत जिवलग मित्र होते. श्री शिवप्रभूचे तान्हाजी, येसाजी व बाजी फासलकर हे तिघे जिवलग मित्र होते. त्यांच्याच बळावर स्वराज्याची इमारत पायापासून कळसास त्यांनी पोहोचविली. शिवप्रभूच्या यशाचे खरे वाटेकरी तेच! तद्वत महात्मा जोतीराव यांच्या एकंदर कार्याच्या यशाचे वाटेकरी ते तिघे ब्राह्मण मित्रच !

## इंग्रजांविरुद्ध बंडाचे विचार

शाळेत असतांना जोतीरावांनी व्यायामाकडे लक्ष दिले. मर्दानी व मैदानी खेळांसंबंधी त्यांना आवड होती. पुणे—लष्कर भागात लहुजी बाबा या नावाचे मांग जातीतील गृहस्थ होते. पूर्वी सैन्यात त्यांनी नोकरी केली होती. दांडपट्टा, छडीपट्टा, भालाफेक, तरवारीचे हात, नेमबाजी वगैरे बाबतीत त्यांचे कौशल्य होते. काही तरुण जमवून त्यांनी हे लष्करी शिक्षण देण्यास सुरवात केली होती. जोतीबा व त्यांचे ब्राह्मण मित्र त्या लष्करी शिक्षणात भाग घेऊ लागले. सदाशिवराव यांचे गुरुजी ब्राह्मण होते. त्यांना पेशवाईची सुखस्वप्ने दिसू लागली. इंग्रजांविरुद्ध बंड उभारून फिरून पेशवाई निर्माण करावी असे त्या गुरुजींस व इतर ब्राह्मण मंडळींस वाटू लागले. त्यांनी तरुणांच्या मनात तसे विचार पेरण्यास सुरवात केली. त्यामुळे ब्राह्मण मित्रांच्या आग्रहावरून जोतीरावहि त्या विचारास सहमत होऊ लागले. अशा वेळी दोन इंग्रज शिपायांनी जोतीरावांची निष्कारण खोडी काढली. त्याचा प्रतिकार जोतीरावांनी इतका जोराने केला की, शिपायांना पळणे भाग पडले. या प्रकाराने जोतीरावांचे बंडासंबंधीचे विचार वाढू लागले. त्यात मित्र व ब्राह्मण भर घालू लागले.

महाराष्ट्रात इंग्रजांचे राज्य स्थापन झाल्यावर सन १८२६ साली उमाजी नायकाने इंग्रज सरकारविरुद्ध बंड केले. सन १८३० साली काही लोकांनी बंड केले. सन १८३६ साली काही छोटी मोठी बंडे झाली होती. त्या सर्व उठावांचा इंग्रजांनी भयंकर कठोरतेने बीमोड केला होता. बंडाचे चित्र व परिणाम हे सर्व गोविंदराव जाणून होते.

मातृसुखाची जोतीरावांना कल्पना नव्हती. त्यामुळे त्यांच्या ठिकाणी पितृभक्ती विशेष होती. प्रत्येक गोष्ट वडलांच्या आज्ञेने करावी, असे त्यांनी ठरविले होते. एका प्रसंगी मनातील बंडासंबंधीचा विचार त्यांनी वडलांजवळ उघड केला. हे ऐकून गोविंदरावांना आश्चर्याचा धक्काच बसला-ते म्हणाले, "पेशव्यांचे राज्य इंग्रजांनी माझ्या डोळ्यांदेखत घेतले. आजपर्यंत झालेल्या बंडांचा बीमोड इंग्रजांनी कशा प्रकारे केला हे मला माहीत आहे. शिंदे, होळकर, गायकवाड व निजाम यांसारख्या मोठमोठ्या राजांना आपल्या सामर्थ्याच्या जोरावर इंग्रजांनी शेळीसारखे गरीब करून एका दावणीस बांधले व त्यांचे सामर्थ्य लुळेपांगळे केले. अशा बलाढ्य शक्तीपुढे तुमच्यासारख्या तरुणांची काय दाद! हे विचार म्हणजे मरणास आमंत्रणच!" वडलांच्या उपदेशाप्रमाणे जोतीरावांनी वागण्याचे ठरविले. बंडासंबंधीचे विचार त्यांनी डोक्यातून काढून टाकले.

## अखेर बंडखोर!

भगवान बुद्धानंतर सामाजिक व धार्मिक अन्यायाविरुद्ध बंड केल्याचे उपलब्ध इतिहासात उल्लेख आढळत नाहीत. असे बंड फक्त जोतीरावांनी केले. भारतातील सामाजिक व धार्मिक अन्यायांविरुद्ध पहिले बंडखोर म्हणून इतिहासात त्यांचे स्थान अढळ झाले.



## प्रकरण तिसरे

# पेशवाई काळातील सामाजिक व राजकीय परिस्थिती

“ब्राह्मण वर्णाच्या अमदानीत तो वर्ण स्वतःला इतरांपासून वेगळा करून घेत असतो. गुण–कर्म–विभाग–अधिकार ब्राह्मणांशिवाय दुसऱ्या कोणाला नाही अशा प्रकारची बंधने निर्माण होऊन ब्राह्मणाची सत्ता एकमुखी होते. अध्यापनाचे कामहि या एकाच वर्गाच्या हातात राहून बाकीचा सारा समाज अज्ञानात बुडत जातो.”–स्वा. विवेकानंद

थोरले माधवराव पेशवे यांनी ब्राह्मण्य वाढीस लावण्यात पुढाकार घेतला; म्हणून त्यांना विष्णूचा अवतार असे ब्राह्मण संबोधू लागले.

“ब्राह्मणांसाठी दानधर्म चालू आहे. तो राज्याची मिळकत पाच लाखांवर आली तरी चालू ठेवणे.” (भा. सं. भाग २१ पान–१६७, पारसनीसकृत) वरील उताऱ्यावरून हेच स्पष्ट होत आहे की, पेशव्यांचे राज्य ब्राह्मणास दानधर्म करण्यासाठीच होते.

पेशवाईची सर्व सूत्रे अत्यंत कर्मठ व पाताळयंत्री नाना फडणवीस याच्या हाती आली. त्याने राज्यास ब्राह्मणी स्वरूप देण्याचे प्रयत्न केले. स्वराज्यसंस्थापक शिवाजी महाराज व मराठे सरदार यांच्यासंबंधी अनुदार उद्‌गार काढून पेशवे यांनाच तो महत्त्व देऊ लागला. हे रियासतीवरून स्पष्ट होत आहे.

देशाच्या दुर्दैवाने दुसरा बाजीराव पेशवा झाला. या बहाद्दराने तर असे ठरविले होते की, राज्याचे रक्षण व वाढ ही सर्वस्वी ब्राह्मण्य व ब्राह्मणभोजन यांवरच अवलंबून आहे. हवी ती पापे, अनाचार, जुलूम व क्रूर कर्मे या सर्वांचे पापक्षालन होऊन पुण्यप्राप्ती ही केवळ ब्राह्मणभोजनावरच अवलंबून आहे. अशा आधारावर त्याने मन मानेल तसा राज्यकारभार केला व हवे तसे पापी वर्तन तो करू लागला.

'लोकहितवादी चरित्र व शतपत्रे 'यातील काही भाग पहा— "बाजीराव यांची बुधवार वाडा, शुक्रवार वाडा, फुलशहर म्हणजे फुलबाग वगैरे स्थळे प्रसिद्ध आहेत. फुलबाग हा तर पुण्याचा मकरपुराच होता. शिवाय कोथरूडचा वाडा, पाषाणचा वाडा व पर्वती वाड्यात किंवा पर्वतीला कधी भटाभिक्षुकांचे तांडे जमवावेत, त्यांना सव्वा हात लांब केळीच्या पानावर भोजने घालावीत, अन्नसंतर्पण करावे, दक्षणा द्यावी, पण यापेक्षाहि गावात उंडग्या बायकांचे थवे जमवावेत व त्यांच्या संगतीत कालक्रमणा करावी यातच त्यांचा काळ जात असे. भोजनसमयी सर्वकाळ बायका जवळ बसलेल्या असायच्या. आश्रईत लोकांनी चार चार पाच पाच लग्ने करून घरी एक बायको ठेवावी आणि सरकारवाड्यात बाकीच्या बायका पाठवाव्यात! जो गृहस्थ वाड्यात बायको पाठविणार नाही त्यावर श्रीमंतांची इतराजी व्हावयाची! रावबाजीच्या कारकीर्दीत सर्व गृहस्थांची घरे खराब झाली. जेवून उठले म्हणजे पर्वतीस वगैरे दर्शनास आल्यावर शास्त्री, पंडित व भट यांची कचेरी होत असे. त्यापैकी कोणी म्हणावे—'बाजीराव हा कृष्णावतार आहे.' कोणी म्हणावे—'शिवाचा अवतार आहे. . . ' सर्व खर्चात जेवणाचा खर्च काय तो मोठा. ब्राह्मणास संतुष्ट करण्यासाठी मोठमोठी दाने देत."

रियासतकार सरदेसाई बाजीरावाच्या दुर्गुणांचे वर्णन करीत आहेत, "शनवार वाड्यात नारायणरावसाहेबांचे भूत अंगात आले. एक लक्ष ब्राह्मणभोजन घालावयास सांगितले. त्यावरून श्रीमंतांनी सन १८११ साली लक्ष भोजन उत्तम प्रकारे घालून अर्धा रुपया दक्षणा दिली. व्यंकट नरसी नावाची पुण्यात सुप्रसिद्ध वारांगना होती. बाजीरावाने दोनतीन दिवस अहोरात्र नाच करून तिला सव्वीस हजार रुपये दिले."

**"ब्राह्मण वर्ग आधी होता तसा पुढे राहिला नाही. कालेकरून त्यांच्यात अनीती वाढत गेली. स्वतःचे महत्त्व रक्षण करण्यासाठी जुलूम करू लागला. स्वार्थासाठी अनेक वेदबाह्य अनीतीची आणि तर्कबाह्य अशी मतेहि स्वधर्मात घुसडण्यास त्याने कमी केले नाही. हेतू हाच की, आपले महत्त्व कायम रहावे."—स्वा. विवेकानंद**

ब्राह्मण्याचे मूर्तिमंत स्वरूप म्हणजे पेशवाई ! अनेक पुराणग्रंथांचा जन्म पेशवाईत होणे शक्य आहे.

**दोन नारायण**

नारायण म्हणजे देव ! प्रत्येक धर्मात एकच देव आहे. फक्त आमच्या हिंदू धर्माने नारायण(देव) व दुसरा सत्यनारायण असे दोन देव निर्माण केले. या सत्यनारायणाची पोथी पेशवाईकाळात निर्माण होणे शक्य आहे. या पोथीत नवसाचे महत्त्व, त्यामुळे होणारी नारायणाची कृपा व प्रसादाचे वर्णन आहे. सत्यनारायणाच्या पूजेचा नवस फेडला नाही, तर लगेच सत्यनारायणाचा कोप ! पूजा केली, तात्काळ कृपा ! प्रसादाकडे दुर्लक्ष केले तर लगेच नौका बुडाल्या. फिरून प्रसाद ग्रहण केला तर लगेच वर ! अशा तऱ्हेने या पुराणात अनेक असंभाव्य गोष्टी आहेत.

**संत गाडगे महाराज**

संत गाडगे महाराज हे आधुनिक काळातील तुकारामच ! त्यांनी साध्या-भोळ्या भाविकात भक्तीचा प्रसार केला. त्याचबरोबर त्यांना विचाराची नवी दृष्टी दिली. सुमारे पन्नास वर्षे महाराष्ट्रभर त्यांनी कीर्तनाद्वारे समाजोद्धाराचा प्रसार केला. ते कीर्तनातून प्रसंगोपात सत्यनारायणाबाबत सांगत, " मायलेकींनी सत्यनारायणाचा प्रसाद न घेता आपल्या पतिदेवांना भेटण्यास गेल्या. नावा बुडाल्या. पूजा करून प्रसाद घेऊन गेल्या, नावा फिरून वर आल्या. प्रसादात जर एवढे सत्त्व आहे, तर मग समुद्राच्या काठी मोठा सत्यनारायण केला तर महायुद्धात बुडालेली जहाजे वर येतील काय ? काही दुधाचे समुद्र आहेत असे पुराणात वर्णन आहे. गोरगरिबांस चमचाभर दूध मिळत नाही, मग ते समुद्र शोधून काढा व पोटभर दहीदूध खा." असे संत गाडगे महाराज म्हणत.

काल्पनिक सत्यनारायणाची महापूजा मोठमोठे सुशिक्षित, समाजसुधारक, राजकारणी आजहि करीत आहेत. पूजाविधी परमेश्वरभक्तीसाठी करणे अत्यंत जरूर आहे. परंतु असल्या काल्पनिक व असंभाव्य गोष्टींस रजा देऊन नवीन पोथी तयार करणे हे पुढारलेल्या वर्गाचे काम आहे. कारण त्यामुळे परमेश्वरभक्तीची खरी दृष्टी समाजास प्राप्त होईल.

गोरगरिबांच्या घामाने व उपाशी पोटाने निर्माण झालेला पैसा त्यांच्या संसारसुखाची दुर्दशा करून मुलाबाळांस अन्नासाठी तळमळत ठेवून तो पैसा ब्राह्मणांसाठी बाजीराव खर्च करीत होता. पर्वतीच्या वाड्यात घोड्यांची वाळलेली लीद ब्राह्मण हातात घेत. तिच्यावर तुळशीफुले ठेवून शाल.ग्राम म्हणून बाजीरावास दाखवून दक्षणा उपटीत असत. जो ब्राह्मण एकाच जेवणात चार शेर भात खाईल त्याला पालखीचा मान बाजीराव देत असे. एकाच जेवणात शेरभर तूप खाणाऱ्यास जास्त दक्षणा देत असे. ब्राह्मण्याचा महापूर बाजीरावाने निर्माण केला. राज्य, धर्म, न्याय व मानवता धर्म हे त्या महापुरात वाहून गेले.

## बाजीराव अनुकरण करणारे राजे

लोकहितवादी सांगत आहेत, "काही राजे बाजीरावासारखे मनास येईल तसे ब्राह्मणांस द्रव्य देऊ लागले. योग्यता पहावयाची सोडली व ब्राह्मणांच्या पायाचे तीर्थ घेऊन त्यांस अगदी ईश्वर मानू लागले. तेव्हा ब्राह्मणांनी अशी तजवीज केली की, हीच समजूत लोकांची रहावी व ब्राह्मणांचा अधिकार कधीही मोडू नये अशी पुराणे, माहात्म्ये लिहिली."

पारतंत्र्याची बेडी ताडकन तोडून स्वातंत्र्याचा मार्ग शिवप्रभूने मोकळा केला. स्वराज्य स्थापन केले. खडतर तपश्चर्या केली. त्यासाठी अनेकांनी त्याग केला. शिवप्रभूने मिळविलेले स्वराज्य ब्राह्मणभोजने व ब्राह्मण्यरक्षण यांसाठीच बाजीरावाने नष्ट केले. इंग्रजी राज्याच्या सुरवातीच्या काळात शिंदे, होळकर, गायकवाड, पवार वगैरे अनेक राजे-महाराजे बाजीरावाचे अनुकरण करीत होते. ज्यांच्या रक्ताने हे राजवैभवाचे धनी बनले त्यांच्या वंशजांकडे व प्रजेकडे दुर्लक्ष करून हे ब्राह्मणभोजनाचे पुण्य संपादित होते. महात्मा फुले यांनी सुधारणेचे शिंग फुंकले त्यावेळी त्यांची झांज उडण्यास सुरवात झाली. सन १८५७ मध्ये धारचे राजे पवार वारले. त्यांच्या मृत्यूनंतर 'दानधर्माची हकिगत' (माझा प्रवास अथवा १८५७ च्या बंडाची हकिगत) या पुस्तकात आश्चर्यकारक मजकूर असून धार्मिक अंधश्रद्धेचा तो पुरावाच दिसतो.

"ब्राह्मणांच्या झुंडीच्या झुंडी धार नगरीकडे वळल्या होत्या.

एकंदर अनेक दाने झालीत. ऐन्याच्या अंबारीसह सालंकृत हत्ती दिला. वरती आठ हजार रुपये दक्षणा दिली. शिवाय तीन हत्ती, पाच हजार दक्षणा, चार घोडे, तीन उंट, दहा बैल, नऊ म्हशी व तेरा दासी दिल्यात. एक शय्यादान झाले. महादानाचे ब्राह्मणास धोतरजोडा, अंगरखा, शिपाईगिरीचे पागोटे, ढाल तरवार व पुष्पहार इतके सामान चढवून दिले...... एखाद्या सुंदर सर्वालंकारयुक्त अशा दासीचा पदर एखाद्या गरीब बावळ्या ब्राह्मणाचे धोतराशी बांधून देत. . ." गोरगरिबांच्या मुली दान देणारे राजे व त्या दान घेणारे ब्राह्मण हे धन्य होत व हे सर्व धर्माच्या नावावरच!

बायजाबाई शिंदे ग्वाल्हेर यांनी मथुरेस "सर्वतोमुखी" यज्ञ त्याच सालात करण्याचे ठरवून त्यासाठी सात आठ लाख रुपये खर्च करणार होत्या. त्यासाठी पुणे, नासिक वगैरे ठिकाणी ब्राह्मणांस आमंत्रण दिली होती.

## पेशवाईतील जातिमत्सर

न्या. मू. रानडे यांनी पेशव्यांच्या डायरीच्या प्रस्तावनेत जे लिहिले ते पुढीलप्रमाणे आहे—" शिवाजी आणि शाहू यांच्या कारकीर्दीपेक्षा निराळेपण दाखविणारे असे सर्वसामान्य दुसरे एक स्वरूप पुण्याच्या पेशवाईचे सांगता येते. त्यावेळी ब्राह्मणांचा जास्तीत जास्त भरणा सेनापतीपदावर व लष्करी अंमलदारात झालेला दिसतो. साताऱ्याहून पुण्यास राजधानी आल्यावर १७६० सालानंतरच्या काळात असे स्पष्ट दिसते की, कीर्तिशाली व मुलुखगिरी करणाऱ्या लष्करी सरदारात निखालसपणे ब्राह्मण लोकच प्रामुख्याने झळकू लागले. प्रभू, शेणवी इत्यादि पांढरपेशा ब्राह्मणेतरांचाही पुणे दरबारात टिकाव लागेनासा झाला. समाजातील सगळ्याच वर्गात सक्रिय सहानुभूतीचा अभाव दिसू लागला. शिवाजी, राजाराम आणि शाहू यांच्या काळात हे समाजातील वर्ग एकोप्याने रहावेत अशी राजकीय दृष्टी होती. ब्राह्मणांना पेशवाईत असे वाटू लागले की, आता आपणच खरेखुरे राजे आहोत. ब्राह्मणांना सर्वत्र सवलती भोगावयास मिळू लागल्या, त्यांना अनेक बाबतीत इतरांना लागू असलेल्या कायद्याची बंधने लागेनाशी झाली. पेशव्यांच्या दरबारातील कोकणस्थ ब्राह्मण कारकुनाची मिजास तर और वाढली.

इतमामास भरपूर योग्य असा पगार मिळे. त्याच्या मालावर आयात निर्यातीच्या बाबतीत जकात माफ होत असे. कल्याण प्रांतातील व मावळातील ब्राह्मणांच्या जमिनींवर इतर जातींच्या मानाने निम्म्यापेक्षाहि कमी कर पेशवा सरकारने ठेविला होता. फौजदारी न्यायालयात ब्राह्मणांच्या बाबतीत कायदेशीर दंड व शिक्षा शक्य तितकी मऊ केली जात होती. किल्ल्यातील बंदीखान्यात इतरांपेक्षा ब्राह्मणांना उदार वागणूक मिळत असे. आणखी असे की, सरकारदरबार ब्राह्मणांना फार मोठा दानधर्म सरकारी खजिन्यातून करीत असे. विद्या असो वा नसो, ब्राह्मणांकरिता दक्षणा आणि जेवण यांची भरपूर तरतूद सरकारने केली. त्यामुळे पुणे शहर हे ब्राह्मण भिकाऱ्यांचे मोठे जंगी केंद्र बनले. तीस ते चाळीस हजार ब्राह्मण ओळीने कित्येक दिवस पक्वान्नांची भोजने झोडीत असत रहात. या व अशा प्रकारच्या गोष्टींमुळे ब्राह्मणशाहीचे वर्चस्व अठराव्या शतकाच्या शेवटच्या विभागात पराकाष्ठेस पोहचले. आणि हेच वर्चस्व अवनतीस कारण झाले. याची कल्पना फार थोड्या लोकांना असेल."

महात्मा फुले म्हणतात: "थोड्याच दिवसांमागे म्हणजे आर्य पेशवे यांचे शेवटचे कुलदीपक पुरुष रावबाजीच्या कारकीर्दीचा अस्त होईपर्यंत शेतकरी लोक शेतसारा देण्यास थोडेसे चुकले तर त्यास उन्हामध्ये ओणवे करून पाठीवर एक मोठा दगड द्यावा; अथवा त्या शेतकऱ्याच्या बायकोस पाठीवर बसवावे. आणि खालून मिरच्यांचा धूर द्यावा. त्या वेळेस त्यावेळच्या प्रजेस दुःख देण्याच्या कामात जी काही सुधारणूक झाली होती ती अन्य देशातील प्रजेच्या दुःखाशी तुलना करून पाहिली असता एकूण पहिले बक्षीस तिला मिळायचेच! राजे व त्यांच्या जातीचे लोक प्रजेस कोणत्या रीतीने छळावे; तिजला कोणत्या रीतीने अधिक दुःख प्राप्त होईल; कोणता उपाय योजला असता तिचे अकल्याण होईल वगैरे शास्त्रांचा रात्रंदिवस जसा काय अभ्यासच करीत होते की काय असे वाटते. प्रजेस दुःख देणे म्हणजे तिला मारणे, तोडणे, लुटणे किंवा त्रस्त करणे असा अर्थ ते समजत असत. प्रजेच्या अकल्याणात त्यांना मोठा संतोष वाटावा. ते प्रजा याचा अर्थ काडी, कस्पट, ढेकूण अथवा काही एक प्रकारची जनावरे समजत. त्यांचा उपयोग म्हटला म्हणजे त्यांनी राजे व त्यांच्या लोकांकरिता, त्यांच्या

स्त्रियांकरिता व मुलांबाळांकरिता धान्य उत्पन्न करावे व वस्त्रे विणावीत. त्यांच्याकरिता उन्हातान्हात खपावे. आणि त्यास ज्या ऐषाआरामाच्या गोष्टी लागतात त्या सर्व पुरवाव्यात. ह्याशिवाय दुसरे काही नाही.

"शेकडो वर्षे या राजांनी प्रजेवर वाकेतोपर्यंत करांचे ओझे लादून कोट्यावधी रुपये घशात टाकले. परंतु त्याचा एक छदाम तरी ईश्वराला स्मरून तिच्या कल्याणाकडे लावायचा होता! हर हर! प्रजेपासून वसूल केलेल्या पैशाचा ज्या रीतीने त्यांनी व्यय केला तो सांगण्यास आम्हाला लज्जा वाटते. त्यांनी आपल्या जातीच्या लोकांकरिता जागोजागी देवांची देवस्थाने स्थापन करून तेथे त्यांजकरिता अन्नछत्रे घातली. प्रजेकडून पैसा वसूल झाला की लागलीच ब्राह्मणभोजनाप्रीत्यर्थ अमुक संस्थानाकडे दोन लक्ष रुपये, अमुक संस्थानाकडे पन्नास हजार रुपये, येणेप्रमाणे पैसा वाटून द्यावा. आणि दररोज पर्वतोसारख्या संस्थानांवर आज काय फक्त ब्राह्मणांस तूप पोळीचे जेवण व वर दहा दहा रुपये दक्षणा! आज काय ब्राह्मणांस केशरीभाताचे जेवण व वर ओंगराळे भरून रुपये प्रत्येकास दक्षणा! याशिवाय कित्येक ब्राह्मणांस शालजोड्या, कित्येकांस पागोटी, कित्येकांस धोतरजोडे, कित्येकांस यथासांग वर्षासन देण्याच्या नेमणुका. अशा रीतीने दररोज ब्राह्मणांस यथेच्छ भोजन व वर रोकड दक्षणा घालून व बक्षिसे देण्यास प्रजेला अतिशय दुःख देऊन वसूल केलेल्या पैशाची अशा प्रकारे नासाडी करून टाकली होती.

"बरे त्यावेळी प्रजेची तरी खाऊनपिऊन सरकारी कर देण्याजोगी स्थिती होती काय? मुळीच बोलावयास नको. तिची जी स्थिती होती ती सांगता पुरवत नाही. गरीब बिचाऱ्या शूद्र लोकांस रात्रंदिन भर उन्हाळ्यात, पावसाळ्यात आणि हिवाळ्यात एकसारखे शेतात कष्ट करावे लागत असत. त्यांच्या अंगास जाडेभरडे वस्त्र किंवा जाडेभरडे अन्नदेखील मिळण्याची पंचाईत पडत असे. डोक्यास पहावे तर फाटकी जीर्ण अशी वीस पंचवीस हात लांबीची चिंधी, जिला पागोटे म्हणण्याची मोठी लाज वाटते. अंगावर फाटलेली एखादी रखरखीत घोंगडी, पायात पांचसहा ठिकाणी सांधलेला, वरून दोरीच्या तुकड्याने बांधलेला फाटका जोडा; तोहि जेव्हा अगदी भर उन्हाळा असेल तेव्हा घालायचा. आणि तो संपला म्हणजे दुसऱ्या

वर्षाच्या उन्हाळ्यात तसाच जतन करून ठेवायचा. बाकी सर्व वर्षभर पायास जोडा म्हणजे मुळीच माहीत नाही. फार काय सांगावे, नेसण्यासाठी हात-सव्वाहात लांबीचे फडकेदेखील मिळण्याची भ्रांत. बाजारातून एखादी दमडो-टोळीची वस्तू आणणे झाल्यास ती आणण्याकरिता त्याचेच एका बाजूस अथवा पागोटोत बांधावी; परंतु ती आणण्यासाठी दुसरे वस्त्रदेखील मिळू नये ही त्यांच्या संक्षिप्त पोशाखाची हकिगत झाली.

"आता त्यांच्या स्त्रियांच्या पोशाखाविषयी विचाराल तर तो सांगण्यास आम्हांस मोठे दुःख वाटते. त्या बिचाऱ्या काय समजून आपले दिवस काढीत असतील तर असोत. परंतु त्यांच्याकडून त्यास तिळमात्रदेखील सुख मिळत नसे. बिचाऱ्यास एखादा जाडा धोंगडा सुमारे दोन किंवा अडाच रुपये किमतीचा मिळाला तर तो त्यास एक दोन वर्षांपर्यंत घालवावा लागे. त्यास सोडणीला दुसरे एखादे लुगडे किंवा वस्त्रदेखील नसे आणि पाठी-मागे कामाचा रगडा असल्यामुळे तेच लुगडे त्यास चार-चार, पाच-पाच दिवस न धुता तसेच नेसावे लागे. एखादे वेळेस कामातून सवड सापडली तर नदीवर जाऊन नेसलेल्या लुगड्याचा अर्धा भाग मोठ्या लज्जेने दुःखित होऊन अंगावरचा काढून तो प्रथमतः धुवावा. तो धुतल्यानंतर ओलाच असतांना त्याने आपले शरीर आच्छादन करावे. नंतर शरीरावरील दुसरा अर्धा भाग काढून त्यास धुवावे. त्याप्रमाणे ते लुगडे जीर्ण होऊन फाटत चालल्यामुळे प्रथम अंगावरील अर्ध्या भागास शिवावे. नंतर तो नेसल्यावर दुसऱ्या अर्ध्या भागास शिवावे. ते लुगडे फाटून फाटून त्याचा सात किंवा आठ हात लांबीचा धुडका राहून त्यास इतकी ठिगळे असायची की, मूळचे हे कोणत्या रंगाचे लुगडे होते हे सांगता येत नसे. अशा प्रकारचा अंगास अपुरा असा त्या लुगड्याचा धुडका मोठ्या कष्टाने नेसून डोक्यावर गोवऱ्यांची पाटी घेऊन भर बाजारात जावे. हर हर ! किती ही दुःखाची गोष्ट आहे बरे ! ही सांगतेवेळी शूद्र लोकांच्या अंतःकरणाचे शतशः तुकडे होत असतील यात काही संशय नाही. त्यास असे वाटत असेल की, आम्ही या जन्मात व्यर्थ आलो. बेहत्तर, आम्ही जन्मताच मेलो असतो तर फार बरे होते. परंतु आपल्यासमक्ष आपल्या स्त्रियांची अशी दशा पाहणे नको. एक वेळेस मनुष्य आपणास कसेही संकट येवो, शरीराचे मोठे क्लेश होत असोत तथापि हे सर्व

सहन करू शकेल. पण आपल्या प्रियजनांचे हाल होत आहेत हे तो कधीहि सहन करू शकणार नाही. हे पाहताक्षणीच तो केवळ मृतप्राय होतो. असे जरी त्यास वाटत असले तरी ते गरीब लोक करतात काय ? निरुपायाची गोष्ट पडली. बरे त्यास खाण्यास तरी चांगले असते काय ? स्वप्नातदेखील आणावयास नको. दररोज जोंधळयाच्या नाचण्याच्या अथवा बाजरीच्या भाकरी नुसत्या मिठाच्या खड्याबरोबर, मिरचीबरोबर किंवा कांद्याबरोबर खाव्या लागत. वेळेत भाजीस तेल मिळाले तर मीठ मिळू नये, मीठ मिळाले तर मिरची मिळू नये. कधी कधी जोंधळयाच्या किंवा नाचणीच्या कण्या भरडून त्याचा घाटा करून गिळावा. कधी कधी नुसती भाजीच उकडून खावी लागत असे. कधी कधी तर जंगलातील उंबरे खाऊन त्यांवर आपला गुजारा करावा आणि कधी कधी तर फक्त पाणी पिऊन व पोट दोरीने आवळून शेतात खपावे लागत असे.

" अशा प्रकारे दारिद्र्याने ग्रस्त झालेल्या प्रजेचा पैसा (अतिशय कष्टांनी मिळविलेला पैसा कररूपाने हरण करून) त्याची व्यवस्था वर सांगितल्याप्रमाणे आपल्या जातीच्या आर्य लोकास जेवण घालण्याकडे करावा म्हणजे मोठी निंद्य आणि कुनीतीची गोष्ट आहे." आमच्या स्वराज्यात शेतकऱ्याची काय दशा होती हे वरील हकिगतीवरून स्पष्ट होत आहे.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( प्राज्ञ पाठशाळा, वाई ) 'हिंदुस्थानातील सामाजिक गुलामगिरीच्या विरुद्ध बंड पुकारणारा पहिला पुरुष - अशा शीर्षकाखाली जोती निबंधात लिहित आहेत:——

" त्यावेळी सरकार सावकाराच्या बाजूचे होते. त्यामुळे ऋणकोची फार दैना होत असे. सर्वस्व गमावण्याची पाळी त्याच्यावर फार वेळा येत असे.

"त्यावेळी त्या सरकारात फिर्याद वगैरे करावी लागत नसे. कारण त्यांचे (सावकाराचे) घरातच सरकार होते. मनास वाटेल त्याप्रमाणे कुळास मारावे, झोडावे, त्याचा सर्व माल हिसकावून घेऊन जावा. त्याची बैलढोरे विकावी, त्याचे गुलामाप्रमाणे हालहाल करावे. त्याच्या नाजूक भागास चाप लावावेत. कोलदांडा घालून मार द्यावा. . .सात आठ रुपयांच्या रकमेसाठी शेत जाई, गुरेढोरे जात, विहीर व मळे जात व सरतेशेवटी तोहि देशोधडीस जाण्यास अथवा प्राणत्याग करण्यास सिद्ध होई. कोणी शूद्र

नदीकाठावर वस्त्रे धुत असल्यास तेथे एखादा भट आला तर शूद्रास आपली सर्व वस्त्रे गोळा करून भटाच्या अंगावर शितोडा येण्याचा संभव नाही अशा स्थळी जाऊन ती वस्त्रे धुवावी लागत. तेथून जर भटाच्या अंगावर पाण्याचा शितोडा आला तर त्या भटाने रागाने अग्नीसारखे तप्त होऊन जवळचे भांडे त्याचे मस्तक रोखून मोठ्या त्वेषाने मारावे. त्यामुळे मस्तक रक्तबंबाळ होऊन जमिनीवर त्याने धाडकन पडावे. शुद्धीवर आल्यावर आपली रक्ताने माखलेली वस्त्रे घेऊन निमूटपणे घरी जावे. सरकारात कळवावे तर भटशाही पडली; उलट कळविणारासच सजा व्हावयाची. अस्पृश्यांचे हाल तर कल्पना करवणार नाही इतके होत. ब्राह्मणांवर आपली सावली पडू नये याची दक्षता त्यांना घ्यावी लागे. त्यामुळे सकाळ संध्याकाळ ज्यावेळी उन्हाच्या सावल्या लांब पडतात त्यावेळी स्पृश्यांच्या व विशेषतः ब्राह्मणांच्या वस्तीतून जाण्यात मोठा धोका असे. अस्पृश्य व ब्राह्मण ज्या रस्त्यातून जात त्या रस्यातून जातांना अस्पृश्यांना गळ्यात मडकी बांधून जावे लागे. तसेच त्यांना कमरेला झाडाची फांदी लोंबती बांधली तरच रस्त्यातून फिरण्यास परवानगी असे. कारण त्यामुळे त्यांची पापी पावले उमटलेल्या मातीवरून ती फांदी फिरली म्हणजे पावलांच्या उमटलेल्या खुणा बुजून जात. अस्पृश्य जाती जनावरांपेक्षा नीच स्थितीला पोहोचली. ब्राह्मण जाती देवाच्या पदवीला पोहोचली व मध्ये इतर जाती सोपानपरंपरेप्रमाणे राहिल्या. एका बाजूला ऐतखाऊ, वशिलेबाज, पुष्ट झालेला ब्राह्मणवर्ग आणि दुसऱ्या बाजूला दारिद्र्याने धुळीस मिळालेला बहुजनसमाज असे हृदयद्रावक चित्र पेशवाईत होते.

"पेशवाईत जातिभेदातील वैषम्य व पक्षपात हा कायदा समजून कडक रीतीने अंमलात आणणे हे राज्यकर्ते आपले कर्तव्य समजत व राहणी, पोशाख, चालीरीती या बाबतीत ब्राह्मणांचे अनुकरण करून त्यांची बरोबरी करणे हा कायदेशीर गुन्हा समजला जात असे. मुसलमान अमदानीत या बाबतीत पुष्कळ शैथिल्य आले होते. परंतु पेशवाईच्या उत्तरार्धात ब्राह्मणमाहात्म्य शिखरास पोहोचल्यामुळे जातिभेदाच्या मर्यादा व निर्बंध अधिक कठोर बनले. ते निर्बंध अधिक कडक रीतीने पाळणारा ब्राह्मण जादा दक्षणा व मानमान्यता यास पात्र होऊ लागला." तर्कतीर्थांनी सत्य बाजू समाजापुढे मांडण्याचे धैर्य दाखविले, हे विशेष.

## पेशवाईचा शेवट

पेशवाई नष्ट झाल्यावर ब्राह्मण खेद करीत. त्याबाबत लोकहितवादी सांगत आहेत --

"तो मोठा ब्राह्मणप्रभू ! केवढा दानशूर, केवढा पट्टीचा विद्वान ब्राह्मण. . .ब्राह्मणाचा तर केवळ अन्नदाता. पंक्तीत आग्रह किती करावा . . .गेले बिचारे ब्राह्मणांचे राज्य ! तर त्याच्याच राज्यातल्या बायका म्हणत, 'बाजीरावाचे आता पुण्यात राज्य नाही. बरे झाले ! चांगले मेल्याचे तळपट झाले. मोठा चांडाळ होता. तो वाईत आला तर पाचशे बायकांनी विहिरीत जीव दिला.' पेशवे यांचा अंमल वाजवी नव्हता. त्यांनी सातारच्या राज्यापासून बळकाविलेला अधिकार होता व बाजीरावाचे कर्म चांगले नव्हते. भट व बडवे मात्र त्याची स्तुती करीत. दुसरे सर्व त्यास कंटाळून राहिले होते. व इंग्रजांस वश होते. तेव्हा इंग्रजांनी मुलुख घेतला." पेशवे यांनी सातारच्या छत्रपतींचे राज्य लबाडीने बळकाविले असे स्पष्ट लोकहितवादी सांगत असून बाजीरावाच्या राज्यास इतर जनता किती विटली होती याची कारणेहि दिली आहेत.

इतिहासाच्या जिवंतपणासाठी संशोधनाच्या अनेक वाटा फिरणाऱ्या कित्येक इतिहासकारांना सातारचे राज्य पेशव्यांनी बळकाविले हे माहीत असून त्यांनी ती गोष्ट बुद्धीपुरस्सर लपवून ठेविली आहे हे आश्चर्य !

कै. हरिभाऊ लिमये यांनी मनोरंजनाच्या (सन १९१४) वसंत अंकाच्या ५४७ पृष्ठावर म्हटले आहे, "कारकून ब्राह्मण, वकील ब्राह्मण, प्रधान ब्राह्मण, मुत्सद्दी ब्राह्मण, शिपाई ब्राह्मण, सरदार ब्राह्मण, खरा धनी ब्राह्मण असे सर्व ब्राह्मणमय झाले ! अशा स्थितीत आपण आहोत कोठे व आपल्या देशाची काय स्थिती आहे याचे पेशवाईतील मुत्सद्दी मंडळीस भान रहावे कसे ?"

पेशवाई नष्ट झाल्याचे दुःख त्या काळी फक्त कर्मठांसच होत असेल व आजहि काही कर्मठ दुःख करीत आहेत. महात्मा फुले यांचा अवतार झाला नसता तर पेशवाई काळातील ब्राह्मण्याचे भूत महाराष्ट्रात कित्येक वर्षे धांगडधिंगा घालीत राहिले असते.



## प्रकरण ४ थे

# जन्मध्येयाकडे

" पायाखाली तुडविले गेलेल्या लक्षावधी गरीब लोकास मुसलमानांच्या राज्यात सुखाचे दिवस दिसले. आपल्यापैकी एकपंचमांश प्रजा मुसलमान कां झाली ? याचे कारण हेच होय. केवळ तरवारीच्या धारेनेच मुसलमानी धर्माचा इतका प्रसार येथे झालेला नाही. जाळपोळ आणि कापाकापी या साधनांनी मुसलमानी धर्म येथे इतका फैलावला असे म्हणणे मूर्खपणाचे आहे. पूर्वीच्या प्रमाणे एकपंचमांश काय पण अर्धे लोकही ख्रिस्ती होतील. असे होऊ नये अशी खबरदारी तुम्हीच घेतली पाहिजे. मलबारात ज्या रस्त्यातून एखादा उच्चवर्णीय ब्राह्मण जात असेल, त्या रस्त्यावरून एखाद्या महाराला जाण्याची परवानगी नाही. पण तेच त्याने एखादे वेडेवाकडे इंग्रजी नाव घेतले किंवा तोच उद्या एखादा हुसेनमिया झाला की त्याचा सारा विटाळ नष्ट होतो. "– स्वा. विवेकानंद

सन १८४७ साली इंग्रजी सात इयत्तेपर्यंतचे शिक्षण जोतीबांनी घेऊन शाळा सोडली. सन १८४८ साल सुरू झाले. पेशवाई नष्ट होऊन तीस वर्षे झाली होती. इंग्रजी शिकलेल्या तरुणांस मानाच्या व मोठ्या पगाराच्या नोकऱ्या देण्याचा सपाटा सरकारने सुरू केला होता. इंग्रजी शिकलेले अनेक ब्राह्मण तरुण मोठमोठ्या हुद्यांवर दिसत. अशा वेळी जोतीबासंबंधी निरनिराळे आशेचे मनोरे गोविंदराव आपल्या मनात उभारीत असत. दैवयोगाने खेदकारक घटना त्यांच्यापुढे वाढून आली.

### वर्णाभिमान कारणीभूत

जोतीबाचा अगदी जिवलग असा ब्राह्मण मित्र होता. त्याच्या आग्रहावरून जोतीबा त्याच्या लग्नाला गेले. नवरदेव मिरवणुकीने वधूमंडपी जात होता. मोठ्या आनंदाने जोतीबा त्या मिरवणुकीत सामील झाले. परंतु थोड्याच वेळात त्यांच्या आनंदात विघ्न निर्माण झाले. ते साधे नसून भयं-

कर असे होते. कारण पेशवाईत ब्राह्मणाच्या कोणत्याहि मिरवणुकीत इतर जातीच्या मनुष्याने सामील होणे हा त्या काळी कायदेशीर गुन्हा समजला जात असे व अशा अपराधाबद्दल झालेल्या शिक्षा प्रत्यक्ष डोळ्यांनी पहाणारे काही कर्मठ ब्राह्मण त्या मिरवणुकीत होते. जोतीबास पहाताच त्यांचे पित्त खवळले. त्यांचा वर्णाभिमान जागृत झाला. माळी जातीतील शूद्राने ब्राह्मणांच्या मिरवणुकीत अगदी समानतेने चालणे हे ब्राह्मणास कमीपणा आणणारे असे कृत्य आहे, अशा भावनेने मिरवणुकीतून निघून जाण्यासंबंधी जोतीरावास त्यांनी दरडावून सांगितले. इतकेच नाही तर काही हमरी-तुमरीवर आले व जोतीबाचा त्यांनी अपमान केला. त्यामुळे जोतीबांनी घराचा मार्ग धरला. घडलेल्या प्रकारासंबंधी ते मनस्वी खेद करू लागले व उदास होऊन घरात बसले.

## वडिलांकडून समाधानाचा प्रयत्न :

**बाप करी जोडी लेकराचे ओढी। आपली करवंडी ओवाळून ।।**

**— संत तुकाराम महाराज**

जोतीबांचे सचिंत बसणे व उतरलेला चेहरा पाहून गोविंदरावांच्या मनात खळबळ उडाली. नाराज होण्याचे कारण त्यांनी जोतीरावास विचारले. लग्नाच्या मिरवणुकीत एकंदर घडलेला प्रकार, ब्राह्मणांची उर्मटपणाची वागणूक, त्यांनी केलेला अपमान वगैरे हकिगत वडिलांस जोतीरावांनी सांगितली. त्यावर गोविंदराव म्हणाले, "हल्ली इंग्रजांचे राज्य आहे म्हणून तू सुखरूप घरी येऊन मला दिसत आहेस. पेशव्यांच्या राज्यात अशा कारणावरून अत्यंत कठीण शिक्षा भोगाव्या लागत. ब्राह्मणांचा अपमान केल्याचा नुसता संशय आला तर प्रसंगी कडेलोटसुद्धा करीत. असे घडलेले काही प्रकार मी डोळ्यांनी पाहिले आहेत. बरेचसे माझ्या ऐकण्यात आहेत. 'सुंभ जळते पण पीळ जळत नाही' या म्हणीप्रमाणे इंग्रजांच्या राज्यातसुद्धा ब्राह्मणांचा अहंकार जागा आहे." असे सांगितल्यावर पौराणिक गोष्टींच्या आधारे ते जोतीरावांची समजूत घालू लागले. "आपल्या पुराणांनी ब्राह्मणांस भूलोकीचे प्रत्यक्ष देव ठरविले आहे. काही ग्रंथात तर देवापेक्षा ब्राह्मण श्रेष्ठ असे वर्णन आहे. प्रत्यक्ष भगवान विष्णूच्या छातीवर ब्राह्मणाने लाथ

मारली असता देवास राग आला नाही, उलट ब्राह्मणाच्या पायास त्रास झाला असेल म्हणून देवच ब्राह्मणाची मनधरणी करतो असे पुराणात आहे. अशा ब्राह्मणांची बरोबरी करणे हे बरे नाही. घडलेल्या प्रकाराबद्दल वाईट न मानता रूढीधर्मास अनुसरून ते सर्व सहन केले पाहिजे." वगैरे प्रकारे समजूत घालण्याचा प्रयत्न गोविंदरावांनी केला. परंतु त्या उपदेशामुळे जोतीरावास उलट जन्मध्येयाकडे जाण्यास स्फूर्ती मिळाली.

कृत्रिम वर्णाभिमानाचा ताठा, जातिश्रेष्ठतेचा अहंकार व उच्चनीचतेची कठोरता यांमुळेच हिंदुस्थान व हिंदुधर्म यांचे वाटोळे झाले. जातिमत्सराच्या वरवंट्याखाली चेंगरणे अशक्य झाल्यानेच अस्पृश्यादि लोकांनी केवळ माणुसकी जगविण्यासाठी मुसलमानी धर्माचा स्वीकार करून ते आमचे कट्टे दुष्मन बनले. इंग्रजी राज्यामुळे ख्रिस्ती धर्माच्या धर्मांतराचे संकट डोळ्यांसमोर उभे असता जोतीरावासारख्या सुशिक्षितास राजरस्त्यावरील मिरवणुकीतून ब्राह्मणांनी बाहेर काढावे ? धन्य ते ब्राह्मण ! धन्य तो वर्णाभिमान !

**प्रसंगामुळे ध्येय जागृती**

उपलब्ध इतिहासात जे अनेक महापुरुष झालेले आहेत ते जन्माबरोबरच काही विशिष्ट ध्येय घेऊनच येत असतात. मात्र ध्येयजागृतीसाठी काही प्रसंग कारणीभूत होतात.

भगवान बुद्धास वृद्ध, अत्यंत रोगग्रस्त मनुष्य व प्रेत दिसले. अशा दृश्यांमुळे त्यांचे उपजत वैराग्य जागृत झाले. राज्यवैभव, तरुण पत्नी व लहान मुलगा या सर्वांचा त्याने त्याग केला. अरण्यवास पत्करला. खडतर अशी तपश्चर्या केली. एका धर्माचे (बुद्ध धर्माचे) ते संस्थापक बनले.

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज संसारात असता महाराष्ट्रात भयंकर असा दुष्काळ पडला होता. मुसलमानी सत्तेने दुर्लक्ष केले होते. लोकांच्या दुःखास पारावार नव्हता. माय लेकरास धरीना असे प्रकार घडत होते. **"न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होते ।।"**असे दुष्काळाचे त्यांनी वर्णन केले आहे. या प्रसंगामुळे त्यांचे जन्मजात वैराग्य जागृत झाले. संसाराचा त्यांनी त्याग केला. "**तुका म्हणे शूर झालो । बाहेर आलो संसारा ।।**" त्यामुळे ते संतश्रेष्ठ ठरले.

पुण्यप्रतापी श्री शिवप्रभूस बालपणी विजापूरच्या दरबारात जाण्याचा प्रसंग आला. परकीय बादशहाचे ते जुलमी वैभव पाहून त्यांच्या ठिकाणी परसत्तेची चीड निर्माण झाली. याच कारणाने ते जन्मध्येयाकडे वळले. स्वराज्यसंस्थापक व शककर्ते ठरले.

जोतीरावांस राजरस्त्यातून जाणाऱ्या मिरवणुकीतून ब्राह्मणांनी बाहेर काढले. या प्रकारामुळे ते जन्मध्येय गाठण्याच्या मार्गास लागले व महात्मा पदवीचे धारक ठरले.

## ध्येय ठरले

वडिलांच्या सांगण्याकडे जोतीबांना लक्ष दिले नाही किंवा रूढीधर्मास त्यांनी मान दिला नाही. झाल्या प्रकाराबद्दल ते मनाशी विचार करू लागले त्याचे मूळ शोधण्याच्या मार्गास लागले. शिक्षणामुळे त्यांना सत्यदृष्टी निर्माण झाली होती.

**"पुस्तकातून भराभर पाठांतर करणारे शिक्षण नकोत. ज्यायोगे शुद्ध दानत निर्माण होईल असे शिक्षण आपणांस हवे. ज्यायोगे मनोबल वाढेल, बुद्धीचा विकास होईल आणि मनुष्य स्वावलंबी होईल असे शिक्षण आपणास हवे."– स्वा. विवेकानंद**

जोतीबांनी खरे शिक्षण घेतले होते. त्यांची विचारशक्ती जागृत होती. मुसलमानी धर्म व ख्रिस्ती धर्म यांच्यात सामाजिक व धार्मिक समानता आहे. त्याच्या उलट आपल्या हिंदू धर्मात प्रखर जातिभेद असून धार्मिक बाबतीत कठोर वर्णभेद आहेत. याचे कारण शोधण्यासाठी नवदृष्टीने भगवान बुद्ध, तीर्थंकर, रामानुज, नामानंद, बसवेश्वर, गुरू नानक, कबीर, दादू व महाराष्ट्रीय संत यांच्यासंबंधी मिळेल ते वाङ्मय जोतीबांनी वाचून काढले. त्यात त्यांना हेच दिसले. या सर्वच महापुरुषानी एकमुखाने व अधिकारवाणीने सांगितले, "परमेश्वराच्या दृष्टीने मानवात उच्चनीच असा भेदाभेद नाही. परमेश्वरप्राप्तीचा अखिल स्त्रीपुरुषांस समान हक्क आहे. वर्णाश्रम हा जन्मजातीवर नसून कृतीवर आहे. उच्चनीच असा जातिभेद स्वार्थी लोकांनी निर्माण केला. समता, समभाव व मानवता धर्म हीच धर्माची खरी अंगे आहेत. परमेश्वराकडे जाण्यासाठी ज्ञानापेक्षा पावित्र्य व अंतःकरण यांचीच

जरुरी आहे. जपजाप्य, होमहवन, व्रतवैकल्य वगैरे विधी निरर्थक आहेत. परमेश्वरप्राप्तीसाठी मध्यस्थाची अगर गुरूची जरुरी नाही" वगैरे सत्य विचार सर्वच महापुरुषांनी सांगितले असता ते ग्रंथात कोंडण्याचे कार्य कर्मठांनी केले. कर्मकांड, वर्णाश्रम, जातिभेद यांचे वेष्टन त्याच्यावर ठेवून सत्य तत्त्वे जनतेपासून दूर ठेवण्याचे कार्य कर्मठांनीच केले व हल्लीच्या काळातहि करीत आहेत. यावर एकच उपाय तो म्हणजे जनतेत जागृती करणे, असे ध्येय जोतीबांनी मनाशी निश्चित केले. मार्टिन ल्युथरचे धार्मिक क्रांतीचे कार्य व संत तुकाराम महाराजांच्या समता तत्त्वाचा प्रसार हे आदर्श जोतीबांनी डोळ्यांसमोर ठेवले. त्यांना सत्याची जाणीव झाली.

"सत्याची ओळख पटली अशी मूठभर माणसेसुद्धा आजमितीस सारे जग इकडचे तिकडे करतील. पूर्वकाळी अशा प्रकारच्या एकएकट्या व्यक्तीने सारे जग हलविले आहे."– स्वा. विवेकानंद

चौवर्ण लक्षण शास्त्राने कथिले । जाणोनि वदिले चित्ती धरा ।।
ज्या वर्णयुक्त जो असेल । त्याच वर्णाचा पावेल अधिकार तो ।।
ब्राह्मणाचे चिन्ह अत्यंजा असती । तरी ते पावती ब्राह्मण्यत्व ।।
ब्राह्मण असूनी चिन्ह अत्यंजाचे । तरी ते पावे साचे अत्यंजत्व ।।
लक्षण ब्राह्मण क्षत्रियादी जाण । जाती अप्रमाण शास्त्र बोले ।।
भीड भाड काही शास्त्राशी ते नाही । मेंढ वळणी पाही त्रास पावे ।।
परी गुणावगुण न विचारी मनी । मूढपणी जनी भांडतसे ।।
शूरपणा नाही कैचा तो शिपाई । विचारून पाही मनामाजी ।।
युद्ध करावया सामर्थ्य आणावे । तरीच म्हणावे क्षत्रिय त्यासी ।।
अर्थासह वेद ब्रह्म जे जाणती । तेचि ते पावती ब्राह्मणत्व ।।
विद्या ज्ञान–गुणे अधिकार पावले । तेचि वाखाणले सर्व जगी ।।
गुण नसता केवळ जातिमान जाण । न मिळे सन्मान जनामाजी ।।
पिता तो परीक्षा देउनी शोभला । त्याच्या मूढ मुला न पुसे कोणी ।।
ऐसा हा विचार सज्ञान जाणती । अज्ञ मूढाप्रति नणवेचि ।।
चार वर्ण गुण–कर्मस्वभावाने । ठरविले शास्त्राते तुका म्हणे ।।

भागवतधर्मीय सर्व संतांनी समतेची शिकवण समाजास दिली; परंतु पेशवाई काळात वर्णाश्रमधर्मापुढे तिचा बळी देण्यात आला. समता

व समभाव ही तत्त्वे समाजाच्या गळी उतरविण्याचे जोतीरावांनी मनाशी निश्चित ध्येय ठरविले.

## इंग्रजांचे राज्य आणि महाराष्ट्र

इंग्रजांचे राज्य ज्या प्रांतात स्थापन झाले त्या प्रांतात त्यांनी सामाजिक व धार्मिक सुधारणा करतांना लोकमताची फारशी पर्वा केली नाही. फक्त महाराष्ट्रात राज्यस्थापनेनंतर त्यांनी सुधारणेच्या बाबतीत अत्यंत जपून पावले उचलली. इतकेच नाही तर पेशवेकालीन जातिनिर्बंध व रूढीनिर्बंध पाळण्याकडेच इंग्रज सरकारचा कल दिसून येतो.

"सन १८२९ मध्ये सतीची चाल बंद करण्यात आली. १८३२ त धर्मांतर करणाऱ्यांना पूर्वधर्मातल्या आप्तस्वकीयांच्या इस्टेटीचा कायदा झाला. जगन्नाथपुरीच्या यात्रेच्या वेळी यात्रेकरूंवर तीर्थोपाध्याय अनन्वित जुलूम करीत असत; शिवाय जगन्नाथाच्या संस्थानाची अतिशय अव्यवस्था असे, अनुभवास आल्यामुळे हा जुलूम व अव्यवस्थितपणा पिटाळून लावणारा एक कायदा १८४० साली अंमलात आला.

" १८३२ च्या सुमारास कन्यावधाचा रजपूत व तत्समान काही जातीतला भयंकर रिवाज कायद्याच्या जोरावर उपटून काढण्याचे श्रेय इंग्रजांच्या कंपनी सरकारने संपादन केले. १८३६ च्या एका कायद्याने ठकांच्या धंद्याचा पक्का बंदोबस्त करून पुन: हा राक्षसी धंदा कधीहि वर डोके काढणार नाही अशी निर्भय स्थिती देशात निर्माण केली. बिहार, ओरिसा प्रांताच्या जंगली भागातील लोक आपल्या उपास्य देवतांची कृपा संपादन करण्यासाठी जाती बाहेरच्या माणसांना पकडून त्यांचा बळी देत होते. इंग्रजांच्या हातात त्या प्रांताची राज्यसूत्रे जाण्यापूर्वी या नरमेधाच्या चालीला आळा घालण्याचा यत्न झाला नव्हता. नरमेध हा तेथील रानटी समाजाचा धार्मिक हक्कच मानला जात असे; पण या हक्काचा इंग्रजांनी आपल्या न्यायबुद्धीपुढे बळी देऊन नरमेधाची शेकडो वर्षांपासून चालत आलेली रूढी कायमची बंद केली. मध्यप्रांताच्या डोंगरावरील कित्येक देवस्थानानजीक असलेल्या कड्यांवरून उडी ठोकून देहावसान साधल्यास मोक्ष मिळतो, अशा प्रकारे देहान्त करून थेटाच थेट देवलोकी निर्वेध जाण्याचा रस्ता खुला होतो असा काही लोकांचा

समज होता. हा समज असल्याने पुष्कळ यात्रेकरू दरसाल आपखुशीने कडेलोटाने कपाळमोक्ष करून घेत होते. या कडेलोटास इंग्रजांनी बंदी केली. गंगातटावर मरण आल्याने सहज मुक्तीचा लाभ घडतो या कल्पनेस वश होऊन हजारो माणसे गंगातटावर अत्यवस्थ मरणोन्मुख स्थितीत जाऊन पडत. त्यांना इंग्रजी राज्यापूर्वी कोणी प्रतिबंध केला नव्हता; इंग्रजांनी ही गंगाकिनारी मरण्याची चाल मोडली. धर्माच्या नावाखाली चालणाऱ्या आणखी बऱ्याच अत्याचारांना इंग्रजांनी मूठमती दिली." —न्या. मू. रानडे— चरित्र.

लोकहिताच्या सुधारणा इतर प्रांतात इंग्रजांनी केल्या, परंतु महाराष्ट्रात जुन्या व अनिष्ट चालीरीतीस नष्ट करण्यासाठी इंग्रजांनी अगदी मंद पावले टाकली. याचे कारण एल्फिस्टन साहेबांस पेशव्यांचे राज्य घेण्यास ब्राह्मणांचे बरेच साहाय्य होते. "१८१७ सालच्या नोव्हेंबरमध्ये अश्विन वद्य एकादशीला सायंकाळी बापू गोखले यांच्या नेतृत्वाखाली जेव्हा मराठी सैन्याने खडकीवर चाल करून रेसिडेन्सीला वेढा घातला तेव्हा पेशव्यांच्या खद्द राजधानीतच मुळी इंग्रजांना जय मिळावा म्हणून अनुष्ठाने बसविली होती. !" "अश्विन वद्य ११ सायंकाळी फौजेचा घेरा पडला. त्या वेळेस श्रीनिवासराव येऊन बोलले की, कैसे करून बडे साहेब वाचून शत्रू पराभव व्हावा, आम्ही श्रीगणपतीस व श्री महालक्ष्मीस नवस केला की, बडे साहेब यांस यश येऊन राज्याचे कामकाज व्हावे. साहेब लोक जिवानिसी खुशाल राहावे. ब्राह्मण तपस्वी जागोजाग अनुष्ठानास बसत आहेत. ब्राह्मणभोजन पाच लक्ष व्हावयाचे आहे. येणेप्रमाणे बहुत प्रयत्न केला आहे. साहेब कृपावंत होऊन आज्ञा व्हावी व बक्षिसाबद्दल दोन लक्ष रुपये कराराप्रमाणे द्यावे. ('चिपळूणकर काल आणि कर्तृत्व 'वरून) ब्राह्मणभोजने व ब्राह्मणरक्षण हेच पेशव्यांचे ध्येय होते. तरी पुरोहित वर्ग त्यांच्यावर कसा उलटला होता, हे वरील हकिगतीवरून स्पष्ट होत आहे.

जयसिंगास शिवाजी महाराजांवर औरंगजेबाने पाठविले; त्यावेळी जयसिंगास जरासंधाचे काळजी वाटू लागली. त्याबाबत सभासद आपल्या बखरीत सांगत आहे, "शिवाजी मोठा दगेखोर, मोठा हुन्नरवंत आणि मर्दाना शिपाई अंगाचा खासा आहे. अफजूलखान]आंगे मारिला. शाइस्ताखानाच्या डेऱ्यात शिरोन मारामारी केली. आपणास यश कसे येईल? म्हणून चिंता

केली तेव्हां मोठमोठे ब्राह्मण पुरोहित यांनी उपाय सांगितला—देवी-प्रयोगी अनुष्ठाने करावी. म्हणजे यश येईल' असे सागितले. मग मिरजा (जयसिंग) बोलिला जे "कोटचंडी करावी आणि अकरा कोट लिंगे करावी. कामनार्थ बगळामुखी (महाविद्या) कालरात्रीप्रीत्यर्थ जप करावा असे अनुष्ठान करावे.' चारशे ब्राह्मण अनुष्ठानास घातले. प्रत्यही अनुष्टान चालले. अनुष्ठानास २ क्रोड (कोट) रुपये अलाहिदा काढून ठेविले आणि ३ मास अनुष्ठान चालवून सिद्ध केले. अनुष्ठानाची पूर्णाहुती करून ब्राह्मणांस दानदक्षणा देऊन संतर्पण केले. मग मजल दरमजल चालले." औरंगजेबासारख्या हिंदू धर्मद्वेष्टया बादशहाने दोन कोटी रुपये अनुष्ठानासाठी खर्च केले ते कशासाठी? त्या अनुष्ठानास शास्त्रीपंडितांनी मदत करून बगळामुखी देवीस प्रसन्न केले. ते कशासाठी? तर शिवाजी महाराजास जयप्राप्ती न होता ती औरंगजेब बादशहास व्हावी. शास्त्रीपंडित, हिंदू धर्म व हिंदू राष्ट्र यांचा बळी स्वतःच्या स्वार्थासाठी देण्यास पुरोहित नेहमी तयार असत. अशा पुरोहित वर्गाची राष्ट्रघातक जडमूळ नष्ट करण्याचे काम फक्त महात्मा फुले यांनी केले. म्हणून कर्मठ आजहि त्यांच्या नावाने खडे फोडीत आहेत.

पेशव्यांचे राज्य एल्फिन्स्टनने घेताच नासिक व वाई येथे गेला व त्याने ब्राह्मणांस दक्षणा दिली. व दक्षणा देण्याची ही पद्धत पुढेहि सुरू राहील असे त्याने सांगितले. अनेक देवस्थानांस पेशव्यांनी इनाम व वर्षासने दिली होती. ती इंग्रज सरकारने सुरू ठेवली. गोरगरिबांच्या रक्तातून निर्माण होणारा पैसा इंग्रजांनी देवस्थानांस देण्याची परंपरा कायम ठेवली. महाराष्ट्रात लाखो रुपये देवस्थानाप्रीत्यर्थ सरकारी खजिन्यातून खर्च होत आहेत.

"सन १८२४ साली संगमानजीक वेलस्ली पूल बांधून पुरा झाला. तो उघडण्याचे प्रसंगी ख्रिस्ती राजकर्त्यांनी ब्राह्मणास दक्षणा देऊन खूष केले. सन १८२४ मध्ये दोन मिशनरी धर्मप्रसाराचे ठाणे मांडण्यासाठी पुण्यास आले असता सरकारने त्यांना बंदी केली. तेवढ्याने त्यांच्या धर्मप्रसाराला आळा बसला नाही म्हणून अटकेत कोंडले. पुणे येथे पेशव्यांचे राज्य असल्याने तेथे ब्राह्मण्य जागृत स्वरूपात असे. त्यामुळे जैन धर्माच्या देवळांस तेथे मनाई होती. ती परंपरा इंग्रजांनी सन १८५९ सालापर्यंत पाळली. पेशवाईत मुसलमानांचा ताबूताचा सण पेशवे धार्मिक भावनेने करीत. खुद्द

पेशव्यांचा ताबूत असून अनेक सरदारांचे व ब्राह्मणांचे असत. ताबूताच्या मिरवणुकीत पेशवे भाग घेत. ताबुतापुढे ब्राह्मणांच्या स्त्रिया नवसाच्या पाण्याने भरलेल्या घागरी ओतून धर्मप्रेम व्यक्त करीत. पेशव्यांची ही परंपरा इंग्रजांनी पाळली. सरकारी अंमलदार ताबूताचे मिरवणुकीत सामील होत असत. महंमद बुद्दीन याचा ताबूत सर्वात मोठा असे. या ताबूतापुढे इंग्रज सोल्जरांची तुकडी चालत जाई. कोतवालसाहेब आणि बझार कॅप्टन मॉरिस हे दोघे मोठ्या हत्तीवर बसून जात." (बॉम्बे टाइम्स–१८४१) पेशव्यांच्या राज्यात शंकराचार्य दक्षणेसाठी लोकांवर जुलूम करीत. मनास येईल ती दक्षणा मागत व पेशव्यांच्या राज्यामुळे लोकांना ती बिनतक्रार द्यावी लागत असे. हा जुलूम इंग्रजी राज्यात सन १८२७पर्यंत सुरू होता. नंतर ह्या जुलमाबाबत काही सुविचारी ब्राह्मण लोकांनी कलेक्टराकडे अर्ज केला. कलेक्टराने शंकराचार्यास सांगितले की, लोकांच्या इच्छेने दक्षणा घेणे. जुलूम करू नये.

सन. १८२२ सालात पुणे शहराच्या लोकसंख्येची माहिती आहे. पुढील-प्रमाणे एकंदर ५६ जातींचा नाववार लोकसंख्येचा आकडा त्यात दिला आहे अगदी अल्पसंख्येच्या जातीच्या नावाचा उल्लेख त्यात दिलेला आहे. फक्त मराठा व माळी या दोन जातींचा त्यात नामनिर्देश नाही. पेशवे मराठ्यांना द्वेषबुद्धीने कुणबी म्हणत. तीच पद्धत इंग्रजानी अंगिकारली आहे. एकूण. लोकसंख्या –८१४०२. त्यात ब्राह्मणांची संख्या–१६७५५, मुसलमान–५३५५, ख्रिश्चन–५५, कुणबी–२५६५४; बाकीच्या राहिलेल्या बावन्न जातींची नाववार संख्या दिलेली आहे. एकूण लोकसंख्येच्या पाचवा हिस्सा ब्राह्मणांचा आहे. त्यामुळे इंग्रजांनी पेशवेकालीन ब्राह्मणांच्या बहुतेक चालीरीतींस उचलून धरून बहुजनसमाजाच्या सामाजिक हक्कांकडे दुर्लक्ष केले. त्या जोरावरच मिरवणुकीतून जोतीबास ब्राह्मण बाहेर काढू शकले महाराष्ट्रात सामाजिक सुधारणा, शिक्षणप्रसार व अनिष्ट रूढींचा नाश याबाबत इतर प्रांतांच्या मानाने सरकारने जपून पाऊल टाकले.

**एकच लाभ**

**"शूद्राने वेदवाक्य उच्चारले तर त्याच्या कानात शिशाचा रस ओतावा. आणि श्रुतीतील एखादी ओळ त्याच्या ध्यानात राहिली तरी त्याची**

**जीभ कापावी. त्याने ब्राह्मणाचा अधिक्षेप केला तरीसुद्धा त्याची जीभ कापावी. असल्या प्रकारची वाक्ये ज्यात लिहिली आहेत असे ग्रंथ आढळण्यात येतात. "**

**— स्वा. विवेकानंद**

वरील वचनास पेशवाईत कायद्याचे स्वरूप देऊन राज्यकर्ते त्याप्रमाणे वागत होते. इतर जातींचे, प्रगतीचे व सुधारणेचे एकूण एक मार्ग काय द्याच्या नावाखाली बंद होते. साध्या माणुसकीच्या हक्कासमुद्धा कायद्याचे बंधन होते. अशा त्या असुरी कायद्यास इंग्रजी राज्यात मूठमर्ती मिळाली होती. समाजास विचाराचे व सुधारणेचे स्वातंत्र्य मिळाले त्यामुळे जोतीरावांना समाजसुधारणा करता आली.

## ध्येयनिष्ठा

**"दुसऱ्यास सुखाने चालता यावे म्हणून स्वतःचे रक्त शिंपडून जो कोणी मार्ग तयार करतो, तोच खरा मोठा. आज अनंत काल हाच प्रकार चालत आला आहे. एकजण आपल्या देहाचा पूल बांधतो आणि दुसरे हजारो त्यावरून चालत जाऊन नदीपार होतात. "— स्वा. विवेकानंद**

श्री शिवछत्रपतीने सुमारे सातशे वर्षे सतत सलणारी पारतंत्र्याची बेडी ताडकन तोडून राष्ट्रास स्वातंत्र्याचा मार्ग दाखविला. यात त्यांची जबर ध्येयनिष्ठा होती. तशी त्यापूर्वी कोणीहि दाखविली नव्हती. तद्वत बहुजनसमाज, स्त्रिया, अस्पृश्य व पददलित यांना हजारो वर्षापासून सामाजिक व धार्मिक गुलामगिरीने पक्के जखडून टाकले होते. त्यामुळे त्यांचा उन्नतीच्या बाबतीत कोंडमारा झाला होता. त्यातून त्यांना जोतीबांनीच मुक्त केले. सुधारणेची ज्योत पेटवून तिच्या प्रकाशात स्वहिताचा मार्ग जोतीबांनी जनतेस दाखविला. ते ध्येयनिष्ठ असे महापुरुष होते. यापूर्वी पोटतिडकीने असा प्रयत्न कोणीहि केला नाही. म्हणून धार्मिक व सामाजिक गुलामगिरी नष्ट करणारे ते आद्य पुरुष ! तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री आपल्या जोतीनिबंधात पुढीलप्रमाणे सांगत आहेत. . . " हिंदू समाजातील बहुजनसमाजात आत्मप्रत्यय व आत्मावलोकन उत्पन्न करणारा पहिला माणूस म्हणजे जोतीबा फुले होय. हिंदी बहुजनसमाजाच्या सामाजिक गुलामगिरीचा प्रथम प्रत्यय किंवा पहिली ओळख झालेला बहुजनसमाजातला पहिला माणूस

जोतीबा फुले हा होय ! ज्यांना स्वतःची गुलामगिरी समजत नाही, ते गुलामगिरीतून कधीहि मुक्त होत नसतात. शतकानुशतके अज्ञानाने, दारिद्र्याने व हीन संस्कृतीने ग्रासलेल्या हिंदू समाजातील जनतेला आत्मपरीक्षण करण्याचा पहिला आदेश जोतीबांमुळेच मिळाला...ब्राह्मणी वर्चस्व, जातिभेदातील उच्चनीच असा कठोर अंमल, धर्मसंस्थेच्या छत्राखालील अज्ञानी व भोळेपणा यांनी भरलेल्या कल्पनेचे प्रस्थ, अंधश्रद्धेने पाठिंबा दिलेल्या मौर्ख्यपूर्ण चालीरीती इत्यादि हिंदूसमाजातील सामाजिक दोष या ऐतिहासिक पार्श्वभूमीचा विशिष्ट संबंध अवनत झालेल्या मराठी राज्याच्या उत्तरार्धाशी पोहोचतो. या उत्तरार्धात ब्राह्मण पेशव्यांच्या हातात मराठी राज्याची सूत्रे आली होती. त्यावेळी त्या राज्यपद्धतीत असलेली अवनतीची बीजे फोफावली. हिंदू समाजरचनेचे अंगभूत व स्वाभाविक असलेले दोष अधिक उग्र व घृणित स्वरूपात प्रगट झाले." तर्कतीर्थ जोशी यांनी महात्मा फुले यांचे समाजसेवेचे ध्येय बरोबर ओळखले.

## मूर्तिमंत त्याग

**"साऱ्या जगात जागृती उत्पन्न करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारांनी आपली दृष्टी जगद्व्यापी केली पाहिजे. तसेच आपल्या इच्छा व आशा बारीकसारीक गोष्टीत गुंतून न राहता साऱ्या जगाच्या हिताचा विचार करतील इतक्या उदार केल्या पाहिजेत."– स्वा. विवेकानंद**

अव्वल इंग्रजी अमलाचा तो काळ ! त्यामुळे इंग्रजी शिक्षण घेणारांना मानाच्या व मोठमोठ्या पगाराच्या जागा सहज मिळत असत. समाज ज्यांना आदर्श म्हणून मानीत आहे, अशा अनेक थोरामोठ्यांना त्या काळी नोकरीचा मोह सुटला नाही. फार काय, पण "लोकमान्य टिळकांनी सुद्धा मुन्सफीच्या जागेसाठी अर्ज केला होता" (आगरकर चरित्र). अशा सरकारी नोकरीच्या मोहास जोतीराव बळी पडले नाहीत. तसा विचारहि त्यांनी मनास कधी शिवू दिला नाही. दरिद्री, पीडित, हीनदीन, अस्पृश्य, स्त्रिया व रूढीच्या वरवंट्याखाली नित्यही चिरडले जाऊन मानवी जन्मास पारखे झालेले असंख्य अज्ञ जन, अशांच्या उद्धारासाठी उभे आयुष्य खर्च करण्याचा निश्चय जोतीरावांनी केला. संसारसुखास त्यागरुपी अग्नी स्वहस्ते लावून त्याच्या उजेडात दलितांची दुःखे जगास दाखविण्याचे महान कार्य जोतीरावांनी केले.

एका बिजा केला नाश । मग भोगिले कणिस ।।१।।
कळे सकळां हा भाव । लहान थोरांवरी जीव ।।२।।
लाभ नाही फुकासाठी । केल्याविण जीवासाठी ।।३।।
तुका म्हणे रणी । जीव देता लाभ दुणी ।।४।।

**भाग्यविधाता**

भगवान बुद्धानंतरच्या दीर्घ काळात बहुजनसमाज व स्त्रिया यांची उपेक्षा करण्याचे कर्मठांनी सतत प्रयत्न केले व त्यांना रसातळास घातले होते. अशांचो त्यातून सुटका करून यांना ज्ञानदृष्टी स्वाभिमान व मानवी हक्क देणारा जोतीबा हाच पहिला भाग्यविधाता !



## प्रकरण पाचवे

# भारतात पहिली मुलींची शाळा

" भारत भूमीला अवनतावस्था आली, तेव्हा भिक्षुकांनी इतर जातींना ज्ञान जसे पारखे करुन ठेवले तसेच स्त्रियांचे सारे हक्क हिरावून घेतले.'

– स्वा. विवेकानंद

हिंदू धर्माची सूत्रे सर्वस्वी कर्मठांच्या हातात गेली. अशा वेळी स्त्रिय व बहुजनसमाज यांच्यावर धर्मशास्त्राच्या नावावर जुलूम करण्यासाठी अनेक काल्पनिक पुराणे व शास्त्रे त्यांनी निर्माण केली. दुर्दैवाने भारतात अनेक शतके मुसलमानी सत्ता बिनधोक नांदली. हिंदू जात व हिंदू धर्म यांच्यावर त्या सत्तेने हवा तो जुलूम केला, तरी शास्त्री पंडितांनी आपला मुळचा दृष्टिकोन मुळीच बदलला नाही. नंतर पेशव्यांचे राज्य महाराष्ट्रात आले. त्या राज्याने सामाजिक व शैक्षणिक जुलमाचा कहरच केला. या राज्यात मागासलेला वर्ग व स्त्रिया यांना शिक्षणाची दारे धर्मशास्त्र व कायदा यांच्या आधारे जवळ जवळ बंदच झाली.

महाराष्ट्रात पेशवे यांच्या ऐवजी कंपनी सरकारचे राज्य आले. शांतता व सुव्यवस्था यांच्यासाठी इंग्रजांनी प्रयत्न सुरू केले. त्यामुळे शिक्षणाची दारे सर्वांसाठी उघडली जातील अशी आशा वाटू लागली. परंतु महा--राष्ट्रात इंग्रज हे प्रजेसाठी राज्य करीत नसून 'राज्यासाठीच राज्य' करीत आहेत असा अनुभव येऊ लागला. पेशवाई म्हणजे जिवंत ब्राह्मण्य! याची पूर्ण कल्पना इंग्रजांस होती. ब्राह्मण वर्गाला न दुखविता शिक्षणाबाबत सुधारणा त्यांनी अत्यंत धूर्ततेने सुरू केल्या.

"कंपनी सरकारचे शिक्षणविषयक धोरण सुरुवातीस फार उदार आणि व्यापक होते असे सकृद्दर्शनी वाटते. परंतु एल्फिन्स्टन प्रभृति अधि-काऱ्यांचे खलिते लक्षपूर्वक वाचले, वार्षिक प्रतिवृत्ते बारकाईने पाहिली म्हणजे हा भ्रम आपोआपच दूर होतो. प्रजेच्या नैतिक आणि भौतिक प्रगतीची जबाबदारी सर्वस्वी सरकारवरच आहे अशा तऱ्हेच्या उच्च व आकर्षक तत्त्वांना त्या वेळच्या सरकारी ठरावातून साळसूदपणे मान्यता दिलेली होती. तरीदेखील तत्कालीन अधिकाऱ्यांनी बहुजनसमाजाच्या शिक्षणाकडे जाणून बुजून दुर्लक्ष केले होते. समाजातील बुद्धिमान व वजनदार वर्गाला सरकारी नोकरीच्या रुपेरी बेडीने जखडून टाकून त्याच्या मदतीने या देशावर आपले आसन स्थिर करण्याचा त्यांचा मनसुबा होता. आणि याच दृष्टीने त्यांनी आपल्या शिक्षणकार्याची रूपरेषा आखली होती." दक्षिणेतील कमिशनर चॅपलीन आपल्या रिपोर्टात म्हणतो, "पेशवाई बुडाल्यामुळे ब्राह्मणांची स्थिती फार हलाखीची झाली आहे, शिवाय समाजात ह्या असंतुष्ट वर्गाचे बरेच वजनहि आहे. तेव्हा त्यांना थोडाबहुत आश्रय देऊन इंग्रजी राज्याविषयी त्यांच्या अंतःकरणात निष्ठा उत्पन्न करावी." इंग्रज सरकारने सुमारे शंभर ब्राह्मण विद्यार्थ्यांस दरमहा पाच रुपये स्कॉलरशिप देऊन शिक्षण देण्यास सुरुवात केली. सन १८५१ पर्यंत ह्या शाळेत ब्राह्मण जातीशिवाय इतर जातीच्या मुलांस प्रवेश नव्हता. ही पद्धत तीस वर्षे इंग्रजांनी कटाक्षाने पाळली. मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनचे स्पष्ट मत होते की, सरकारने वरच्या जातीच्या विद्यार्थ्यांसच प्रथम शिक्षण द्यावे, ब्राह्मणेतर जातीच्या विद्या----र्थ्यांच्या बाबतीत हात राखून सरकारने वागावे.

## सरकार, सावकार व हुषार

सरकार, सावकार व हुषार (सुशिक्षित) या तिघांनी एकत्र येऊन इंग्रजी राज्य जनतेच्या पचनी पाडण्याचे प्रयत्न सुरू केले. बहुजनसमाजाच्या शिक्षणाकडे सरकारने जाणून बुजून दुर्लक्ष करण्याचे ठरविले. सन १८४७–४८ च्या सुमारास सरकारी धोरण फार संकुचित होते, "खेड्यापाड्यातील लक्षावधी लोकांच्या प्राथमिक शिक्षणाची हेळसांड करुन शहरातील मूठभर उच्चवर्णीयांच्या उच्च शिक्षणातच सरकारने आपले सामर्थ्य वेचले.' बहुजनसमाजातील मुलांच्या शिक्षणाबाबत सरकारचे धोरण प्रतिकूल होते. अशा त्या काळात मुलींच्या शाळांबाबत सरकारचे धोरण पेशवाईस अनुसरून असणे शक्य आहे.

## प्रथम आरोळी ठोकली

बहुजनसमाजाची शिक्षणविषयक एकंदर दुर्दशा पाहून सार्वत्रिक शिक्षणासाठी, भारतात प्रथम आरोळी जोतीरावांनीच ठोकली.

"आपल्या लक्षावधी देशबांधवांची दुःस्थिती पाहून त्यांचे मन अस्वस्थ झाले. दारिद्र्याच्या दुःखाग्नीत त्यांना होरपळत ठेवून केवळ आपल्या टिचभर संसाराची काळजी घेत बसणे त्यांना प्रशस्त वाटले नाही. बहुजन-समाजाचे सामाजिक व राजकीय हक्क पायदळी तुडविले जातात. त्यांच्या मेहनतीचा मोबदलाहि त्यांच्या पदरात पुरेपूर पडत नाही. सरकारी कायदार यांना लुबाडतात, अन्यायी सावकार त्यांना फसवितात, त्यांच्या गाऱ्हाण्यांची-कोणी दाद घेत नाही. त्यांच्या दुःखाची कोणाला दया नाही. ह्या सर्व अनार्थाचे मूळ जनतेच्या गाढ अज्ञानातच आहे अशी जोतीरावांनी आपल्या मनाशी खुणगाठ बांधली व शिक्षणप्रसाराच्या कार्यात आपले सर्व सामर्थ्य खर्च करण्याचा निश्चय केला." (गं. बा. सरदार) ते नुसते बोलके पंडित नव्हते. विद्यामंदिराचे दरवाजे अखिल स्त्री–पुरुषांसाठी सताड उघडे ठेवण्याच्या ते प्रत्यक्ष प्रयत्नास लागले. सार्वत्रिक शिक्षण, सामाजिक व धार्मिक सुधारणा यांचा राजरस्ता जनतेस दाखविणारा भारतातील हाच पहिला कर्मयोगी !

## मुलींची शाळा

"जनसेवा करावी ह्या हेतून जो कोणी पुढे सरसावतो त्याने

**आपली सुखदुःखे, आपली ऐहिक संपत्ती, कीर्ती इत्यादिकांचे गाठोडे बांधून प्रथम त समुद्रात झुगारून द्यावे व नंतर परमेश्वरापुढे उभे रहावे."**

**— स्वा. विवेकानंद**

जोतीरावांनी तारीख ३ जुलै सन १८५१ रोजी बुधवार पेठेतील अण्णासाहेब चिपळूणकर यांच्या वाड्यात भारतातील पहिली मुलींची शाळा स्थापन केली. हीच भारतात महान क्रांतिकारक गोष्ट ! कारण शास्त्राच्या नावावर धर्मबाह्य ठरवलेली ती बाब ! रूढीधर्माने पाताळात घातले असा तो प्रश्न ! भारतात झालेल्या सर्वच राज्यकर्त्यांनी उपेक्षित केलेली ती महत्त्वाची गोष्ट ! अशा त्या स्त्रीशिक्षणाच्या कार्यासच प्रथम जोतीरावांनी सुरुवात केली. याबाबत तेच सांगत आहेत: "प्रथम स्त्रिया सुशिक्षित झाल्या पाहिजेत. त्याशिवाय समाज खऱ्या दृष्टीने सुशिक्षित होणार नाही." एक सुशिक्षित माता जे करू शकेल ते हजार शिक्षक अगर गुरू म्हणविणारांस अशक्य! त्या सर्वस्वी प्रतिकूल काळात जोतीबांनी मुलींची शाळा सुरू करणे म्हणजे तो त्यांच्या असामान्य अशा धैर्याचा रोख पुरावा !

**"जगात दोन प्रकारचे धैर्य आहे. तोफेच्या तोंडावर धावून जाणे हा एक प्रकार व जी गोष्ट आपल्या विवेकबुद्धीस पटली आहे ती कोणतीहि भीडमुर्वत न बाळगता करणे हा दुसरा प्रकार !" — स्वा. विवेकानंद**

स्वराज्यस्थापनेचे आद्य प्रवर्तक जसे एकटेच शिवप्रभू तद्वत सर्व जातींच्या व पंथांच्या स्त्रीशिक्षणाचे आद्य प्रणेते फक्त जोतीराव फुलेच! हे उभयता धैर्याचे प्रत्यक्ष मेरुमणीच होत.

## सनातन्यांचा विरोध

सन १८५१! भारतासारख्या खंडप्राय देशाचे हे क्रांतिकारक वर्ष! आजपर्यंत भारतीयांच्या स्वप्नातही जी गोष्ट दिसली नसेल ती प्रत्यक्षात जन्मास आली. वेदकाळी व ऐतिहासिक काळात अनेक स्त्रिया सुशिक्षित होत्या. परंतु ते शिक्षण त्यांना घरात दिले जात असे. इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर एकोणिसाव्या शतकाच्या- पूर्वार्धात सबंध भारतात दोन–तीन मुलींच्या शाळा होत्या. परंतु त्यात सर्व बहुजनसमाजाच्या मुलींना समानतेने प्रवेश नसे.

सामुदायिक पद्धतीने सर्व जातींच्या व पंथांच्या मुलींस जाहीर रीतीने

शिक्षण घेण्याचा दरवाजा याच वर्षी जोतीरावांनी प्रथम भारतात उघडला. या वर्षापर्यंत मुलींच्या शाळेस समाजाचा किती कडक विरोध होता हे पुढील हकिगतीवरून दिसत आहे. बाबू ईश्वरचंद्रासारख्या समाजसुधारकाने सन १८५१ सालात आपल्या मुलीला शाळेत घातले म्हणून बहिष्काराची धमकी सनातनी लोकांनी दिली. त्यामुळे त्यांनी मुलीस शाळेतून काढून घेतले. इतकेच नाही तर मुलीचे शुद्धीकरण त्यांना करणे भाग झाले. या एकाच गोष्टीवरून त्या काळच्या सनातनी वृत्तीच्या लोकांचा स्त्रीशिक्षणास केवढा विरोध होत असेल याची कल्पना करता येईल.

सन १८५१ सालात पुणे शहराच्या एकंदर लोकसंख्येपैकी एक-पंचमांश ब्राह्मण असणे शक्य आहे. त्यांच्या ब्राह्मण्यास इंग्रज सरकार खतपाणी देऊन ते जिवंत ठेवित होते. पेशवाई नष्ट होण्यास तेहतीस वर्षे झाली होती. त्यामुळे पेशवाई काळातील स्त्रियांसंबंधीची अनुदारता व जुलूम प्रत्यक्ष पाहिलेले अनेक धर्ममार्तंड जिवंत होते. त्यांनी सर्व बळानिशी मुलींच्या शाळेस विरोध करण्यासाठी कंबरा कसल्या. हे धर्मबाह्य व रूढीबाह्य पाप जन्मताच ठार केले नाही तर हिंदू संस्कृति व हिंदू धर्म यांचा प्राण घेईल. कारण शिक्षणामुळे स्त्रिया शीलभ्रष्ट होतील. पुरुषांस जुमानणार नाहीत. अशा विचाराने पुण्यातील सर्वच कर्मठ बेचैन झाले.

### स्वतःच शिक्षक बनले

शास्त्री–पंडित व सनातनी यांचा शाळेस जळजळीत कडवा विरोध ! रूढीच्या दास्यत्वामुळे अंध बनलेल्या बहुजनसमाजाची उदासीनता ! त्यामुळे शाळेस शिक्षक मिळणे अशक्य ! जोतीराव स्वतःच शिक्षक बनले तरी विरोधकांच्या कारवायांमुळे मुली शाळेत येण्यास टाळाटाळ करीत. अशा वेळी त्यांना कपडे, पुस्तके व खाऊ देऊन त्यांच्यात शिक्षणाची गोडी जोतीबा उत्पन्न करीत. पदरच्या भाकरी खाऊन स्वहस्ते लावलेले स्त्रीशिक्षणाचे रोपटे त्यांनी मोठ्या कष्टाने वाढीस लावले.

### महान् औदार्य व उदारता

**" स्त्रिया आणि सामान्य जनता यांच्यात शिक्षणाचा प्रसार झाल्यावाचून तुमचे पाऊल कधीच पुढे पडावयाचे नाही." – स्वा. विवेकानंद**

स्त्रियांना शिक्षण देणे हे महान पाप आहे अशी अनंत काल भारतात समाजघातक व राष्ट्रघातक समजूत होती. त्या दुष्ट रूढीस कायमची मुठमाती देण्याचे कार्य जोतीरावांनी सुरू केले. हे मुंबईचे बल्लाचार्य यांना कळले. ते खरे सत्वशील ब्राह्मण होते. एक महिन्याचा बारा रुपये पगार जोतीरावांच्या स्त्रीशिक्षण कार्यासाठी त्यांनी पाठविला व पत्राने त्यांचे मनापासून आभार मानले. त्या सर्वस्वी विरोधकांच्या काळात बल्लाचार्यांसारख्या ब्राह्मण गृहस्थाने एक महिन्याची सारी कमाई देणे हे विशेष! हे खरे औदार्य! स्त्री-शिक्षणाचा प्रकाश सर्वत्र वाढता दिसू लागल्यावर काही धनिक लाखांनी देणग्या देत आहेत. परंतु त्या प्रतिकूल कालाच्या मापाने मोजल्यास या हल्लीच्या मोठमोठ्या देणग्या बल्लाचार्यांच्या देणगीपुढे फिक्या दिसतील.

## शाळेस वाढता विरोध

**"परिस्थिती वाईटातली वाईट असली तरी तीत सापडलेली व्यक्ती सामर्थ्यवान असेल तर परिस्थितीला न जुमानता आपले सामर्थ्य ती प्रकट करील. ज्याच्यात जोम आणि चिकाटी या गुणांचे वास्तव्य आहे असा कोणताहि मनुष्य विरुद्ध परिस्थितीला भीक घालीत नाही. आपले साध्य सिद्ध करायचेच असा त्याचा हट्ट असतो. तो अखेरी आपल्या साध्यापर्यंत अवश्य पोहोचतो." – स्वा. विवेकानंद**

शाळेत मुलींची संख्या वाढत आहे हे पाहून धर्मरक्षणाच्या नावाखाली समाजविरोधकांस कर्मठांनी हाक दिली. जीर्णमतवादी व बहुजनसमाजातील रूढीप्रिय अशांना जोतीरावांच्या विरुद्ध भडकविले. धर्माची सत्य तत्त्वे नेहमी पायांखाली तुडवून अनाचारी व अशा दुर्वर्तनी लोकांनी जोतीरावास त्यांच्या कार्यापासून परावृत्त करण्यासाठी हवे ते नीच प्रयत्न धर्मरक्षणाच्या नावाखाली सुरू केले. परंतु हजारो वर्षे स्त्रीजातीवर होणाऱ्या जुलमास वाचा फोडणे व त्या जुलमाचा नायनाट करणे या उच्च ध्येयाने जोतीराव प्रेरित झाले होते. त्यामुळे त्या समाजकंटकांचे सर्व प्रयत्न लुळे पडू लागले.

## आगरकर व कर्वे

स्त्रीशिक्षणाच्या कार्यास जाहीर रीतीने जोतीबांनी प्रत्यक्ष सुरुवात केली त्यावेळी आगरकर व कर्वे हे जन्मासमुद्धा आले नव्हते. सन १८५६-

मध्ये आगरकरांचा जन्म झाला व सन १८५८ मध्ये कर्वे हे जन्मास आले. यावरून स्त्रीशिक्षण व स्त्रियांची सुधारणा यांचे आद्य प्रवर्तक म. जोतीराव फुले हेच आहेत हे स्पष्ट होत आहे.

समाजसेवेचे अंकुर ज्या क्षणी जोतीरावांच्या अंतःकरणात उगवू लागले त्याच क्षणी त्यांनी आपली पत्नी सावित्रीबाई हीस शिक्षण देण्यास सुरुवात केली. सावित्रीबाईंचा जन्म सन १८३१ साली झाला. नायगाव पेटा खंडाळा, जि. सातारा येथील नेवसे पाटलाची ती मुलगी होती. लग्नात तिचे वय आठ वर्षांचे होते. जोतीरावांनी तिला चांगले सुशिक्षित केले. नंतर मिशन शाळेत तिने इंग्रजी शिक्षण घेतले. जोतीरावांच्या प्रत्येक कार्यात ती सहभागी होत असे. पतीची जणू ती पडछायाच असे. (सौ. फुलवंताबाई कृत सावित्रीबाई फुले चरित्र)

## अडचण निर्माण झाली

सर्व प्रकारच्या कडव्या विरोधास जोतीरावांनी तोंड देऊन अंतरीच्या ओढीने मुलींची शाळा स्थिर केली. प्रचार व प्रयत्न यांद्वारे त्यांनी स्त्रीशिक्षणाचे महत्त्व लोकांच्या पचनी पाडले. मुलींची सख्या दिवसेंदिवस वाढू लागली. दुसऱ्या शिक्षकाची गरज भासू लागली. शिक्षक मिळणे अशक्य झाले. कारण स्त्रियांना शिक्षण देणे हेच मुळात पाप ! अशा सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीत मुलींच्या शाळेसाठी दुसरा शिक्षक मिळणे अशक्य ! शिक्षकाअभावी शाळेची प्रगती खुंटेल अशा विचाराने जोतीराव नाराज होऊन बसले असता सावित्रीबाईने सचिंत होण्याचे कारण विचारले. जोतीबा म्हणाले, " शाळेत आणखी एका शिक्षकाची अत्यंत जरुरी आहे ! तू ते काम करू शकशील काय ? " तिने तात्काळ होकार देऊन पतिदेवास अडचणीतून मुक्त केले. इतकेच नव्हे तर दुसऱ्या दिवसापासून शाळेत शिक्षिका म्हणून ती जाऊ लागली.

भारताच्या इतिहासात प्रथमच आश्चर्यकारक गोष्ट जन्मास आल्या; ती म्हणजे सावित्रीबाईने सार्वजनिक शाळेत शिक्षिका म्हणून जाण्याचे दाखविलेले धैर्य. सावित्रीबाईने शाळेत जाण्यास उघड सुरुवात केली हे पाहून कर्मठांना आकाश फाटल्यासारखे भासू लागले. स्त्रियांना शिक्षण देणे हेच

मुळात धर्माच्या विरुद्ध ! ते पाप जोतीबांनी केले. त्यावर कळस म्हणून पत्नीस राजरोस शाळेत मास्तरीण म्हणून तो पाठवित आहे. यामुळे हिंदू धर्म व संस्कृती आता खास रसातळाला जाणार ! भावी काळात या गोष्टीं-मळे केवढा अनर्थ गुजरेल ? स्त्रिया पुरुषास जुमानणार नाहीत व मनुस्मृतीचे महत्त्व राहणार नाही; मनूच्या आज्ञेचा भंग होणार या विचाराने धर्म-मार्तंड बेफाम झाले.

**"सध्याच्या धर्ममार्तंडांनी आखून दिलेल्या मार्गाने समाजाचा नाश होणार हे उघड दिसत आहे." – स्वा. विवेकानंद**

जोतीरावांच्या या धर्मनाशक संस्कृतिघातक कृत्यांचा बंदोबस्त करण्या-साठी कर्मठांनी गोविंदरावांची भेट घेण्याचे ठरविले. भेटीत त्यांनी प्रथम गोविंदरावांची व त्यांच्या घराण्याची तोंड भरून स्तुती केली. नंतर येण्याचा उद्देश उघड केला. "जोतीबांनी मुलींची शाळा काढली, यामुळे सबंध शह-राचा रोष त्यांच्यावर झाला. स्त्रियांना शिक्षण देणे हे धर्मबाह्य व शास्त्र-बाह्य आहे. त्या जात्याच नीच वृत्तीच्या असतात. म्हणून शास्त्राने त्यांच्या-वर अनेक बंधने घातली आहेत. त्यांना शिक्षण मिळाले तर त्यांचे शील भ्रष्ट होण्याचा संभव आहे. शास्त्राने ज्या गोष्टी त्याज्य ठरविल्या, त्याच नेमक्या गोष्टी जोतीराव मुद्दाम करीत आहे. त्याचा प्रश्न सोडा ! तो पुरुष आहे. पण बायकोस राजरोस शाळेत शिक्षिका म्हणून तो पाठवित आहे, हे भयंकर असे पापकृत्य आहे. ज्या घराण्याच्या स्त्रियांचे नाक सूर्यसुद्धा पाहू शकत नाही अशा घरंदाज घराण्यातील बाई राजरोस मडमेसारखी शाळेत जात आहे. तुमचे वराणे खानदानीचे आहे. असे असता तुमचे सुनेबद्दल लोक काय बोलतात ते सांगून आम्ही आमचे पवित्र तोंड विटाळीत नाही. कारण आम्ही श्रेष्ठ वर्णाचे ब्राह्मण आहोत. स्त्रीजातीचा भरवसा धरू नका अशी शास्त्राज्ञा आहे. राम हा अवतारी पुरुष ! परंतु सीतेसंबंधी कोणा सामान्य मनुष्याने नुसता संशय दाखविताच सीता गरोदर असतांनासुद्धा केवळ लोकापवादा-साठी रामाने तिला अरण्यात सोडून दिले व तिचा त्याग केला. धर्मग्रंथा-तील हे एकच उदाहरण पुरे. स्त्रीजातीला शिक्षण देणे हे शास्त्राने पाप ठरले आहे. तुमच्या सुनेने शिक्षण घेतले व ती मास्तरीण बनली; त्यामुळे तिच्या सासरचे व माहेरचे सर्व पूर्वज नरकात खास जातील. हे आम्ही

शास्त्राधारे सांगत आहोत. आपल्या डोळ्यांसमक्ष सबंध पेशव्यांचे राज्य नांदत होते. त्यावेळी या पुणे शहरातच काय सबंध राज्यात एक तरी मुलींची शाळा होती काय? कारण मनुस्मृतीने स्त्रियांस शिक्षण देणे हे धर्मबाह्य व शास्त्रबाह्य ठरविले आहे. जोतीरावांच्या या धर्मबाह्य कृत्यामुळे सबंध पुणे शहर तुमच्या घराण्यावर बहिष्कार पुकारणार आहे. यासाठी सुनेस शाळेत ज..ास बंदी करा. यात तुमच्या घराण्याचे व धर्माचे हित आहे." असा स्त्रीशिक्षणास व स्त्रीसुधारणेस समाजनाशक सुरुंग लावून ते धर्ममार्तंड निघून गेले. "**श्रुति या ग्रंथात नरक या शद्बाचा उल्लेख कोठेहि नाही. हा शब्द पौराणिक काळी उत्पन्न झाला. –स्वा. विवेकानंद.** नरकवास, घराण्याचा लौकिक व बहिष्कार या चक्रात गोविंदराव चांगलेच सापडले. अशा वेळी जोतीराव घरी आले. त्यांना पाहताच गोविंदराव कठोर शब्दात बोलू लागले, "आजपर्यंत या पुणे शहरात कोणाच्याहि हातून घडले नाही असे पापकर्म करून तू नरकात जाशीलच पण सर्व पूर्वजानांहि ढकलणार काय?" शांत मनाने जोतीरावांनी उत्तर दिले," माझ्या हातून आजपर्यंत एकहि वाईट कृत्य घडले नाही व पुढेहि घडणार नाही." हे ऐकून गोविंदराव चढत्या आवाजात म्हणाले, "मुलींची शाळा काढलीस, स्वतः बरोबर सूनबाईलाहि शाळेत नेतोस हे काय पुण्यकर्म?" जोतीराव म्हणाले, "ते नुसते पुण्य नसून महान असे पुण्यकार्य आहे. स्वर्ग, नरक, हे काल्पनिक असून स्वार्थी लोकांनी त्याचे नुसते बंड माजविले आहे. गोविंदराव संतापाने म्हणाले, "तुझे कर्म हे धर्माच्या विरुद्ध आहे." जोतीबांनी सांगितले," जनसेवा हीच खरी ईश्वरसेवा आहे असे तुकाराम महाराज सांगत आहेत."
**जनी जनार्दन। संत बोलती वचन ।।**

"**धर्माचे रहस्य उपपत्तीत नसते, ते अभ्यासात नसते, सद्वतनी होऊन परसेवेत राहणे यात सर्व धर्म आहेत. 'देवा, देवा' म्हणून टाहो फोडणारा मनुष्य खरा भक्त नव्हे." – स्वा. विवेकानंद.** निश्चयी स्वरात गोविंदराव म्हणाले," शाळा बंद करणे नसेल तर तुला घरात राहता येणार नाही. लोकांचा बहिष्कार व नरकवास भोगण्यास मी तयार नाही." "आज्ञा प्रमाण" म्हणन जोतीबांनी वडलांच्या पायावर डोके ठेवले व घर सोडण्याची तयारी केली. केवळ स्त्रीजातीच्या उद्धारासाठी जन्मदाता

आप्तस्वकीय व घरादाराचा सर्वस्वी त्याग जोतीरावांनी तात्काळ केला. पुस्तकांचे गाठोडे घेऊन उभयता नवराबायको अंगावरील वस्त्रांनिशी घराबाहेर पडली. **सत्यासत्याशी मन केले ग्वाही । मानिला नाही बहुमता ।।**

**– तुकाराम महाराज**

## गृहत्याग

**"आपत्ती ही मोठी शाळा आहे. सहानुकंपा, धैर्य आणि मनाचा बळकटपणा हे गुण शिकण्यास आपत्तीसारखा गुरू नाही. त्याच गुरूच्या तालमीत जगातील महात्मे आणि भविष्यवादी निर्माण झाले."**

**– स्वा. विवेकानंद.**

पुण्यप्रतापी शिवप्रभूने स्वराज्यस्थापनारंभ केला. अशा वेळी विजापूरच्या बादशहाने शहाजी राजे यांच्या प्राणाशी गाठ घालण्याचे खेळ सुरू केले; कारण, शिवाजी महाराजांनी आपले इच्छित स्वराज्यस्थापनचे ध्येय सोडावे. या आपत्तीस महाराजांनी धैर्याने तोंड दिले. व ध्येयप्राप्तीसाठी येणारी सर्व संकटे सहन करण्याचे ठरविले. ध्येय सोडण्याच चुकूनहि त्यांच्या मनात आले नाही. त्याचप्रमाणे जोतीरावांनी पित्याच्या क्रोधास भिऊन इच्छित ध्येय सोडले नाहीच; उलट त्या आपत्तीमुळे येणाऱ्या सर्व भावी संकटांना तोंड देण्याची त्यांनी तयारी केली.

## गृहस्थाश्रम

**" परोपकारी लागणारा पैसा मिळविण्यासाठी श्रम करणे हा गृहस्थाश्रमाचा धर्म आहे. येथून सव लोकोपयोगी कार्यास मदत होते. असे मध्यवर्ती ठिकाण म्हणजे गृहस्थाचे घरच होय. नीतीने पैसा मिळवून तो परोपकाथ खर्च करणाऱ्या मनुष्याची योग्यता सर्वसंगपरित्याग करून परमेश्वरप्राप्तीसाठी तप करणाऱ्या योग्याहून तिळमात्रहि कमी नाही. योग्यात आढळून येणारा आत्मत्याग आणि परोपकारार्थ पैसा खर्च करणाऱ्या गृहस्थाचा आत्मत्याग यात काय फरक आहे ?" –स्वा. विवेकानंद**

गृहत्याग करताच, गृहस्थाश्रम जोतीरावाच्या गळ्यात पडला. गंज पेठेत घर भाड्याने घेतले. समाजावर चढलेला गंज कायमचा नाहीसा करण्यासाठीच जणू गंज पेठेने त्यांना आश्रय दिला. संसाराचा जिवंतपणा

म्हणजे पैसा ! त्याच्यासाठी जोतीरावांनी छोटीमोठी कॉन्ट्रॅक्टची कामे घेण्यास सुरवात केली. त्यामुळे मुलींच्या शाळेची सर्वस्वी जबाबदारी सावित्रीबाईवरच पडली. त्या पतिनिष्ठ साध्वीने पतींच्या ध्येयास सर्व प्रकारे पुढे नेण्याचे प्रयत्न केले. कॉन्ट्रॅक्टच्या कामामुळे मजुरांवर होणाऱ्या उघडचा अन्यायाचे चित्र जोतीबास हुबेहूब दिसले. त्यांनी कॉन्ट्रॅक्टच्या कामांबरोबरच नवी नवी सार्वजनिक कामे सुरू केली.

## रूढीचे प्राबल्य

**"रुढी म्हटली की, तिचे जू पुष्कळ वेळा असह्य होत असतांनाहि टाकता येत नाही." –स्वा. विवेकानंद**

रूढीच्या भयाने मुलास व सुनेस गोविंदरावांनी घराबाहेर काढले. जोतीराव प्राणापेक्षाहि त्यांना प्रिय होता. कारण जोतीराव नऊ महिन्यांचा असतांना चिमणाबाई आपल्या चिमण्या जोतीरावास सोडून देवाघरी गेली होती. पुराणातील सावित्रीप्रमाणे सावित्रीबाईची सासऱ्याच्या ठिकाणी पूर्ण भक्ती होती. अशा मुलासुनांस सोडतांना गोविंदरावास यमयातना वाटल्या असतील परंतु रूढीधर्माच्या भयास्तव त्यांना हे कठोर कर्म नाइलाजाने करणे भाग झाले. धन्य ती रूढी व धन्य तिचे प्राबल्य !

## भाऊबंदकी जागी झाली

महाभारत ग्रंथात कौरव–पांडव यांच्या भाऊबंदकीचे रसभरीत वर्णन पुराणकारांनी केले व भाऊबदकीचे उग्र स्वरूप बहुजनसमाजात रुजविले. याचे दुष्परिणाम इतिहास अनेक उदाहरणांनी सांगत आहे. महाप्रतापी राणा प्रताप याचा भाऊ संगराजीत याने केवळ भाऊबंदकीच्या द्वेषाने अकबरास मदत केली. त्यामुळे पारतंत्र्य भारताच्या गळयात अडकले गेले.

धर्म व स्वातंत्र्य यांच्या रक्षणासाठी शिवाजी महाराज प्रयत्न करीत असत; त्यांचे सख्खे चुलत बंधू शेवटपर्यंत मोगलांस मदत करीत होते. इतकेच नाही तर सन १६६७ मध्ये महाराजांच्या रांगणा किल्ल्यास बहिलोलखानाने वेढा दिला त्यावेळी महाराजांचा सावत्र बंधू व्यंकोजी हा मुसलमानांतर्फे प्रत्यक्ष महाराजांशी सामना करीत होता. याच परंपरेचे विष जोती-

रावांच्या भाऊबंदात त्यावेळी सनातन्यांनी जागे केले.

म. फुले यांच्या भावाचे नातू श्री. विश्वनाथ महादेव फुले आपल्या घराण्याच्या श्रेष्ठ पुरुषासंबंधी आत्यंतिक प्रेम व आदर दाखवीत आहेत. प्रस्तुत लेखकास ते भेटले असता त्यांनी सांगितले, "अधिकारी प्रकाशनने फुले समग्र ग्रंथ यात माझ्या नावावर जे लिहिले ते सर्वस्वी खोटे आहे. तसे त्यांना मी लेखी कळविले आहे."

## तपश्चर्या व छळ

अंगावरील वस्त्रांसह सावित्राबाईने गृहत्याग केला, कारण स्त्रीजातीच्या उद्धारासाठी आपल्या प्राणश्वराने प्राणपणाने जे कार्य सुरू केले त्याच्या पूर्ततेसाठी तिने आनंदाने संसारसुख सोडले. संसारसुखाचा मोह त्यावेळी तिने धरला असता किंवा जोतीबांच्या ध्येयात पूर्णपणे मोडता घातला असता तर स्त्रीशिक्षणाचा गाडा जागीच थांबून त्याचे अस्तित्व त्या काळी तरी नष्ट झाले असते. स्त्रीशिक्षणास सुरुवात जोतीबांनी केली. परंतु त्या कार्यास स्थैर्य प्राप्त करुन त्याची वाढ करावयाचे खरे श्रेय सावित्रीबाई फुले यांनाच आहे. याबाबत मामा परमानंद हे ता. ३१ जुलै सन १८९० रोजी बडोद्याचे दिवाण धामणकर यांना पत्रात लिहित आहेत–

"जोतीबांपेक्षाहि त्यांच्या पत्नीचे कौतुक करावे तेवढे थोडेच होईल तिची योग्यता काय सांगावी! आपल्या पतिबरोबर तिने संपूर्ण सहकार्य केले. व त्यांच्याबरोबर राहून वाटचास येतील त्या हालअपेष्टा भोगल्या. उच्चवर्णीयातील उच्च शिक्षण घेतलेल्या स्त्रियातहि अशा प्रकारची त्यागी स्त्री आढळणे कठीण आहे. एक मराठा गृहस्थ आपल्या विपरीत काळात आपल्या पत्नीला सुशिक्षित करतो आणि तिच्याद्वारे ब्राह्मणांच्या मुली सुशिक्षित करण्याचा प्रयत्न करतो आणि ते कुठे? तर त्या वर्गाच्या बालेकिल्ल्यात!"

जोतीबास गृहत्याग करणे कर्मठांनी भाग पाडले, पिता–पुत्रात वैर निर्माण करुन हिंदू संस्कृतीवरील अरिष्ट टाळण्यासाठी हवे ते प्रयत्न केले तरी सावित्रीबाई शाळेत राजरोस शिक्षिका म्हणून जात आहे हे पाहून-

सनातन्यांची तळपायाची आग मस्तकात शिरली. आपली उच्च व परमपूज्य अशी हिंदू संस्कृती आता नामशेष होणार ! मोठमोठे पंडित व ऋषी यांनी अनेक शास्त्रांद्वारे स्त्रियांवर समाजहितासाठी अनेक कठोर बंधने घातली आहेत. स्त्रीचा जन्म हा नवऱ्याच्या सेवेसाठीच. नवऱ्याच्या मृत्यूनंतर तिचे अस्तित्व शास्त्राने नष्ट केले आहे. या बाईच्या नोकरीचे अनुकरण उच्च-वर्णीय स्त्रियांनी जरकेले तर समाजात केवढा अनर्थ गुदरेल? स्त्रिया शिक्षणा-मुळे अनाचारी होतील वगैरे प्रतिगामी विचार समाजात पसरविण्यास त्यांनी सुरुवात केली. व सावित्रीबाईचा छळ नाना प्रकारे ते करू लागले.

**“स्त्रियांच्या उन्नतीसाठी तुम्ही काय केले ? स्मृती लिहून नाना नियमांची जोखडे त्यांच्या गळयात तुम्ही अडकविली, तुम्ही त्यांना नुसती प्रजोत्पादक यंत्रे बनविली आहेत. या जगन्मातांचा उद्धार तुम्ही न कराल तर तुमच्या उन्नतीला दुसरा मार्ग नाही.” –स्वा. विवेकानंद**

स्त्रियांची खरी उन्नती शिक्षणानेच होईल या भावनेने प्रेरित होऊन सावित्रीबाई शाळेत जात असता जाण्यायेण्याच्या रस्त्यावर स्त्रीशिक्षणाचे वैरी धर्मरक्षणाची ढाल पुढे करून तिचा छळ करू लागले. शिवीगाळ, अपमान-कारक बोलणे, स्त्रीमनास सहन न होणारे असे बीभत्स उद्‌गार काढणे असे निंद्य प्रकार त्यांनी सुरू केले. इतकेच नाही तर शेण व चिखल तिच्या अंगावर मारण्याचेहि अनेक प्रकार केले. धर्मरक्षणाचा रोख पुरावा म्हणून काहींनी सावित्रीबाईस दगडसुद्धा मारले. तिच्या अंगातील रक्ताने तो रस्ता पावन होऊ लागला. त्या रक्ताच्या मोलानेच स्त्रीजातीच्या उद्धाराचा मार्ग कायमचा मोकळा झाला. मोठमोठे ध्येयनिष्ठ पुरुषसुद्धा असल्या प्रतिकूल व अपमान-कारक परिस्थितीत आपल्या इच्छित ध्येयापासून पाठमोरे झालेले आहेत. परंतु स्त्रीजातीची उद्धारकर्ती ती राष्ट्रमाऊली रेसभरहि प्राप्त कर्तव्या-पासून मागे परतली नाही. किंवा परतण्याचे विचार तिच्या मनाला स्पर्श करू शकले नाहीत. धन्य ती सावित्री ! धन्य तिची पतिनिष्ठा ! धन्य तिचे ते स्त्रीशिक्षणप्रेम !!! शाळेच्या कामामुळे दुपारची भाकरी खाण्याचेसुद्धा तिला भान रहात नसे. कारण शाळेचा सर्वस्वी भार तिच्या शिरावर होता. मुलींच्या शाळेचे काम जोतीराव व सावित्रीबाई यांनी एक पैसा पगार म्हणून

न घेता केले. इतकेच नाही तर उलट शाळेचा सर्व खर्च जोतीराव करीत. त्यागाच्या उघड्या स्वरूपात असा आत्यंतिक त्याग इतरत्र आढळणे अशक्य. मुलींच्या शाळांसंबंधी जोतीरावाने केलेले कार्य त्यावेळच्या सरकारी रिपोर्टात आहे: "पहिली शाळा ३ जुलै १८५१ बुधवार पेठ अण्णासाहेब चिपळूणकर वाडा. दुसरी शाळा रास्ता पेठेत १७ सप्टेंबर १८५१ मध्ये चालू झाली आणि तिसरी शाळा १५ मार्च १८५५ रोजी वेताळ पेठेत चालू झाली."

## आर्थिक साहाय्य

शाळेच्या खर्चासाठी काही युरोपियन व उदार विचारांचे हिंदू यांनी मदत केली. सरकारने कर्तव्याच्या लाजेस्तव दक्षणा फंडातून दरमहा ७५ रुपयांची मदत सुरू केली. स्त्रीशिक्षणाचा व स्त्रीदाक्षिण्याचा पुरस्कार करणारे इंग्रज सरकार सनातन्यास त्या काळी घाबरले. स्त्रीशिक्षणाच्या कार्यास जरूर ती मदत करू शकले नाही. गोरगरीबांच्या उपवासी पोटातून निर्माण झालेला सरकारी कर लाखो रुपयांनी महाराष्ट्रात अनेक देवस्थानास देणग्या म्हणून सरकार देत होते. सरकारने उपेक्षा केली, सनातन्यांनी कडवा विरोध केला, धर्मरक्षण व संस्कृतीरक्षण या नावाखाली रूढीचे दास यांनी मानवी मनास न शोभणारी अनेक कृत्ये केली. अशा सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीत स्त्रीशिक्षणाची ज्योत प्रथम जोतीराव व सावित्रीबाई यांनी पाजळली व ती वाढत्या तेजाने तेवत ठेवली. भारतात जे कोणी करू शकले नाही ते कार्य फक्त जोतीरावाने केले म्हणूनच सरकारला जोतीरावांच्या कार्याकडे नाइलाजाने लक्ष देणे भाग पडले.

## सरकारकडून जाहीर सत्कार

**" परकीय सरकार ही देशावर मोठी आपत्ती आहे यात संशय नाही. पण वाईटातूनहि चांगल्याची निपज होते हे विसरता कामा नये ।।**

**– स्वा. विवेकानंद**

इंग्रजांचे राज्य होते म्हणून स्त्रीशिक्षणाचा दरवाजा जाहीर रीतीने जोतीरावांना उघडणे शक्य झाले. पेशवाईत स्त्रीशिक्षणाचा नुसता उच्चारहि जोतीरावांना करता आला नसता.

स्त्रीशिक्षणाच्या कार्याकडे सरकारी शिक्षणखात्याचे व काही उदार-

मनाच्या सज्जनांचे लक्ष गेले. त्यामुळे गव्हर्नर साहेबांच्या अध्यक्षतेखाली शनिवारी तारीख १२ फेब्रुवारी १८५३ रोजी जोतीरावांचा जाहीर सत्कार करण्यात आला. स्त्रिया, अस्पृश्य व बहुजनसमाज यांच्यावर क्रूर जुलूम करण्याचे प्रमुख स्थान जो पेशव्यांचा विश्रामबाग वाडा यातच हा समारंभ करण्यात आला. समारंभास पुण्यातील सर्व इंग्रज सपत्नीक आले होते. सरदार, इनामदार हे झाडून हजर झाले. सरकारी नोकर, शेटसावकार व प्रतिष्ठित नागरिक मोठ्या संख्येने दिसू लागले. बहुजनसमाजाचा तर जणू पूरच लोटला होता. तीन हजारांवर लोक समारंभास आले होते. सत्कार समारंभासाठी एवढा थोरला समाज यापर्वी पुणे येथे कधीच जमला नव्हता. हाच महाराष्ट्रातील पहिला जाहीर सत्कार समारंभ !

जोतीरावांच्या कार्याची व धैर्याची गव्हर्नरसाहेबांनी मुक्त कंठाने स्तुती केली. जोतीरावांवर काही इंग्रज गृहस्थांनी गौरवाचा वर्षाव केला तर काहींनी सावित्रीबाईच्या धैर्याचे वर्णन केले. शास्त्र व धर्म यांच्या नावाखाली अनंत काल स्त्रियांवर मानवी मनाला न शोभणारा जो क्रूर जलूम होत असे त्याला वाचा फोडण्याचे कार्य जोतीरावांनीच प्रथम केले, असे काही हिंदी गृहस्थांनी सांगितले. शेवटी गव्हर्नर साहेबांनी स्त्रीशिक्षणाच्या कार्या-बद्दल जोतीरावास धन्यवाद दिले. गव्हर्नर साहेबांनी स्वहस्ते दोनशे रुपयांची शाल त्यांना अर्पण केली. त्यावेळी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. त्या आवाजाने स्त्रीजुलमाचा मृत्यूच जणू जाहीर झाला! जोतीरावांचे कार्य व सावित्रीबाईचे धैर्य हे व्हिक्टोरिया राणीच्या कानापर्यंत गेल्याचे त्यावेळी सांगण्यात येत असे.

## जोतीरावांचे उत्तर

**"जग काय म्हणते ? मला कोणी हसते काय ? असल्या क्षुद्र विचारास थारा न देता स्वतःला योग्य वाटेल ते कार्य नित्य आचरणे, सर्व जीविताचे रहस्य आहे." –स्वा. विवेकानंद**

"स्त्रियांवरील होणाऱ्या जुलमाने माझ्या हृदयास पाझर फुटला. धर्माच्या नावाखाली होणाऱ्या कठोर अन्यायामुळे, त्या फोडीत असलेल्या किंकाळ्यांनी माझा हृदयस्थ आत्मा जागा झाला. हजारो वर्षे त्यांनी भोगलेल्या

ह्यांनीच मला प्रेरणा दिली. परमेश्वराने माझ्याकडून हे कार्य करून घेतले. ह्या यशाचे खरे धनी माझे तीन ब्राह्मण मित्र, काही इंग्रज व इतर सज्जन आहेत. त्यांच्या मदतीशिवाय मी काहीच करू शकलो नसतो." अशा अर्थाचे भाषण करून जोतीराव स्वस्थानी बसले. या समारंभामुळे सनातनी मंडळींस अत्यंत खेद वाटला. कारण इंग्रज सरकार यापुढे मुलींच्या शिक्षणास खास चालना देणार, त्यामुळे आपल्या धर्माचा व संस्कृतीचा नाश होणार असे त्यांना जाणवू लागले.

## गोविंदरावास समाधान

**पुत्र व्हावा ऐसा गुंडा । ज्याचा तिन्ही लोकी झेंडा ।।**

आपल्या आवडत्या पुत्राचा जाहीर सत्कार झाला. गव्हर्नरसारख्या मोठ्या अधिकाऱ्याने त्याची स्तुती केली. शाल देऊन सन्मान केला. हे सर्व ऐकून गोविंदरावास धन्यता वाटली. जोतीरावसारखा सुपुत्र आपल्या पोटी जन्मला हे फुले घराण्याचे भाग्य ! कारण घर सोडतांना त्याने निश्चयाच्या स्वरात सांगितले होते की मुलींची शाळा काढणे हे पाप नसून पुण्य आहे. ते प्रत्यक्षात खरे ठरले. यानंतर गोविंदराव त्यांच्यावर पूर्ववत प्रेम करू लागले

## पंतप्रधान पदावर स्त्री--

भारताच्या गत इतिहासात आजपर्यंत न घडलेली आश्चर्यकारक गोष्ट. प्रत्यक्षात दिसत आहे. भारताच्या पंतप्रधानपदावर विराजमान झालेली स्त्री ! या महत्वाच्या गोष्टीचे सर्वस्वी श्रेय महात्मा फुले व सावित्रीबाई फुले यांनाच आहे. जोतीरावाने स्त्रीशिक्षणास सुरुवात केली व सावित्रीबाईंनी स्त्रियात नोकरी करण्याचे धैर्य निर्माण केले. यामुळेच इंदिरा गांधी आज ह्या पदी दिसत आहेत.

## पन्नास वर्षानंतरहि दिसले नसते

महाराष्ट्रात आज स्त्रीशिक्षणाची जी सर्वत्र प्रगती दिसत आहे ती आणखी कदाचित पन्नास वर्षांनंतरहि दिसली नसती. तिचे सर्वस्वी श्रेय म. फुले यांच्यापेक्षा मती सावित्रीबाई फुले यांनाच आहे. आज शिक्षिका, प्रोफेसर डॉक्टर, नर्स, वकील, मॅजिस्ट्रेट, गव्हर्नर वगैरे अनेक क्षेत्रात स्त्रिया

सर्वत्र दिसत आहेत. याचे मूळ व खरे कारण सावित्रीबाई फुले यांचे धैर्य ! तिची आठवण या सुशिक्षित स्त्रियास होते काय ? त्या त्या खडतर तपचर्येची जाणीव त्यांना आहे काय ? रस्त्यावर सांडलेल्या तिच्या रक्तातून त्यांच्या भाग्याचा जन्म झाला आहे याची कल्पना येते काय ? स्त्री-शिक्षणाची निःसीम निष्ठा व त्यासाठी भोगलेला अमानुष छळ, यांचे चित्र त्यांच्या नजरेसमोर उभे राहते काय? निदान शिक्षिका व स्त्री प्रोफेसर यांनी शाळा-कॉलेजच्या रस्त्यावरून जातांना तिची स्मृती करणे त्यांचे आद्य कर्तव्य आहे. स्त्रीशिक्षण व स्त्रीसुधारणेचा मार्ग हजारो वर्षे धर्मशास्त्राच्या व रुढीच्या नावावर बंद होता. खडतर अशा तपश्चर्येने व पतिनिष्ठेने सावित्रीबाईने तो मोकळा करण्यासाठी जोतीरावांना मदत केली.

## उद्धारकर्त्यांचा विसर

स्त्रियांच्या उन्नतीसाठी कर्मठ व धर्ममार्तंड यांच्या टीकेचा मारा त्यांनी सहन केला व स्त्रीसुधारणेचा पाया भरला. त्यासाठी ते पायातील दगड बनले. त्यामुळेच स्त्रीसुधारणेची आधुनिक इमारत उभारली गेली. म. फुले-गोवंडे, जोशी, विष्णुशास्त्री पंडित, परांजपे, वाळवेकर, भाऊ महाजन, विष्णुबवा ब्रह्मचारी, डॉ. भांडारकर, आगरकर असे अनेक ज्ञात व अज्ञात महापुरुष हेच स्त्रीजातीचे खरे उद्धारकर्ते ! पण हल्लीच्या बहुतेक सुशिक्षित स्त्रिया या सर्वांना जवळ जवळ विसरल्याच आहेत. उलट वर्णाश्रम धर्माचे ढोलके हातात घेऊन जे राजकारणाच्या अंगणात नाचले व ज्यांनी या महापुरुषांच्या स्त्रीशिक्षणाच्या कार्याला लाथाडण्याचा प्रयत्न केला त्यांना देशभक्त म्हणून सुशिक्षित स्त्रिया विशेष मान देतात व त्यांच्या जयंत्या साजऱ्या करतात. परंतु देशभक्त म्हणविणाऱ्यांनी स्त्रीजातीच्या उन्नतीच्या मार्गास किती कडवा विरोध केला या महत्वाच्या गोष्टीकडे ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीने पहाणे हे आधुनिक सुशिक्षित स्त्रियांचे खरे कर्तव्य आहे.

## आधुनिक युगातील सती सावित्री

पुराणातील सावित्रीने नवरा, सासरा व स्वतःचे गेलेले राज्य, यांसाठी निष्ठेने प्रयत्न केले. म्हणून तिची स्मृती स्त्रिया वटसावित्री या व्रताने दरवर्षी साजरी करीत असतात. पण या आधुनिक सावित्रीने स्त्रीजातीच्या शिक्षणा-

साठी] कडकडीत अशी कठीण तपश्चर्या केली. स्त्रीजातीस शिक्षणाचे वर–दान मिळवून दिले. हजारो वर्षे रूढीरूपी राक्षसाने धर्माज्ञेच्या नावाखाली स्त्रीस्वातंत्र्यास ग्रासले होते. त्यांच्यापासून यांची कायमची सुटका केली. म्हणून या सती सावित्रीची निदान सुशिक्षित स्त्रीने तरी नित्य स्मृती करणे हे तिचे परम व आद्य कर्तव्य नाही काय ?

## स्त्रियांसाठी सार्वजनिक सेवेचा मार्ग

"सन १८७६–७७ सालात महाराष्ट्रात भयंकर असा दुष्काळ पडला होता. माणसांचेच नव्हे तर पशूंचे जीवन विस्कळीत झाले होते. अशा दुर्धर प्रसंगी ज्योतीरावांनी दुष्काळाबाबत पुढाकार घेतला. रा. ब. जोशी, रा. ब. लोखंडे, रा. ब. गोवंडे, देशमुख वगैरे अनेकांचे साह्य घेतले. सत्यशोधक समाजातर्फे सुमारे बावन्न अन्नसत्रे निरनिराळ्या ठिकाणी काढली. सरकार-कडून व जनतेकडून मदत मिळविली. बारा वर्षांखालील हजारो मुलांमुलींस मोफत जेवण देत. या कामी सावित्रीबाई यांनी पुढाकार घेतला. त्यांना सौ. गोवंडे, सौ. जोशी वगैरे स्त्रियांनी मदत केली. अन्नसत्रांची व्यवस्था स्त्रियांनी ठेवली. सावित्रीबाईंनी या कामी अहोरात्र कष्ट केले. स्त्रियांस सार्वजनिक सेवा व परोपकाराच्या कार्याचा मार्ग महाराष्ट्रात प्रथम सावित्रीबाईंनी दाखविला. त्यामळे हरएक सार्वजनिक कार्यात स्त्रिया भाग घेत आहेत. याचे मूळ सावित्रीबाई फुले !" (सावित्रीबाई चरित्र).



## प्रकरण सहावे

# भारताच्या इतिहासात प्रथम जन्मास आलेली अस्पृश्य-शाळा व अस्पृश्योद्धार

"शूद्रांना शिक्षण दिले की जग बुडेल, असे ठासून सांगणारे बुढ्ढे ज्योतिषी आमच्या हिंदुस्थानात जागोजाग आहेत. खालच्या वर्गाला अज्ञानांधकारात ठेवण्याचा विडाच जणू काय ह्या लोकांनी उचलला आहे."

—स्वा. विवेकानंद

भारताच्या उपलब्ध इतिहासात कनिष्ठ वर्गास शिक्षणापासून दूर ठेवण्याचे प्रयत्न वरिष्ठ वर्गाने धर्माच्या व शास्त्राच्या नावावर दीर्घ काल केले आहेत. पेशवाई काळात तर कायद्याने अस्पृश्यास शिक्षण घेण्यास बंदी होती. इंग्रजांच्या राज्याच्या सुरवातीच्या काळी सरकारचे अस्पृश्यांच्या शिक्षणाबाबत जाणून बुजून दुर्लक्ष होते. सरकारी खर्चाने फक्त ब्राह्मणांच्या शिक्षणाकडे सर्वतोपरी लक्ष देण्याचे सरकार आपले कर्तव्य समजत असे.

"कोणी आजारी झाला तरी सरकारातून वैद्य पाठवून औषधाचा व पथ्यपाण्याचा बंदोबस्त व्हावा." "खुद्द पेशवाईतसुद्धा ब्राह्मण वर्गाच्या विद्याभ्यासंगाची काळजी इतकी कधीहि घेतली नसेल." "दिवाळीत सर्व विद्यार्थ्यांस तेथे अभ्यंगस्नानाखेरीज फराळास करंज्या, लाडू, अनारसे, कडबोळी इत्यादि मिळत असत. असा पेशवाई थाट त्या शाळेत चालला होता." वरील वर्णन करतांना श्री. ग. त्र्यं. माडखोलकर हे अंतःकरणापासून लोकहितवादींसारख्या सच्च्या समाजसुधारकावरहि त्याच वेळी तुटून पडत आहेत.

हिंदूंनी तर धर्माच्या नावावर अस्पृश्यास अनंत काळ जाणून बुजून दूर लोटले. मुसलमानी अमदानीत त्या अस्पृश्य म्हणूनच जगणे भाग झाले. पेशवाई काळात त्यांचे मनुष्यपणाचे सारे हक्कहि हिरावून घेतले

भारतातील थोर सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक

## प्रा. न. र. फाटक, मुंबई



ऐतिहासिक सत्य निर्भिडपणे मांडणारे. म. फुले, लोकहितवादी, न्या. रानडे, स्वामी दयानंद सरस्वती वगैरे महापुरुषांच्या सुधारणातत्वांचा प्रसार करण्यासाठी झटणारे व बहुजनसमाजास सुधारणादृष्टीची देणगी देणारे थोर लेखक व प्रस्तुत पुस्तकाचे प्रस्तावना-लेखक.

# दे. भ. द. शं. उर्फ दादासाहेब पोतनीस

संपादक, दैनिक गावकरी, नासिक.



सुमारे पस्तीस वर्षांपूर्वी शेतकऱ्यांच्या जीवनाशी खेड्यापाड्यात प्रत्यक्ष समरस होऊन त्यांच्या सुधारणेसाठी तळमळीने जागृती केली. म. फुले यांच्या उदार विचारांचे पुरस्कर्ते. विधायक कार्यकर्ते. राजकीय, सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक क्षेत्रात सतत ३० वर्षे सुधारणेचे कार्य. समता व समभाव यांच्या प्रसारासाठी नानाविध उपक्रम सुरु केले. शेतकरी व बहुजनसमाज यांच्या सुधारणेसाठी झटणारे थोर देशभक्त.

## श्री. शंकरराव भाऊराव राऊत उर्फ भाऊसाहेब
माळीनगर (जि. सोलापूर)



संत सावता महाराजांची भक्ती व म. फुले यांची समाजोद्धाराची प्रवृत्ती ही यांच्या ठिकाणी एकत्रित स्पष्ट दिसते. धार्मिक, शैक्षणिक व सार्वजनिक कार्यास मुक्त हस्ते मदत करणारे सुप्रसिद्ध बागाईतदार. दि सासवड माळी सहकारी साखर कारखान्याचे डायरेक्टर व समाजाचे मार्गदर्शक.

# पद्मश्री वसंतराव पाटील उर्फ दादासाहेब

सांगली



महात्मा फुले यांच्या समता व समभाव तत्त्वाचे पुरस्कर्ते. शिक्षण-प्रसार, शेती व शेतकऱ्यांची सुधारणा. सहकारी चळवळीचा प्रसार करून सहकारी साखर कारखान्याची स्थापना व चेअरमन. विधानसभेचे काही वर्षे सभासद. सार्वजनिक क्षेत्रात अनेक जबाबदारीच्या स्थानांवर. राष्ट्रीय मिल मजूर संघ (मुंबई) चे अध्यक्ष, महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेसचे अध्यक्ष.

गेले. इंग्रजांनी तर राज्याच्या स्थिरतेसाठी पेशवाईचे धोरणच जणू आचरण्याचे ठरविले होते. अशा सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीत रंजल्या गांजलेल्या अस्पृश्य समाजाच्या उद्धारासाठी जोतीरावांनी शिक्षणरूपी शस्त्र हाती घेऊन अस्पृश्यता नष्ट करण्याचे प्रयत्न सुरू केले.

## शाळेस सुरवात

**" देव, धर्म, न्याय, नीती, पाप-पुण्य व पुनर्जन्म या शब्दांचा जन्म व सोने निर्माण करण्याची कला ह्या सर्व गोष्टी जगाच्या पाठीवर प्रथम भारतातच जन्मास आल्या. त्याचबरोबर जगात कोठेहि दिसणार नाही ती कठोर अस्पृश्यता व स्त्रियांवरील क्रूर जुलूम या गोष्टींचा जन्महि भारतातच प्रथम झाला आहे. "**

**" एखाद्या ब्राह्मणाने सुप्रभाती अत्यंज जातीच्या मनुष्याचे तोंड पाहिले तर त्याने सारा दिवस उपवास करावा असे काही ग्रंथात सांगितले आहे. "**

**– स्वा. विवेकानंद**

धर्मग्रंथांच्या नावावर व वर्णाश्रमाच्या आधारावर अस्पृश्यता ही भारतात उघडा धिंगाणा घालीत आहे. तिचा नाश साधू, संत, महंत यांनाहि करता आला नाही. राज्यकर्ते तर तिच्या वाटेस जाण्यास धजत नाहीत. अशा अस्पृश्यतेचा नायनाट फक्त अस्पृश्य समाजच स्वत: करील असे जोतीरावांनी मनाशी ठरविले. अस्पृश्यतेचे मरण हे सर्वस्वी अस्पृश्य समाज सुशिक्षित होण्यातच आहे या तत्त्वानुसार जोतीरावांनी अस्पृश्य समाजासाठी सन १८५२ मध्ये पुणे येथे शाळेची व्यवस्था केली. असा प्रयत्न भारताच्या गत इतिहासात शोधू जाता सापडणार नाही. तो प्रयत्न करणारा भारतातील आद्यपुरुष जोतीबाच !

ता. २९ मे सन१८५२च्या 'पुणे ऑबझर्व्हर' या वर्तमानपत्रावरून– "परोपकार बुद्धीने प्रेरित झालेले एक माळी जातीचे हिंदू गृहस्थ यांनी स्वखर्चाने अस्पृश्यांकरिता एक शाळा काढली आहे. हे ऐकून एतद्देशीय सुधारणेच्छू मंडळींना फार आनंद होईल. ही शाळा वेताळ पेठेत आहे. येथे महार, मांग आणि पटवारी अशा जातींच्या मुलींना शिकविण्यात येते. " याच पत्रात १८५२ च्या जूनमध्ये पुढीलप्रमाणे आहे: "शूद्रांच्या शाळा–जोतीराव

गोविंदराव फुले यांनी वेताळ पेठेत दोन शाळा स्थापन केल्या आहेत. महार, धेड, मांग आणि चांभार अशा शूद्रांच्या मुलींकरता एक शाळा असून दुसरी त्याच लोकांच्या मुलांकरिता आहे. या दोन्ही शाळात शिकविण्याचे व देखरेखीचे काम जोतीराव करतात. त्यांना मदतीला ब्राह्मण मास्तर आहे. या शाळांचा खर्च जोतीराव स्वतःच्या पैशाने करतात. या कामी त्यांना एतद्देशीय व युरोपियन लोकांची मदत आहे. याच महिन्यापासून दक्षणा प्राइजफंडातून या शाळांस दरमहा २५ रुपयांची ग्रँट सुरू झाली आहे. " प्रजेच्या फाटक्या तुटक्या संसारातून कररूपाने वसूल केलेला असा अमाप पैसा त्यातून ब्राह्मणांच्या दक्षणेसाठी सरकार दरसाल पन्नास हजार रुपये खर्च करीत आहे. व अस्पृश्यांच्या शिक्षणप्रसाराला फक्त दरसाल ३०० रुपये देत आहे. हा इंग्रज राजनीतीचा महत्त्वाचा रोख पुरावा !

## उपेक्षा कायम

**" शूद्र वर्ग आज दीर्घ काळ गुलामगिरीसारख्या स्थितीत खितपत पडलेला आहे. उच्चवर्णीयांनी त्याला भरडून काढण्यासाठी सुरुवात केल्यास किती काळ लोटला याचे गणित करता येत नाही." – स्वा. विवेकानंद**

अनंत कालाच्या जुलमामुळे अस्पृश्यातील माणुसकी मरणाच्या पंथास लागली होती. स्वतःच्या उन्नतीसाठी लागणारा स्वाभिमानहि त्यांच्यात जिवंत नव्हता. रूढीच्या प्राबल्यामुळे, उच्चनीचतेच्या प्रखर माऱ्यामुळे, पूर्व जन्माच्या पापपुण्यांच्या वेडगळ समजुतीमुळे मनुष्यपणाच्या हक्काने जगणे व शिक्षण घेणे हे आपल्या नशीबात नाही, अशा भावनेने अस्पृश्य समाजात भयंकर उदासीनता त्याकाळी दिसून येत होती. याबाबत जोतीबा सांगत आहेत :—

" लोक आपली मुले पाठविण्यास इच्छितात परंतु लहुजी बीन राघू राऊत मांग (दांडपट्टा शिकविणारे फुल्यांचे गुरू) व राणबा महार यांनी शिकण्यापासून कसे कसे लाभ आहेत हे आपल्या जातवाल्यांस समजावून मुले पाठविण्याची तयारी केली. . . . .मुले फार जमली म्हणून कृपा करून विष्णुपंत थत्ते (ब्राह्मण) यांनी शिकविण्यास मला मदत केली. तरी महार लोकांस पाणी घेऊ देईनात. त्यामुळे शाळेच्या पाण्यास खर्च लागे आणि ती

पोरे अगदी गरीब असल्यामुळे वस्त्रादि द्यावे लागे आणि उत्तरोत्तर मुलांची संख्या वाढल्यामुळे दुसरी जागा घेणे प्राप्त झाले.

"पाणी सर्व लोकांस जगण्यास मुख्य कारण म्हणून त्यास संस्कृत भाषेत जीवन असे म्हणतात. ते देखील त्यांस भिक्षा घातल्याप्रमाणे उच्च जातींनी घातल्याखेरीज मिळत नाही. मग अवांतर पदार्थ कोठून ? याच-करिता या लोकांची दाद विद्याद्वारेच लागेल असे मनात बाळगून यांसच प्रथम शिकविण्याची योजना करणे ही गोष्ट उत्तम आहे असे मला वाटते."

"महार, मांग, चांभार हे या देशात फार असून ते अगदी नीचावस्थेत आहेत. हे पाहून ईश्वराच्या प्रेरणेने माझ्या मनात अशी इच्छा प्रेरित झाली की अशांना सुशिक्षित करण्याविषयी काहीतरी उपाय करावा. प्रथम मनात आले की, आईच्या योगाने मुलांची जी सुधारणा होते ती फार चांगली आहे. म्हणून त्या लोकांच्या मुलींची प्रथम शाळा घालावी."

अस्पृश्यतेचा नायनाट फक्त अस्पृश्य समाजातील सुशिक्षितच करू शकतील हे जोतीरावांचे मत प्रत्यक्षात डॉ. बाबासाहेब आंबेडकर या जन्मा जात पुढाऱ्याने कृतीने प्रत्यक्षात करून दाखविले. अस्पृश्यता निवारण्याच्या बाबतीत अस्पृश्य समाजातील सुशिक्षित अशा जन्मजात पुढाऱ्यांनी पोटतिडी-कीने व आतड्याच्या तळमळत्या कळवळ्याने जेवढे कार्य केले तसे आज-पर्यंत कोणासहि करता आले नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात– "आजवर महात्मा गांधींप्रमाणे अस्पृश्यता हा हिंदू धर्मावरील मोठा कलंक आहे असे आम्ही मानीत होतो. पण आता आमची दृष्टी फिरली आहे-तो आमच्या नरदेहावरील कलंक आहे असे आम्ही समजतो. हा हिंदू धर्मा-वरील कलंक आहे असे जोपर्यंत आम्ही मानीत होतो तोपर्यंत तो काढून टाक-ण्याचे कार्य आम्ही तुमच्यावर सोपविले होते. हा आमच्यावरील कलंक आहे, अशी आमची जाणीव झाल्यामुळे तो धुऊन काढण्याचे पवित्र कार्य आता आमचे आम्हीच स्वीकारले आहे. या कार्याच्या सिद्धीप्रीत्यर्थ आमच्या-पैकी काहीजणांना आत्मयज्ञ करावा लागला तरी आम्ही मागेपुढे पाहणार नाही."–(ब. भा. ता. २२-४-१९२७)

**"आमच्या साऱ्या दुःखाला आणि अवनतीला कारण आमचे आम्हीच.**

आमच्या उच्चजातीय पूर्वजांनी सामान्य जनतेस एकसारखे पायाखाली तुडविले. ही त्यांची क्रिया इतका काळ चालू राहिली की, त्या काळात आमच्या सामान्य जनतेची स्वतःच्या माणुसकीची जाणीवही सर्वथा नष्ट झाली. आपण माणसे आहोत ही गोष्टसुद्धा आमची सामान्य जनता विसरून गेली."

— स्वा. विवेकानंद

डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणतात—"अस्पृश्यात माणुसकीची जाणीव म. फुले यांच्या शिक्षणप्रसाराच्या कार्यामुळे झाली. आजपर्यंत ज्यांना अवतारी पुरुष म्हणून मानण्यात येत आहे त्या साऱ्यांनी अस्पृश्यता जिवंत ठेवण्यासाठी प्रयत्न केले इतकेच नाही तर तिच्या वाढीसाठी ते झटत होते. अस्पृश्यता गाडण्याचा खरा प्रयत्न करणारा एकच अवतारी पुरुष. तो म्हणजे महात्मा फुले."

शाळेस कार्यकारी मंडळ नेमले. त्याबाबत सन १८५३ च्या ज्ञानोदयात पुढीलप्रमाणे आहे:

"महार, मांग लोकांस शिकविण्यासारखे या देशात कोणतेही हित नाही असे जोतीराव फुले व त्यांचे जिवलग मित्र यांच्या मनात येऊन त्यातून जोतीराव यांनी या कामाविषयी बहुत दिवसांपासून उद्योग चालविला आहे. या कामाकरिता मंडळी असावी यास्तव सर्वांनी मिळून सभा स्थापन केली. त्यात गोवंडे, वाळवेकर, परांजपे, जोतीराव व ढेंगळे होते. अध्यक्ष म्हणून सदाशिव बल्लाळ गोवंडे होते." गोवंडे यांनी अस्पृश्यांच्या शाळेसाठी तेवीस वर्षे निष्ठेने जोतीरावांस मदत केली.

या कार्यकारी मंडळात जोतीरावांशिवाय बहुतेक सर्वच ब्राह्मण आहेत. या गोष्टीवरून हेच स्पष्ट होत आहे की, जोतीरावांची कार्यसंघटना विशेष अशी होती. या मंडळाने सरकारात शाळेच्या इमारतीच्या मदतीसाठी अर्ज केला. सरकारने रु. पाच हजार ग्रँट दक्षणा फंडातून मंजूर केली पुढे ते प्रकरण शिक्षण खात्याचे डायरेक्टर सर पेरी यांच्याकडे गेले. त्याबाबत त्यांचे मत पुढीलप्रमाणे : "ब्राह्मणांच्या शिक्षणासाठी खास राखून ठेवलेल्या दक्षणा फंडातून महार–मांगांच्या शाळेसाठी खर्च केला जात आहे. हे पाहून पेरी साहेबास फार खेद झाला. आणि पाच हजारांऐवजी तीन हजाराचीच इमारत बांधावी अशी सूचना केली." सर बॉटर फिअर (मुंबई गव्हर्नर) हे

म्हणतात— "एखाद्या चांगल्या शाळेत जितके अधिक ब्राह्मण आपली मुले पाठवतील तितके शिक्षणाप्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाचा बोजा सरकारने उचलण्याचे अधिक चीज होईल." लॉर्ड एल्फिस्टन (गव्हर्नर), सर वॉर्टर फिअर, डायरेक्टर हावर्ड साहेब वगैरे अधिकाऱ्यांचा अस्पृश्यांच्या शिक्षणाबाबत किती विपरीत ग्रह होता, ह्याची 'त्रिमूर्ती-दर्शन अथवा सदाशिवराव गोवंडे' हे चरित्र वाचले असतांना स्पष्ट कल्पना येईल. सरकारची उपेक्षावृत्ती, उच्चवर्णीयांचा व रूढीप्रिय बहुजनसमाजाचा कडवा विरोध अशा सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीत जोतीरावांनी अस्पृश्यांच्या शिक्षणास चालना दिली नसती तर अस्पृश्य समाजात आज शिक्षणाचा जो प्रसार दिसत आहे तो आणखी कित्येक वर्षातहि दिसला नसता.

## मानवी जन्माची देणगी

**"शंकराचार्यांनी अद्वैत मताचे पुनरुज्जीवन करून आपल्या अतुल बुद्धिबलाने त्याचा प्रसार साऱ्या देशभर केला. आर्यावर्ताला त्यांनी तात्त्विक स्वरूपाकडे वळविले हे खरे. तथापि आचार्यांच्या या कर्तृत्वाचा उपयोग सामान्य जनतेस फारसा झाला असे म्हणता येत नाही. सामाजिक विषमता मोडण्याकडे आचार्यांची प्रवृत्ती नव्हती. जातिभेदादि सामाजिक दोष त्यांनी तसेच कायम राहू दिले." –स्वा. विवेकानंद**

शंकराचार्यांच्या जातिभेदाच्या विचारसरणीवर आघात करण्याचे कार्य प्रथम जोतीरावांनीच केले. ते म्हणतात—" मराठे, माळी, धनगर, इतर सर्व स्पृश्य जाती व महार मांगादि सर्व अस्पृश्य जाती या सर्वांचे पूर्वज एकच आहेत. इतकेच नव्हे तर देशस्थ ब्राह्मण यांचेहि पूर्वज यांच्यापैकीच आहेत. जाती ह्या परमेश्वरनिर्मित व पूर्वकर्मानुसार आहेत असे स्वार्थी लोकांनी आपल्या स्वार्थासाठी ग्रंथात मुद्दाम खोटे लिहून ठेवले आहे." समाजघातक व धर्मनाशक गोष्टींचे निर्मूलन प्रत्यक्ष कृतीने करण्याचे कार्य भारताच्या इतिहासात प्रथम म. फुले यांनीच केले.

## अस्पृश्यांसाठी स्वतःचा हौद मोकळा केला

**"हिंदुस्थानात आर्यांचेच वंशज आहेत. त्यावाचून दुसरा कोणताहि वंश येथे नाही."– स्वा. विवेकानंद**

हिंदू हे एकाच वंशाचे असता, त्यांच्यात चार वर्णांची कृत्रिमता निर्माण केली. त्यातूनच सुमारे चार हजार जाती हिंदू समाजात आज दिसत आहेत. ते परस्पर एकमेकांस हिंदू म्हणून मानण्यास तयार नाहीत, एक जात दुसऱ्या जातीला कारण नसता कमी मानीत आहे. एक हिंदू दुसऱ्या हिंदूच्या हातचे अन्नच काय पण स्पर्श झालेले पाणीसुद्धा पिण्यास तयार नाहीत. त्यात त्यांचा रूढ धर्म व जातीचा कृत्रिम श्रेष्ठपणा आडवा येत आहे. विसाव्या शतकाच्या सुरवातीस एका जातीच्या मनुष्याने दुसऱ्या जातीच्या हातचे नुसते पाणी प्याल्यामुळे जातिबहिष्काराची रणे माजत होती. तसे काही प्रकार आजहि अडाणी अशा समाजात घडत आहेत. परंतु जोतीराव फुले यांच्या-प्रखर तपश्चर्येमुळेच ती प्रथा आज नष्ट होत आहे.

जातिभेदाच्या प्रखरतेस पेशवाई काळात विशेष जोर आला. कोकणस्थ ब्राह्मणांच्या स्त्रिया देशस्थ ब्राह्मणांच्या स्त्रियांचे अन्न घेत नसत. तर काही देशस्थ ब्राह्मण-कोकणस्थांच्या पंक्तीत बसत नसत. या प्रकारांमुळेच जाति-जातीत उच्चनीचतेचे बंड माजण्यास कारण झाले. या अनिष्ट गोष्टींच्या पुरस्कारार्थ हल्लीच्या काळी सुशिक्षित म्हणविणारे काही वर्णाभिमानी लोक-म्हणतात, 'महार जात ही मांगांच्या हातचे पाणी पीत-नाही.' परंतु सत्य गोष्टीकडे ते मुद्दाम डोळेझाक करीत आहेत. ब्राह्मण जातीने इतर सर्व जातींच्या हातचे पाणी पिण्याचे प्रथम बंद केले. त्याला धार्मिक स्वरूप दिले. ब्राह्मणांचे स्वतंत्र हौद व पाणवठे निर्माण केले. इतर जातींनी ब्राह्मणांना स्पर्श केल्यास स्वतःस पाप लागेल अशी त्यांच्यात खोटी धार्मिक भावना निर्माण केली. त्यामुळेच हिंदू समाज एखाद्या चाळणीसारखा होऊन त्याच्यात जातिभेदाची स्वतंत्र अशी असंख्य भोके निर्माण झाली.

जातिभेदाच्या कठोर माऱ्याने अस्पृश्य समाजाचे पिण्याच्या पाण्याच्या बाबतीत भयंकर हाल होत आहेत. आजच्या स्वातंत्र्याच्या काळातहि कित्येक ठिकाणी त्यांना सार्वजनिक पाण्याच्या विहिरीतून राजरोस पाणी भरता येत नाही. परंतु सकाळी महार असलेला इसम दुपारी मुसलमान झाल्यास सायंकाळी तो राजरोस सार्वजनिक ठिकाणी पाणी भरू शकतो. त्यात हिंदूंचा श्रेष्ठपणा अगर धर्माचा प्रश्न आडवा येत नाही हे त्या काळी म. फुले यांनी स्पृश्य समाजास पटविण्याचा प्रयत्न केला. मानवी हक्काच्या उच्च तत्त्वास

जागून जोतीरावांनी स्वतःचा हौद अस्पृश्यांसाठी मोकळा केला. परंतु अस्पृश्य पाप–पुण्य व पूर्वकर्म या काल्पनिक भीतीमुळे हौदावर पाणी भरण्यास धजेनात. अशा वेळी जोतिरावांनी पाण्याचे हांडे त्यांच्या डोक्यांवर स्वहस्ते ठेवून हजारो वर्षे जिवंत असलेली त्यांची मानसिक गुलामगिरीची भावना नष्ट केली.

## पाण्याने आग लावली

हिंदू धर्म व हिंदूंची उच्च संस्कृती यांस जोतीरावांनी अस्पृश्यांसाठी पाण्याचा हौद मोकळा करून जणू ओली आगच लावली अशी भावना कर्मठांची झाली. पाणी–पाणी म्हणून एखाद्या अस्पृश्याचा प्राण जाण्याची वेळ जरी आली तरी त्याला स्पर्श करून त्याच्या तोंडात पाणी घालू नये अशी आमची धार्मिक संस्कृती असता जोतीरावांनी स्वतःचा पाण्याचा हौद अस्पृश्यांसाठी जाहीर रीतीने मोकळा केला व त्यात सर्व जातींच्या व सर्व पंथांच्या लोकांस पाणी भरण्याचा आग्रह तो स्वतः करीत आहे त्याची ती कृती मनुस्मृतींच्या उच्च तत्त्वास आग लावणारी आहे.

कर्मठांच्या भविष्याप्रमाणे पाण्यामुळेच मनुस्मृतीस आग लागली. महाड येथील सार्वजनिक तळ्यातील पाणी पिण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी हजारो अस्पृश्य स्त्रीपुरुषांच्या संख्येने सत्याग्रह केला असत सनातनी वृत्तीच्या हिंदूंनी त्यांना जळजळीत विरोध केला. या विरोधाचे जन्मस्थान म्हणजे मनुस्मृती ! त्या मनुस्मृतीनेच हिंदूतील कृत्रिम उच्चनीच भेदभाव वाढीस लागून ते जिवंत ठेवले आहेत म्हणून तो मनुस्मृती ग्रंथच बाबासाहेब आंबेडकरांनी जाहीर रीतीने प्रथम जाळला. मनुस्मतीनेच हिंदूंची सत्य धर्माची स्मृती नष्ट केली. याबाबत दिवेकर शास्त्री 'आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' या ग्रंथात सांगत आहेत, "बुद्धोत्तर काळात पराशरापासून पुढच्या सर्व स्मृती निर्माण झालेल्या आहेत. म्हणूनच त्यात शिवाशीव, विटाळ, सोवळे यांचे धर्म भरलेले आहेत. मुसलमानांच्या स्वाऱ्या जयिष्णुतेच्या वृत्तीने एकसारख्या होऊ लागल्या. त्यांनी हिंदू समाजाची वर्मे ओळखून त्यांच्यावर आघात करण्यास प्रारंभ केला. त्याचा विचार स्मृतिकारांनी व पंडितांनी करावयास पाहिजे होता. पण दुःखाची गोष्ट ही की, त्यांनी

आपल्या ग्रंथात हा विचार केला नाही. सातव्या शतकापासून सोळाव्या शतकापर्यंत जे निबंधकार झाले, त्यांनी जिकण्याचा धर्म सांगितला नाहीच पण जगण्याचा धर्महि न सांगता खाऊ नकोस, शिवू नकोस, तसे करशील तर पाप लागेल असे म्हणून प्रायश्चित धर्माचेच विवेचन केले आहे." स्मृतिकारांनी हिंदू धर्माच्या बाबतीत भेदभावाचे पाप करण्याचे जे प्रयत्न केले, त्याचे समळ निर्मूलन करणारा जोतीराव फुले हाच भारतातील आद्यपुरुष !

## संत गाडगे महाराज

संत गाडगे महाराज हे आधुनिक काळातील संत तुकारामच ! सन १९०५ सालापासून भक्तिप्रसाराबरोबर सामाजिक सुधारणेचे कार्य त्यांनी सतत बावन्न वर्षे केले. ते महाराष्ट्रभर सारखे फिरत होते. प्रस्तुत लेखकाने सन १९१६ साली त्यांचे प्रथम कीर्तन ऐकले. त्यात त्यांनी पुढीलप्रमाणे उदाहरण दिले होते:

"सुमारे दोन अडीचशे घरांचे एक खेडेगाव होते. तेथे एक माळकरी महार रहात होता. तो भागवत पंथाचा व हिंदू धर्माचा अभिमानी होता. त्याची बायको पाणी आणण्यासाठी सार्वजनिक विहिरीजवळ जाऊन बसली. स्पृश्य हिंदू स्त्रियांस पाणी देण्यासंबंधी गयावया ती करीत होती. 'बाईसाहेब पाणी वाढा, घरी पोर रडत आहे' असे म्हणत असता तिच्या विनंतीकडे कोणी लक्ष देईना. त्याच वेळी तिची धाकटी बहिण विहिरीवर पाणी भरण्यास आली. ती मुसलमानीण झाली होती. विहिरीवर येताच ब्राह्मणाच्या बाईने तिला जागा दिली. मारवाडी बाई विहिरीत बादली सोडून स्वस्थ उभी राहिली इतर स्त्रिया जपून पाणी भरू लागल्या. तिने दोन तीन हंडे पाणी नेले. तिच्या हातचे पाणी घेतल्यास नवरा मार देईल. कारण तो हिंदू धर्माचा कट्टा अभिमानी आहे. महार बाईने त्या (मुसलमान) झालेल्या बहिणीस प्रश्न केला," आपण एकाच आईचे दूध प्यालो. असे असता तुला विहिरीवर राजरोस पाणी भरता येते व मला का नाही ?" तिने उत्तर दिले, "माझा नवरा (मुसलमान) हा वाघ आहे, मला कोणी पाणी भरण्यास मनाई केली तर त्याचे तो नरडे फोडील. तू विहिरीस स्पर्श

केलास म्हणून तुला कोणी मारले तरी तुझ्या नवऱ्यास राग येणार नाही. उलट त्या मारणाऱ्या स्पृश्य हिंदूच्या तो पाया पडण्यास जाईल." " असे महाराजांनी सांगितल्यावर हात वर करून म्हणाले, "मुसलमानांनी स्वतःच्या मनगटाच्या जोरावर स्पर्शास्पर्श भेद नष्ट केला. त्या गोष्टीस हिंदू धर्मशास्त्राचा आधार नाही किंवा त्यात हिंदूंच्या मनाचा मोठेपणाहि नाही. महार मांगादि लोकांनी आपल्या गरिबीच्या वागणुकीने शिवाशीव जिवंत ठेवली."याबाबत ते काही अनुभव सांगत: " अप्रसिद्धीच्या काळात मी एखाद्या विहिरीच्या काठावर बसत असे. अशा वेळी मालक येऊन विचारीत, तुझी जात कोण? मी महार सांगत असे त्यावेळी मालक संतापून शिव्या देई. मी उत्तर देत असे, 'मी थोडेच पाण्याला शिवलो.' अशा वेळी मालक संतापून काही प्रसंगी मारहि देत असे. महाराने विहीर बाटवली म्हणून विसाव्या शतकाच्या सुरवातीस ब्राह्मणांस विहिरीच्या काठावर बसवून त्याच्याकडून विहीर शुद्ध केल्याचे प्रकार घडत असत. अशा गोष्टींचा नायनाट जोतीरावांच्या प्रचारामुळे झाला." म. फुले यांच्यासंबंधी संत गाडगे महाराज यांना विशेष आदर होता. प्रसंगोपात्त त्यांच्यासंबंधी माहिती करून घेत. हल्लीच्या सुधारणेच्या काळातसुद्धा कित्येक पदवीधर- हरिभक्त ब्रह्म, माया, मुक्ती, मोक्ष व नरकवास अशा शब्दांचे अवडंबर माजवून धर्मप्रसाराच्या नावाखाली जातिभेद व वर्णश्रेष्ठता यांना खतपाणी देत आहेत. समाजसुधारणा व जातीय ऐक्य या राष्ट्रोन्नतीच्या बाबीस चुकूनहि हात लावीत नाहीत. समाजसुधारणेचे कार्य फक्त महात्मा जोतीराव यांचे अनुयायीच करीत आहेत.

## भारताच्या इतिहासात पहिले महत्त्वाचे दृश्य

जोतीरावांच्या शाळेबाबत ज्ञानोदय ता. १६ जून १८५८ च्या अंकावरून "पुण्यात महारमांगांच्या तीन शाळा आहेत. सदरहू शाळांमध्ये एकंदर २५८ विद्यार्थी आहेत" असे दिसते. सबंध भारतात अस्पृश्यांची शाळा व त्यातील विद्यार्थ्यांची एवढी संख्या इतरत्र कोठेहि त्याकाळी नव्हती. इंग्रज सरकारचे धोरण बहुजनसमाजाच्या शिक्षणप्रसाराच्या बाबत अत्यंत प्रतिगामी होते. प्रा. सरदार सांगत आहेत — " खेड्यापाड्यातील लक्षावधी

लोकांच्या प्राथमिक शिक्षणाची हेळसांड करून शहरातील मूठभर उच्च-वर्णीयांच्या उच्च शिक्षणातच सरकारने आपले शक्तिसर्वस्व वेचले. . . खेडे-गावातील स्पृश्य हिंदूंच्या शिक्षणाची जिथे एवढी अनास्था तिथे धार्मिक, सामाजिक व आर्थिक दृष्ट्याहि निकृष्टावस्थेत असलेल्या अस्पृश्यांच्या शिक्षणाची किती दुर्दशा होत असेल, ते सांगावयास नको. त्या वेळी शाळा खात्यातील शिक्षक, तपासनिस व अन्य अधिकारी बहुधा ब्राह्मणच असत, आणि त्यांना अंत्यजांच्या सावलीचाहि विटाळ होत असे. त्यामुळे सरकारी शाळेत–देखील अस्पृश्यांच्या मुलांना प्रवेश मिळत नसे. त्यांच्या न्याय्य हक्कांची अशा रीतीने पायमल्ली होत असतांनाहि इंग्रज अधिकारी तिकडे डोळेझांक करीत. कारण हिंदुस्थानातील बहुजनसमाजाच्या सुखदुःखांचे त्यांना कधीच सोयरसुतक नव्हते. ख्रिस्ती उपदेशकांनी या प्रश्नाला काही ठिकाणी तोंड फोडले. नासिक, धारवाड इत्यादि शहरात वाद उपस्थित झाले. शेवटी इ. स. १८५८ त सरकारी विद्याधिकारी मे. हॉवर्ड यांना आपला निर्णय जाहीर करावा लागला. ह्या त्यांच्या हुकमामुळे अस्पृश्यांच्या विद्यालयप्रवेशाला कायदेशीर मान्यता मिळाली. तरीदेखील प्रत्यक्ष व्यवहारात त्याची अमलबजावणी करून घेतांना गरीब बिचाऱ्या अस्पृश्यांना अनेक अडचणींचे डोंगर ओलांडावे लागले असतील यात बिलकुल शंका नाही. हंटर कमिशनपुढे साक्ष देतांना म. मो. कुंटयांसारख्या व्युत्पन्न पंडितांनीहि अत्यंजांच्या विद्यालयप्रवेशासंबंधी काढलेले अनुदारतेचे उद्‌गार वाचले म्हणजे अव्वल इंग्रजीत या सुधारणेला उच्चवर्णीयांचा किती तीव्र विरोध असेल याचा सहज अंदाज करता येईल."

सरकारी ठरावाप्रमाणे तीन महार मुलांस प्राईस या मिशनऱ्याने नासिकच्या सरकारी शाळेत दाखल करण्याचा प्रयत्न केला. डायरेक्टर हॉवर्ड यांनी सरकारी ठराव धाब्यावर बसवून त्या मुलांच्या प्रवेशास विरोध केला. यांबाबत ते म्हणतात,— "थोड्याशा महार मुलांसाठी बहुसंख्य ब्राह्मणांच्या मुलांचे नुकसान करणे सरकारास बरे वाटत नाही." शेवटी याच डायरेक्टर साहेबांनी सन १८६१ मध्ये दक्षणा फंडातून मिळणारी जोतीरावांच्या अस्पृश्यांच्या शाळेची ग्रँट बंद केली. यावरून हे स्पष्ट होत आहे की, इंग्रज अधिकारी हे वरिष्ठ वर्गाच्या धोरणास सर्व प्रकारे उचलून धरीत होते,

असें असता ब्राह्मणेतर हे इंग्रजधार्जिणे, ही ओरड पुढारलेल्या वर्गाची सतत सुरू असे.

अस्पृश्य समाजाच्या शिक्षणाबाबत इंग्रज सरकार कसे प्रतिगामी आहे, याबाबत जोतीराव अत्यंत कळवळ्याने सांगत आहेत, "आजपावेतो कोटयवधी रुपये विद्याखात्याकडे खर्ची पडले आहेत. तथापि त्यांपासून शूद्रांच्या समाजाच्या मानाप्रमाणे त्यांच्यात विद्वान लोकांचा भरणा नाही, इतकेच नव्हे तर महार, मांग आणि चांभार यांपैकी कोणी एकहि शिकलेला कामगार आढळत नाही ; त्यांच्यात एम्. ए. किंवा बी. ए. औषधास देखील मिळण्याचो मारामार." मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर सन १८६१-मध्ये रानडे, भांडारकर, वागळे, मोडक वगैरे ब्राह्मण पदवीधर बनले. महाराष्ट्राचे राज्य इंग्रजांनी घेतल्यानंतर शंभर वर्षात एकहि अस्पृश्य पदवीधर निर्माण झाला नसेल. याला कारण वरिष्ठ वर्गाचा विरोध व सरकारी धोरण. या धोरणावर जोतीबा प्रखर टीका करीत आहेत– "या आपल्या सरकारच्या दिगंबर विद्याखात्याच्या गोऱ्या तोंडावर या काळचा तोंडाच्या भटपंतोजींनी हा केवढा काळोखाचा डाग लावला आहे." अस्पृश्यांच्या मुलात शिक्षणप्रसार होण्याबाबत जोतीराव सूचना करीत आहेत :

"आपल्या इंग्रज सरकारने सर्व जातींच्या मुलांस शाळेत घेण्याविषयी जरी मोकळीक दिली आहे तरी अतिशूद्रांच्या जातीतील पंतोजी तयार करण्याविषयी त्यांनी काही तजवीज केली नाही. यावरून आर्यधर्मअनुयायी भट–ब्राह्मण पंतोजींकडून अतिशूद्रांची मुले विद्वान होऊन मोठे कामगार कधीच होणार नाहीत. याविषयी आमच्या भोळसर सरकारने विचार केला आहे काय ? कारण आर्य लोकांच्या एकतर्फी ग्रंथात शूद्रादि अतिशूद्रांस विद्या न देण्याविषयी कडेकोट बंदोबस्त केला आहे आणि धूर्त आर्य ब्राह्मण आपली पोटें जाळण्याकरिता विद्वान झालेले पोटार्थी भट पंतोजी यांकडून खेडेगावातून अतिशूद्रांची मुले शाळेत शिकून विद्वान होणार नाहीत; असे मी खात्रीने सांगतो."

## विरोधक चवताळले

"शूद्र वर्ग अति दीर्घ काळ गुलामगिरीसारख्या स्थितीत खिचपत

**पडलेला आहे. उच्चवर्णीयांनी त्यांना भरडून काढण्यासाठी सुरवात केल्यास किती काळ लोटला याचे गणित करता येत नाही. "–स्वा. विवेकानंद.**

जोतीरावांनी अस्पृश्यांची शाळा काढली. दिवसेंदिवस तिची वाढ होत आहे हे पाहून वरिष्ठ वर्गास पेशवाईची आठवण होऊ लागली. आज इंग्रजाचे राज्य आहे म्हणून जोतीराव धर्मबाह्य व शास्त्राने निषिद्ध ठर– विलेले असे कार्य राजरोस करीत आहे. पेशव्यांच्या राज्यात अशा कृत्याबद्दल त्याचा कडेलोटच झाला असता. शाळेत शिकणाऱ्या अस्पृश्यांच्या मुलांना तर इमारतीच्या पायातच दडपले असते. मुसलमानी राज्यात व पेशवाई काळात मोठमोठ्या इमारती बांधतांना इमारतीच्या वाढीसाठी भग (बळी) देण्याची पद्धत होती असे आजहि काही वृद्ध सांगत आहेत. त्यात बहुतेक अस्पृश्यांची मुले असत. आपल्या श्रेष्ठ ऋषिमुनींनी अस्पश्यांच्या बाबत घालून दिलेली परंपरा आपण टिकविली पाहिजे. यासाठी सर्व बळानिशी जोतीबांस विरोध केला पाहिजे.

हिंदूंचा नाश करणारे बहिष्काराचे शस्त्र हे फार पुरातन काळा-पासून आहे. या शस्त्राने हिंदू जात व हिंदू धर्म यांचा नाश केला पण या शस्त्राची आवड आजकालहि काही लोकात दिसत आहे. जोतीरावांवर बहिष्काराचे शस्त्र कर्मठांनी उगारले; त्यात त्यांचे भाऊबंद प्रथम तयार झाले. इतर जातीहि त्यात सामील झाल्या. परंतु बहिष्कृतांसाठीच ज्यांचा जन्म ते जोतीराव बहिष्कारास थोडेच भीक घालणार! बहिष्काराचे शस्त्र जोतीरावांनी बोथट करून ते निकामी केले.

## स्थिरता व वाढ

**"आपल्या हक्कांसाठी ब्राह्मण जो जो अधिक ओढाताण करील तो तो त्रास मात्र अधिक; यावाचून दुसरा कोणताही फायदा त्यांच्या पदरी पडणार नाही. याकरिता हिंदुस्थानातील सर्व कनिष्ठ जातींच्या उद्धारार्थ कंबरा बांधणे हे आज ब्राह्मणांचे पहिले कर्तव्य आहे. ब्राह्मण वर्ग जोपर्यंत हे कार्य करीत असेल तोपर्यंत तो खरा ब्राह्मण. पैसे मिळविण्याचा धंदा कर-णारा मनुष्य खरा ब्राह्मण नव्हे."– स्वामी विवेकानंद**

हजारो वर्षे अस्पृश्यांवर जुलूम करण्याच्या सवयीने हिंदूंची मने बधीर

झाली होती. त्यांना स्वकर्तव्याची खळखळीत उकळ महात्मा फुले यांनी आणली. त्यांच्या या कार्यास भाऊ महाजन, लोकहितवादी, विष्णु-बुवा ब्रह्मचारी, विष्णुशास्त्री पंडित, विष्णु मोरेश्वर भिडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, जगन्नाथ सदाशिव, केशव शिवराम जोशी, बापू मांडे, सदाशिव बल्लाळ गोवंडे, मोरो विठ्ठल वाळवेकर, वामन प्रभाकर, विनायक बापू, वामन गोपाळ, विष्णुपंत थत्ते वगैरे ज्ञातअज्ञात अशा अनेक ब्राह्मणांनी अस्पश्य जातींच्या उद्धारास साहाय्य करून राष्ट्रहित व धर्महित साधले. व खरे ब्राह्मण या संज्ञेस ते प्राप्त झाले. अशा राष्ट्रहित साधणाऱ्या खऱ्या ब्राह्मणांस अनेक सुशिक्षित मुद्दाम विसरत आहेत. उलट ज्यांनी वर्णाश्रमाची तरफदारी करून बहुजनसमाजाचे अहित करण्याचा जणू विडाच उचलला होता अशांच्या जयंत्या ते करीत आहेत हे आश्चर्य ! जोतीराव व त्यांचे खरे साहाय्यकर्ते ब्राह्मण मित्र यांनी अस्पृश्यांची शाळा स्थिर करून वाढीस लावली. इतकेच नाही तर सरकारासहि या राष्ट्रोन्नतीच्या कार्याकडे लक्ष देणे भाग पडले.

### ध्येयसिद्धी

पुणे म्हणजे ब्राह्मण्याचे जिवंत असे धगधगते अग्निकुंड. त्यात सापडलेल्या अस्पृश्यतारूपी बालकास सहीसलामत बाहेर काढणे हे कार्य सामान्याचे नव्हते. जोतीरावांनी ते अतुल धैर्याने व निष्ठेने केले. अस्पृश्यांच्या शाळेस नुसती स्थिरताच नव्हे तर तिला जिवंत स्वरूप देण्याचे काम त्यांनी केले. ते म्हणतात, "जिच्यापासून आपले बरेवाईट समजण्याची शक्ती त्यांस येईल अशी चांगल्या प्रतीची विद्या त्यांस द्यावी." अस्पृश्य मुलांमुलींस नुसते पुस्तकी शिक्षण देणे हे त्यांचे ध्येय नव्हते. भावी काळात ते चांगले अस्पृश्योद्धारक बनावेत म्हणून ते निरनिराळे प्रयत्न करीत. त्यांना सभेत भाषण करता यावे म्हणून वक्तृत्वकला शिकवित. ते चांगले लेखक व्हावेत म्हणून निरनिराळे निबंध लिहिण्यास सांगत. एका चौदा वर्षे वयाच्या मांग मुलीने निबंध लिहिला होता. त्यातील सारांश : तिने देवास प्रश्न केला, "देवा ! ब्राह्मणास जसा वेद, तसा आम्हां अस्पृश्यांस कोणता धर्मग्रंथ? ब्राह्मण आज वेदाचे आज्ञेप्रमाणे वागत नाहीत; आम्ही दुसरे बाजीरावाचे वेळेस असतो तर लिहिणे

सोपे झाले. याबाबत स्वामी रामतीर्थ सांगत आहेत, " हिंदुस्थानात मुसलमानी अम्मल सुरू होण्यापूर्वी खोरासन प्रांतातील अल्बेरुनी नामक एक विद्वान प्रवास करून गेला होता. त्याने मुद्दाम संस्कृत शिकून आर्यांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. त्याने हिंदूधर्मातील तत्कालीन समाजस्थितीची विस्तृत माहिती लिहून ठेवली आहे. एकंदर बहुजनसमाज व सर्व वर्णातील स्त्रिया यांची स्थिती अत्यंत शोचनीय आणि केविलवाणी असल्याचे त्या स्पष्ट नमूद केले आहे. खालच्या वर्गातील लोकांकडे उच्च वर्णातील लोकांचे बिलकूल लक्ष नसल्याचे आणि त्यांचा सर्व प्रकारे अधःपात झाल्याचे त्याने स्पष्टपणे लिहिले आहे. सामाजिक, धार्मिक व राजकीय बाबतीत समाज अगदी विस्कळीत झाला असून दुहीचे साम्राज्य पसरले आहे. अशा प्रकारे दुर्दशा झाली असल्यामुळे हिंदुस्थानची लोकसंख्या कोटीने नव्हे तर दश कोटींनी मोजता येण्यासारखी असूनहि शिस्त आणि एकोपा यांच्या-अभावी गजनीचा सुलतान महंमद याने हिंदुस्थानावर ज्या वेळेस चढाई केली त्यावेळी खापरात फुटाणे उडावेत त्याप्रमाणे हिंदु लोकांच्या चिंधड्या उडाल्या. (स्वा. रामतीर्थ खं. ६) महंमद घोरीच्या स्वारीबाबत रियासतकार सरदेसाई रासा ग्रंथावरून सांगत आहेत.–" येथील शेतकरी व कामकरी वर्ग इतक्या निकृष्टावस्थेत पडला होता की ब्राह्मणांस व क्षत्रियांस ते शत्रूसमान समजतात आणि त्यांच्या जाचणुकीतून सुटका होईल तर बरे असे त्यांना होऊन गेले होते. शूद्रांस तर परशत्रूच्या आगमनाने आनंदच वाटला."

## ब्राह्मणी धर्मामुळे –

**" वेदाचा अधिकार ब्राह्मणांशिवाय इतर वर्गांस नाही. या मतामुळे धर्माचा व देशाचा अधःपात झाला. पायाखाली तुडविले गेलेल्या लोकांस मुसलमानाच्या राज्यात सुखाचे दिवस दिसले. आपल्यापैकी एकपंचमांश प्रजा मुसलमान कां झाली, याचे कारण हेच होय. केवळ तलवारीच्या धारेनेच मुसलमानी धर्माचा इतका प्रसार येथे झाला नाही. जाळपोळ आणि कापाकापी या साधनांनी मुसलमानी धर्म येथे इतका फैलावला असे म्हणणे मूर्खपणाचे आहे. "— स्वा. विवेकानंद**

हिंदूंच्या सामाजिक जुलमामुळेच अस्पृश्यादि लोकांनी होऊन परधर्म

वाचणे हे फक्त ब्राह्मणांचे काम; ते इतर जाती करू लागल्या तर ब्राह्मणांनी काय धोपटचा घेणे! असे बाजीराव म्हणाला असता. आम्ही शिक्षण घेत आहोत हे पाहून त्याने आम्हांस फाशी दिले असते" वगैरे विचार तिने प्रदर्शित केले होते. अस्पृश्यतेची पाळेमुळे फक्त अस्पृश्य समाजच उखडू शकेल या विचाराने विद्यार्थ्यात समाजोन्नतीची भावना ते उत्पन्न करीत. अस्पृश्य समाज परंपरेच्या दास्यातून मुक्त होण्यासाठी विद्यार्थ्यांत सुतारी, लोहारी गवंडी, विणकाम वगैरे धंदेशिक्षणास उत्तेजन देत व सरकारने अस्पृश्य मुलांस धंदेशिक्षण द्यावे म्हणून त्यांनी सरकारला त्याकाळी सूचना केल्या आहेत. ते आदर्श शिक्षक होते. शिक्षकाने शिक्षण कसे द्यावे याबाबत ते माहितीपूर्ण पाठ देत. विद्यार्थ्यांचे शिक्षणाकडे लक्ष कसे वेधले जाईल याबाबत ते शिक्षकांस योग्य अशा सूचना देत. सर्व प्रकारच्या विरोधास धैर्याने तोंड देऊन जोतीरावांनी भारतात पहिली अस्पृश्यांची शाळा स्थापन केली. म्हणून संबंध अस्पृश्य समाज या महापुरुषास अवतारी मानून त्यांच्यासंबंधी जागृत अशी निष्ठा व्यक्त करीत आहे.

### अस्पृश्योद्धार

**"प्रत्यक हिंदूचे दुसऱ्या हिंदूशी बंधुत्वाचे नाते आहे. पण 'विटाळ विटाळ' म्हणून आपण हे नाते त्यांना विसरण्यास लावले आहे. त्यामुळे सामान्य जनता इतक्या अवनतीला पोहोचली." –स्वा. विवेकानंद.**

भगवान बुद्धाने दलितांच्या उद्धाराचा मार्ग मोकळा केला होता तो नंतरच्या काळात कर्मठांनी बंद केला होता. तो स्वकृतीने जोतीरावांनी मोकळा केला. ते म्हणतात, "जे दास– शूद्र फक्त आपल्या उत्पन्नकर्त्यास मानून नीतीस अनुसरून, स्वच्छ उद्योग करावयाचा निश्चय करून त्याप्रमाणे आचरण करीत आहेत अशी त्यांजविषयी माझी खात्री झाल्याबरोबर मी त्यांस केवळ आपल्या कुटुंबातील बांधवांप्रमाणे समजून त्यांजबरोबर अन्नव्यवहार करीन." अस्पृश्यतेचा जिवंतपणा हा रामराज्यापासून दिसत आहे तो नष्ट करण्याचा प्रयत्न जोतीरावांनीच स्वकृतीने केला.

### परकीय आक्रमणास कारण भेदाभेद

अस्पृश्यता व उच्चनीच भेदभाव यांमुळेच परकीयांस आक्रमण करणे

स्वीकारला. हे फक्त जोतीरावांनीच प्रथम ओळखले. रियासतकार सरदेसाई सांगत आहेत– "वरच्या जातीचे लोक फारसे बाटले नाहीत. परंतु जे खालच्या जातीचे लोक हजारो वर्षे वरच्यांचे दास्य पत्करून एक प्रकारच्या गुलामगिरीत खिचपत पडले होते त्यांना मुसलमानी धर्म स्वीकारल्यामुळे आपल्या स्थितीत एकदम मोठा फरक झालेला दिसून आला. त्यांची परदास्यातून एकदम सुटका होऊन मसलमान राज्यकर्त्यांचे ते बरोबरीच्या नात्याने जातभाई बनले. त्यांस ऐहिक संपत्ती प्राप्त झाली. हजारो वर्षांचे त्यांचे नष्टचर्य संपल्यासारखे झाले."

**"आज कित्येक शतके खालच्या वर्गाच्या लोकांस तुम्ही तुच्छ लेखीत आला आहात. यामुळेच साऱ्यांची अवनती होऊन जगाच्या दृष्टीने तुमचा देश तुच्छ झाला. तुम्ही ब्राह्मणांनीच वेदवेदांचे ज्ञान इतरांपासून लपवून ठवले. अशा शास्त्रांना नसता स्पर्शसुद्धा त्यांना करू दिला नाही. त्यांनी सदोदित आपल्या पायांखाली रहावे एवढी खबरदारी मात्र तुम्ही घेतली."**

**– स्वा. विवेकानंद**

अस्पृश्यता जिवंत ठेवण्यासाठी हिंदू समाज जागृत आहे. त्याच्यात प्रखर असा धगधगता जातिद्वेष व वर्णभेद आहे. उच्चनीचतेच्या जाळ्यात तो पूर्णपणे अडकला आहे तोपर्यंत त्याच्यावर राज्य करता येईल हे मुसलमानांनी ओळखले होते. हिंदूंच्या धर्मभावनेचा व राष्ट्रभावनेचा अंत पहाण्यासाठी हवे ते अत्याचार व जुलूम त्यांनी केले. तरी वरिष्ठ वर्गाने धर्माज्ञेच्या नावावर अस्पृश्यांवरील जुलमाबाबत चुकूनहि विचार केला नाही. वेदवेदांचे दर्शनहि इतरांस होऊ दिले नाही. त्यामुळे जगात दीर्घकाळ पारतंत्र्य भोगणारा फक्त भारत हा एकच देश हे विशषण चिकटून घेतले.

रूढीधर्माच्या काटेरी कुंपणाने तिचे संरक्षण केले, हिंदू जात व हिंदू धर्म यांच्या नाशासाठीच जणू तिला जिवंत ठेवण्याचे भगीरथ प्रयत्न धर्ममार्तंडांनी केले. अस्पृश्यता जिवंत ठेवण्याच्या प्रेमामुळे हिंदू समाजास गळती लागली व परधर्मीयांची लोकसंख्या कोटींनी वाढली. तरी आमच्या वर्णाभिमानी लोकांचे डोळे उघडले गेले नाहीत. महाराष्ट्रास समाजहिताचा, समतेचा मंत्र देणारा फक्त महात्मा जोतीरावच !

तारीख ३ मे सन १५४२ ला फ्रान्सिस झेवियर हा गोवे प्रांतात आला व त्याने ह्या त्या मार्गांनी हिंदूंना ख्रिस्ती करण्याचा क्रम सुरू केला. भारतात ज्या ज्या प्रांतात मिशनरी शिरले त्या त्या भागातील रूढ भाषा व लिपी त्यांनी आत्मसात केली. गोवे प्रांती ख्रिस्ती मिशनऱ्यांनी त्या भागातील रूढ भाषेत ख्रिस्ती पुराण लिहिले, त्याचप्रमाणे मराठी भाषेतील अनेक पुराणांचे अध्ययन करून त्यातील असंभाव्य गोष्टी व जातिभेदाचे भेसूर चित्र मिशनरी लोकांनी प्रसिद्ध केले. हिंदूंच्या सुप्त भावनेस जोराने धक्के देण्याचे अनेक प्रयत्न केले. 'जातिभेद–निर्णय', 'ब्राह्मणाचे महत्त्व', 'हिंदू धर्म प्रसिद्धीकरण' वगैरे गोष्टींवर छोटीमोठी पुस्तके प्रसिद्ध करून त्यांचा महाराष्ट्रभर पाऊस पाडण्यास सुरवात केली. जॉन स्टिव्हन्सने ऋग्वेदातील काही सूक्तांचे भाषांतर केले. रॉबर्ट निज्बिस्टने भगवतगीतेचे सार लिहिले. मिशनरी हे नुसते शाब्दिक उपदेशच करीत नसत तर त्यांनी खेडोपाडी मुलांमुलींच्या शाळा काढल्या. रोगग्रस्तांना मोफत औषधे पुरविण्याची व्यवस्था केली. या सर्व गोष्टी फलद्रूप झाल्याशिवाय राहिल्या नाहीत. महार, मांग, चांभार, धेड वगैरे अस्पृश्य हे हिंदू धर्माचे असून त्यांच्या कित्येक पिढ्या हिंदू धर्मात खपल्या. अशांना हिंदू धर्मातील वरिष्ठ वर्गाकडून सहानुभूतीचा नुसता शब्द मिळत नव्हता तर उलट त्यांच्या सावलीचा विटाळ ते मानीत होते. त्यामुळे अस्पृश्य समाज मिशनरींच्या जाळ्यात सापडू लागला. याबाबत वरिष्ठ वर्गास वाईट न वाटता ते त्याबाबत बेपर्वाई करीत. फक्त मिशनऱ्यांच्या नावाने शाब्दिक खडे फोडीत. मिशनऱ्यांच्या सेवाभावाबद्दल जोतीरावांना आदर असे. त्यांच्याकडे ते वरचेवर जात. अशा वेळी अस्पृश्यांचे धर्मांतर पाहून त्यांना खेद वाटे. या गोष्टीवर खरा उपाय म्हणजे अस्पृश्य समाजात स्वाभिमान व स्वधर्माभिमान निर्माण करणे. त्यासाठी त्यांनी प्रयत्न सुरू केले. अस्पृश्यात जागृती करण्यासाठी व्याख्यानांचा पाऊस पाडला. अस्पृश्यांच्या दुःखांबाबत, त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायांसंबंधी अंतःकरणाच्या बोलीने जोतीबा सांगत. त्यामुळे अस्पृश्य समाज जागृत होऊ लागला. अस्पृश्यांसंबंधी त्यांची नुसती शाब्दिक सहानुभूती नव्हती. अस्पृश्यांच्या ठिकाणी माणुसकीचा उदय व्हावा व सर्व समसमान आहेत ही भावना त्यांच्यात दृढ व्हावी म्हणून ते राजरोसपणे त्यांच्या हातचे पाणी व अन्न घेत. त्यामुळे

जोतीरावांवर अनेक आपत्ती ओढवल्या. अनेक प्रसंगी छळ सहन करावा लागला. अपमानाचे भयंकर प्रसंग त्यांनी साधू वृत्तीने, आनंदाने सहन केले. कोणाची भीडभाड न धरता अस्पृश्योद्धाराचे कार्य त्यांनी मृत्युदिनापर्यंत अत्यंत निष्ठेने केले. 'समता व समभाव' या दोन शब्दात त्यांच्या खऱ्या जीवनाचे सार त्यांनी एकत्रित केले होते.

धर्मांतराबाबत ते म्हणत– "महार, मांग हे ख्रिस्ती होतात याचे कारण त्यांना सामाजिक व धार्मिक न्याय मिळत नाही. महार, मांग, धनगर, आदिवासी वगैरे हे लोक शूद्र आहेत. ते माझे आहेत. त्यांनी धर्मांतर करणे मला मान्य नाही." अनेकांना धर्मांतराच्या विचारापासून त्यांनी परावृत्त केले. त्यांच्या पोटापाण्याची सोय केली. अस्पृश्यांच्यासाठी जोतीरावांच्या हस्ते देवळे उघडली गेली. ते म्हणत. "देव आहे पण तो मूर्तीत नाही.

## अस्पृश्यातील कार्यकर्ते

अस्पृश्याच्या दुःखांची व हालाची, अपमानांची खरी कल्पना फक्त अस्पृश्यांसच! इतरास येणे शक्य नाही. म्हणून जोतीरावांनी त्यांच्यातील कार्यकर्ते निर्माण केले. गोपाळबुवा कृष्णावलंकर हे १८८६ साली पलटणीतून निवृत्त झाले व जोतीरावांच्या ध्येयात सामील झाले. जोतीरावांचे धैर्य त्याग, निष्ठा व समता वगैरे गोष्टींचा त्यांच्या मनावर विशेष परिणाम झाला. वरिष्ठ वर्गाने आपल्या स्वार्थासाठी अतिशूद्रांवर गुलामगिरी लादलेली आहे या जोतीरावांच्या मतासंबंधी त्यांनी १८८८ साली 'विटाळ विध्वंसक' नावाची पुस्तिका प्रसिद्ध केली. पुण्याचे शिवराम जानवा कांबळे यांनी 'सोमवंशीय मित्र' या नावाचे मासिक सुरू केले होते. अस्पृश्यांमधील देवदासीप्रथा अनिष्ट चाली नष्ट करण्यासाठी त्यांनी प्रयत्न केला. तसा प्रयत्न त्यापूर्वी वरिष्ट वर्गापैकी कुणीहि केला नाही. अस्पृश्यांचा उद्धार फक्त अस्पृश्य समाजच करू शकेल असे त्या कार्यकर्त्यांना परोपरीने जोतीराव पटवून देत. त्यांच्या प्रवासखर्चाची सोय जोतीराव स्वतःच करीत.

## मुसलमान व इंग्रज

मुसलमान राज्यकर्त्यांनी अस्पृश्यता कायम ठेवण्याचे प्रयत्न सतत केले. कारण हिंदूतील वरिष्ठ वर्गाच्या जुलुमास कंटाळून ते आपण होऊन मुसलमानी

धर्म स्वीकारीत. या गोष्टीची जाणीव इंग्रज राजकर्त्यांस होती. त्यांनी वरिष्ठ वर्गाचे अस्पृश्यांसंबंधीचे धोरण सर्व प्रकारे उचलून धरले होते. हेतू हाच की त्यामुळे अस्पृश्य स्वतः होऊन ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करतील. हे इंग्रजी धोरण फक्त जोतीरावांनी त्या काळी ओळखले होते. अस्पृश्यांवरील जुलमाची रणभेरी वाजवून हिंदू समाजास जागे करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

## महर्षी विठ्ठल रामजी शिंदे

हे महात्मा फुले यांचे एकनिष्ठ व अनन्य भक्त होते. त्यांनी जोतीरावांवर अंतरीच्या भावनेने खालीलप्रमाणे काव्य केले —

"सत्याचा पालनवाला। हा धन्य जोतीबा झाला।।
पतितांचा पालनवाला। हा धन्य महात्मा झाला।
जन्माचा 'मालाकार'
कर्माची खडी तलवार
जनतेचा जागा शेर
त्यासमान कोण तो बोला। हा धन्य महात्मा झाला ।।१।।
बोलीचा रोकड मेख। चालीचा कणखर रेख।
सत्याचा पाठीराखा। धर्माचा की जिव्हाळा ।।
धन्य धन्य जोती फुलारी
शाब्दिकासि झाला भारी
दीन-दुबळ्यांचा कैवारी
किती वाखू त्याच्या लीला। हा धन्य महात्मा झाला ।।२।।
किती झाले जे छळ सगळे। परि हासुनि ते गिळियले।
लोकभ्रम निर्दाळीले। जन सन्मार्गा लावियले।
परि सरळा सेवक विरळा। महाराष्ट्र सुधारक आगळा ।।३।।

सन १८७३ साली महर्षी शिंदे यांचा जन्म जमखिंडी या संस्थानात झाला. त्या काळी त्यांनी बी. ए.पर्यंत शिक्षण घेतले. नोकरीचा मोह धरला नाही. महात्मा फुल्यांप्रमाणे सारी हयात समाजोद्धारार्थ खर्च केली. महात्मा फुले यांना आदर्श मानले. मुलींना सक्तीचे शिक्षण दिले पाहिजे म्हणून चळवळ केली. त्यावेळी लो. टिळकांनी त्यांना विरोध केला. अस्पृश्योद्धारासाठी

त्यांनी भारताचा तीन वेळा दौरा केला. ब्रह्मदेशात गेले. युरोप खंडात गेले. संन्याशाच्या जीवनाने जगले. अस्पृश्योद्धाराबाबत अनेक ग्रंथ लिहिले. प्रचार केला.

'बहिष्कृत भारत' हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. तो जाणत्या हिंदूंनी वाचणे अत्यंत जरुरीचे आहे. सामाजिक, धार्मिक व राजकीय जागृती त्यांनी केली. त्यांच्याबाबत भारतभूषण नामदार यशवंतराव चव्हाण म्हणतात, "महर्षी शिंद्यांनी आपल्या हयातीत केलेली धार्मिक, सामाजिक, ऐतिहासिक व राजकीय क्षेत्रातील कामगिरी आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासात अद्वितीय गणली जाईल."

सन १९०१ मध्ये न्युनेटेरियन शिष्यवृत्ती घेऊन इंग्लंडला गेले. त्यावेळी सयाजी महाराजांनी मदत केली. त्यांच्या म्हातारपणी त्यांना सयाजीराव महाराजांनी पेन्शन दिले. महात्मा फुले यांना सर्वश्रेष्ठ असे ते मानीत. ते म्हणत, "अश्पृश्योद्धाराची जाणीव त्यांच्यामुळे मला झाली. भारतात महात्मा फुले श्रेष्ट असा महात्मा होता."

**"आमचा सध्याचा धर्म पाहिला तर तो फक्त सोवळेपणात राहिला आहे. स्वयंपाकघर हेच आमचे मोठे कार्यक्षेत्र, भाताचे तपेले तोच देव, आणि सोवळयाचा कडेकोट बंदोबस्त हाच काय तो आमचा धर्माचार! आमचा सध्याचा जप म्हटला म्हणजे, 'हां शिवू नको, विटाळ होईल."**

**—स्वा. विवेकानंद**

सन १९१८ सालात बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई येथे महर्षी शिंदे यांनी अखिल भारतीय अस्पृश्यता निवारण परिषद भरविली होती. सभेचा मुख्य उद्देश अस्पृश्य जातींच्या स्पर्शाचा विटाळ स्पृश्य हिंदूंनी मानू नये हा होता. लो. टिळक वगैरे पुढाऱ्यांची यावेळी भाषणे झाली. त्या परिषदेला महात्मा गांधी व टागोर यांचे शुभ संदेश आले होते. परंतु अस्पृश्यतेस जन्म देणाऱ्या शंकराचार्यांच्या गादीचे एक वारस द्वारका पीठाचे शंकराचार्य यांनी विठ्ठल रामजी शिंदे व सयाजीराव गायकवाड महाराज हे आधुनिक काळातील महान् कलीपुरुष आहेत म्हणून निषेधात्मक तार पाठविली!

## जाहीरनाम्यावर लो. टिळकांनी सही केली नाही

अस्पृश्यता आम्ही जातीने मोडू असा व्यक्तिविषयक प्रतिज्ञेचा एक जाहीरनामा काढून त्यावर हिंदू वरिष्ट जातीतील ३८० प्रमुख पुढाऱ्यांच्या सह्या कर्मवीर शिंदे यांनी मिळविल्या. परंतु टिळकांनी अनुयायांच्या भिडेस बळी पडून त्या जाहीरनाम्यावर सही केली नाही. (सर चंदावरकर चरित्र)

इंग्रज हे परकीय सरकार आहे. त्यांची सत्ता आमच्या देशावर नको. आम्हांस स्वातंत्र्य पाहिजे असे म्हणणारे लो. टिळक नुसत्या जाहीरनाम्यावर त्या स्वराज्यमागणीच्या काळात सही करीत नाहीत हे आश्चर्य ! संत गाडगे महाराज अस्पृश्य धर्मशाळा पंढरपूर या संस्थेच्या कामासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याकडे प्रस्तुत लेखक गेले असता, नासिकचे पद्मश्री कर्मवीर दादासाहेब गायकवाड हे त्या ठिकाणी हजर होते. टिळकांनी अस्पृश्यता निवारण्याच्या जाहीरनाम्यावर सही केली नाही हा विषय सहज बोलण्याच्या ओघात निघाला. तेव्हा डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले, " टिळकांच्या मागणीप्रमाणे जर इंग्रजांनी स्वराज्याची सूत्रे त्यावेळी त्यांच्या हाती दिली असती तर त्यांनी पेशवाईप्रमाणे अस्पृश्य जातींची दुर्दशा केली असती. अस्पृश्यांस स्पर्श करण्याचे साधे माणुसकीच्या हक्काचे स्वातंत्र्य देण्यास जे तयार नाहीत त्यांना इंग्रजांपासून स्वातंत्र्य मागण्यास कसा हक्क पोहोचतो?"

**"जे दुसऱ्यास स्वातंत्र्य देण्यास तयार नाहीत ते स्वतः स्वातंत्र्यास योग्य आहेत काय ?" –स्वामी विवेकानंद**

सुधारणेच्या काळात नुसत्या जाहीरनाम्याच्या कागदावर लोकमान्य टिळक सही करीत नाहीत. परंतु साठपासष्ठ वर्षांपूर्वी महात्मा जोतीराव हे अस्पृश्य जातीच्या हातचे अन्नपाणी उघडपणे घेत व इतरांनी तसे करावे हे जाहीरपणे आग्रहाने सांगत. यावरून मानवी स्वातंत्र्याचे आद्य प्रवर्तक जोतीराव हे पहिले !

संत गाडगे महाराजांनी एक लाख रुपये किमतीची अस्पृश्य धर्मशाळा बांधली आणि ती धर्मशाळा व सुमारे पन्नास हजार रुपये रोख डॉ. बाबा-साहेब आंबेडकर व कर्मवीर पद्मश्री दादासाहेब गायकवाड यांच्या स्वाधीन करून महाराज म्हणाले, "अस्पृश्य जातींचा खरा उद्धार तुम्हीच करू

शकाल. आम्ही फक्त वर वर बोलणारे." डॉ. बाबासाहेबास संत गाडगे महाराजांसंबंधी विशेष आदर असे. ते म्हणत, 'महात्मा जोतीरावांनंतर अस्पृश्यांच्या उद्धारासाठी फक्त संत गाडगे महाराजांनी कार्य केले.'

## लो. टिळकांची प्रभावळ

श्री. गं. आ. गवई हे दलितांचे पुढारी आहेत व जातीने महार आहेत. त्यांच्या 'व्यक्ती आणि कार्य' या पुस्तकावरून– "गवई हे अध्ययनाकरिता अमरावतीस आले त्यावेळी बाबासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली वीर वामनराव जोशी, बापूजी अणे, पांगारकर वगैरे अध्यापकांनी राष्ट्रीय शाळा काढली होती. त्या शाळेत गवई दाखल झाले. दोन चार दिवसातच त्यांना वीर वामनराव जोशी यांनी शाळेत येण्यास मनाई केली. खापर्डे यांच्याकडे गवई तक्रार घेऊन गेले. दादासाहेब खापर्डे म्हणाले, "इंग्रजाचे राज्य येथून घालविण्याकरिता आमच्या जातीच्या सरकारी नोकरांनी सरकारी कामे बंद पाडली तर इंग्रज लोक येथून निघून जातील. त्या संबंधात तुमची आम्हांला गरज नाही." सन १८५२ मध्ये अस्पृश्यांच्या मुलांनी शाळेत यावे म्हणून जोतीराव त्यांच्या घरी जाऊन मुलांना येण्यासंबंधी आग्रह करीत होते. त्यानंतर सुमारे पंचावन्न वर्षानंतरही राष्ट्रीय शाळेतून महार जातीच्या मुलांस राष्ट्रभक्त व देशभक्त आपल्या राष्ट्रीय शाळेतून हाकलून देत. याबाबत समाजाने विचार करणे जरूर आहे. टिळक वर्णाश्रम धर्म पाळीत होते. न. चिं. केळकरकृत लोकमान्य टिळक चरित्रात आहे– "शूद्र हे पायापासून जन्मले असे टिळक म्हणत". यावरून चातुर्वर्ण्याची जन्मजात कल्पना त्यांना मान्य होती.

## कर्वे यांची स्त्रीशिक्षण संस्था

कर्वे यांच्यासारख्या कट्टर समाजसुधारकाने स्त्रीशिक्षण संस्था सुरू केली पण तिचे स्वरूप सनातनी वळणावर गेले. "सन १९०७ मध्ये श्री. गोविंद बल्लाळ देवल यांनी संस्थेत गीतामंदिर बांधण्यासाठी तीन हजार रुपये दिले. त्यातील प्रमुख अट हिंदूवाचून इतर कोणासहि या मंदिरात जाण्याची मनाई असावी. तसेच हिंदूपैकी अस्पृश्य जातीस मंदिरात जाण्याची मनाई आहे." (कर्वे यांचे आत्मवृत्त पान २१९) जातिभेदाचे व वर्णश्रेष्ठत्वाचे विष याच सालात कर्वे यांच्या संस्थेत मुरले असावे. सन १८५१ मध्ये कर्वे जन्मास आले नव्हते

अशा वेळी स्त्रीशिक्षणाचा दरवाजा प्रथम भारतात जोतीरावांनी उघडला. परंतु अशा महात्मा फुले यांचा फोटो कर्वे यांच्या स्त्रीशिक्षण संस्थेत प्रस्तुत लेखकास पाचसात वर्षांपूर्वी दिसला नाही. उलट विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे भव्य तैलचित्र तेथे होते. चालकास याबाबत आम्ही प्रश्न केला : स्त्रीशिक्षणाच्या कार्यास विरोध करणारांचे हे चित्र येथे असून जोतीरावांचे का नाही ? कर्वे यांच्या संस्थेच्या गीतामंदिरात अस्पृश्यांस येण्यास मनाई केली गेली. परंतु जोतीराव ठिकठिकाणी सार्वजनिक हिंदू मंदिरात अस्पृश्यांस प्रवेश मिळावा म्हणून प्रयत्न करीत व त्याच्यासाठी काही मंदिरे त्यानी खुली केली होती.

## राजर्षी छत्रपती शाहू महाराज, कोल्हापूर

महात्मा फुले यांची एकंदर शिकवण शाहू महाराजांनी अमलात आणण्याचा प्रयत्न केला. सभातून व प्रसंगोपात्त भाषणातून ते महात्मा फुले यांच्या असामान्य धैर्याचा, सामाजिक, शैक्षणिक कार्याचा मोठ्या आदराने उल्लेख करीत. महाराष्ट्र जागृत करण्याचे खरे श्रेय महात्मा जोतीराव यांनाच आहे. महात्मा जोतीराव यांच्या एकंदर कार्याचा त्यांच्या मनावर विशेष परिणाम झाला होता, त्यांच्या ध्येयाच्या पुरस्कारार्थ त्यांनी सामाजिक व शैक्षणिक कार्याचा प्रसार हयातभर केला. जोतीरावांच्या ठिकाणी छत्रपतींची अनन्य भक्ती होती. श्री. गं. आ. गवई छत्रपती शाहू महाराजासंबंधी सांगतात, "ते म्हणतात, माझे राज्य गेले तरी हरकत नाही. मी तुमच्यासाठी काय करावयाचे ते अवश्य करीन." आजपर्यंत कित्येक राजांनी मोक्षप्राप्तीसाठी राज्यत्याग केल्याचे सांगण्यात येत आहे. परंतु केवळ अस्पृश्योद्धाराच्या कार्यासाठी राज्यत्याग करण्यास तयार असलेले फक्त शाहू छत्रपतीच ! याचे मूळ कारण म्हणजे महात्मा फुले यांनी समाजास दिलेली शिकवणूकच !

## इंग्रजांनी पोसलेल्या अनिष्ट रूढी

गुजराथमध्ये रेल्वेत ठराविक डब्यातच अस्पृश्यांस बसावे लागे. 'धेडासाठी' असे बोर्ड त्या डब्यावर बरेच दिवस असत. सन १९२१ सालापर्यंत मुंबईत ट्रॅममध्ये भंगी लोकास बसण्याची मनाई होती. अशा अनेक अनिष्ट

व अपमानकारक बाबींचा नायनाट अस्पृश्यातील जागृत पुढाऱ्यांनी केला. तसा प्रयत्न त्यापूर्वी इतर पुढाऱ्यांनी केला नाही.

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर

वक्तृत्व, करारीपणा, मुत्सद्दिगिरी, जगातील उपलब्ध इतिहासाचा अभ्यास, राजकारणात पारंगत, अस्पृश्य समाजाबद्दल ज्वलन्त व जागृत अशी तळमळ, सनातन्यांनी अस्पृश्यांवर केलेल्या राक्षसी जुलमाची ऐतिहासिक माहिती असा हा अद्वितीय महापुरुष जोतीरावांच्या अस्पृश्योद्धाराच्या कार्यामुळे निर्माण झाला. सारा भारत त्यांनी ढवळून काढला. अस्पृश्य समाजास स्वाभिमान व माणुसकी या हक्कांसाठी झगडण्याचे धैर्य दिले. गत कालात बाबासाहेब आंबेडकरांसारखे अनेक महापुरुष जन्मास आले असतील परंतु त्यांची बुद्धिमत्ता, शौर्य, तेज व मानवी कल्याणाचे श्रेष्ठ हृदय हे त्यांच्या जन्माबरोबरच अस्पृश्यतेच्या जन्मजात आगीत भाजून काढल असेल. त्यामुळे गतकालात आंबेडकरांसारखे अनेक थोर जन्मास येऊन न येऊन सारखेच! महात्मा फुले यांनी अस्पृश्योद्धाराचा मार्ग मोकळा केला म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारखे महापुरुष भारतातच नव्हे तर साऱ्या जगात चमकले.

## शेवटी सनातनी वृत्ती घातक ठरली

**'जो शूद्रकुळात जन्मला तो लक्षाधिश झाला. अथवा महापंडित बनला, तरी आपली जात त्याला टाकता येत नाही. सांप्रतच्या हिंदुस्थानात जातिभेद अशा प्रकारचा आहे."– स्वामी विवेकानंद**

अस्पृश्यांस मानवी हक्काचा दरवाजा जोतीरावांनी कायमचा उघडून दिला. त्यामुळे अस्पृश्य समाजात शिक्षणप्रसार झाला. स्वतःची सुधारणा स्वतःच त्यांनी केली. अनिष्ट चालीरीतींस तिलांजली दिली. स्पृश्य हिंदूंप्रमाणे ते आचरण करू लागले. तरी सनातनी लोकांची वर्णाभिमानी दृष्टी साफ झाली नाही. अस्पृश्यांसंबंधी असलेला दृष्टिकोन ते बदलू शकले नाहीत. स्पृश्य हिंदूंचा दृष्टिकोन बदलला जावा म्हणून बाबासाहेब आंबेडकरांनी २५–३० वर्षे आटोकाट प्रयत्न केले. परंतु ते सर्व वाया गेले. हे पाहून त्यांनी शेवटी ठरविले, "जो धर्म आपला अकारण छळ व अव्हेर करतो, त्याचाच त्याग केल्याशिवाय या पददलित समाजाचे भवितव्य यापुढे कधीच उज्ज्वल

होऊ शकणार नाही." अशी ठाम समजूत करुन घेऊन अखेर तारीख १४ ऑक्टो. १९५६ रोजी नागपूर मुक्कामी आपल्या लाखो अनुयायांसह बौद्ध-धर्माचा त्यांनी स्वीकार केला. त्यामुळे कर्मठ प्रवृत्तीच्या हिंदूंस ते तीव्र अंजन मिळाले. तरी अस्पृश्यांसंबंधीची त्यांची दृष्टी साफ झाली नाही.

बौद्धधर्माचे जन्मस्थान भारत! परंतु भारतातून जवळ जवळ तो धर्म नामशेष झाला होता. महात्मा फुले यांना भगवान बुद्धासंबंधी आत्यंतिक आदर होता. महात्मा फुले यांचे बाबासाहेब अेकनिष्ट भक्त असून त्यांना गुरुस्थानी मानीत. त्यामुळे बौद्ध धर्मासंबंधी त्यांच्या ठिकाणी आकर्षण निर्माण झाले. नामशेष झालेल्या बौद्ध धर्माचे लाखो अनुयायी बाबासाहेबांमुळे भारतात आज दिसत आहेत. याचे मूळ कारण महात्मा फुले हेच होत.

**जोतीरावांचे भविष्य**

"जेव्हा शूद्रांची किंवा अतिशूद्रांची मुले ज्ञानप्राप्ती करतील त्यामुळे असा एक दिवस उजाडेल की त्यांच्यापैकी एकादी मोठी विभूती आमच्या थडग्यावर फुले पसरून आमच्या नावाने जयजयकार करील." ही भविष्य-वाणी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या बाबत सत्य ठरली. ते महात्मा फुले यांना अवतारी पुरुष मानून सर्वश्रेष्ठ असा महात्मा समजत व अस्पृश्यांचा खरा उद्धारकर्ता मानीत.



## प्रकरण सातवे

# सामाजिक सुधारणा



**"सामाजिक विषमता मोडण्याकडे आचार्यांची (आद्य शंकराचार्य) प्रवृत्ती नव्हती. जातीभेदादि सामाजिक दोष त्यांनी तसेच कायम राहू दिले. रामानुजाचार्यांनी याहून वेगळा मार्ग स्वीकारला. सामान्य जनांच्या बुद्धीला पटेल अशा मार्गांनी आपल्या तत्त्वांचे विवेचन त्यांनी केले. बुद्धी जागृत करण्यापेक्षा अंतःकरणाच्या जागृतीकडे त्यांनी अधिक लक्ष दिले. धर्माच्या**

साम्राज्यात अधिक उणा भाव नाही असे त्यांनी सांगितले. त्याचप्रमाणे आपले हृदय सामान्य जनांच्या अंतःकरणापर्यंत पोहचविण्याकरिता सामान्यांच्या भाषेत ते बोलले. एकंदर जनसमूहाला वैदिक धर्माकडे वळविण्याचे कार्य रामानुजांच्या हातून अधिक प्रमाणावर झाले. रामानंद, कबीर, दादू आणि नानक असे अवतारी पुरुष एकामागून एक जन्मास आले. परमेश्वराच्या दृष्टीने मनुष्यामनुष्यात भेद नाही. या मताचा पुरस्कार या साऱ्यांनी एका आवाजात केला." – स्वा. विवेकानंद

महाराष्ट्रीय संतांनी समता व समभाव या तत्वांवर जोर देऊन समाजात धार्मिक ऐक्य निर्माण करण्याचा प्रयत्न केला.

"वर्ण अभिमाने कोण झाले पावन। ऐसे द्या सांगून मजपाशी।
अत्यंजादि योनी तरल्या हरिभजने। तयांची पुराणे भाट झाली।।
यातायाती धर्म नाही विष्णुदासा। निर्णय हा ऐसा वेदशास्त्री।।
तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ। तारिले पतित नेणो किती।।

परमेश्वरभक्तीच्या आड कर्मठांनी जातिभेदाचे व वर्णभेदाचे तट निर्माण केले. ते तट पाडण्याचे संतांनी प्रयत्न केले. संतांच्या कामगिरीवर समर्थ रामदास स्वामींनी वर्णश्रेष्ठत्वाच्या आधारे बोळा फिरविण्याचे कार्य केले. रामदासांच्या शिकवणुकीचा प्रसार हल्ली मुंबई, पुणे युनिव्हर्सिटीत होत आहे. वि. ल. भावे (ठाणे) यांचे 'महाराष्ट्र सारस्वत' हे पुस्तक मराठी विषयासाठी विद्यापीठाने मंजूर केलेले आहे. त्यात जातिभेद व वर्णश्रेष्ठतेचे महत्व वर्णन केलेले आहे. त्या पुस्तकातील रामदासांचे म्हणणे पुढीलप्रमाणे आहे—

"नीच प्राणी गुरुत्व पावला। तेथे आचारात बुडाला।।
ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।।
गुरुत्व सांडुनि झाले। शिष्य शिष्याचे।।

"इतकेच काय पण ज्या ब्राह्मणांनी सर्वांस धर्माचरणाचे धडे द्यावे, ते धर्माचे धडे नीचांकडून घेऊ लागले."

"गुरुत्व आले नीच याती। काही एक वाढली महती।।
शुद्र आचार बुडविती। ब्राह्मणांचा।।
हे ब्राह्मणास कळेना। त्याची वृत्तीच वळेना।।

मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा ।।

"ज्यांना खेटरापाशी ठेवायचे, त्यांची खेटरे डोक्यावर घेऊन ब्राह्मण नाचू लागले. त्यांच्या पायाची धूळ अंगारा म्हणून ब्राह्मणच कपाळी लावू लागले, म्हणजे इतरांना काय म्हणावे? धर्म कोठे आणि कसा रहावा?'

परशुरामाच्या दर्शनास गेले असता समर्थ विचारतात—

किती येक मागे बहु युद्ध केले।
किती वेळ या ब्राह्मणां राज्य दिले ।।
अकस्मात सामर्थ्य ते काय झाले।
युगासारिखे काय नेणो विझाले ।।

जातिभेद व वर्णभेद वाढविणाऱ्या 'महाराष्ट्र सारस्वत' ह्या पुस्ता' काची मान्यता काढून टाकल्यास समाजऐक्यास मदत होईल.

रामदासी पंथाचा 'दासविश्राम धाम' हा ग्रंथ पेशवाईच्या काळात निर्माण झाला असे काही लेखकांचे म्हणणे आहे. त्यामुळे पेशवाईत ब्राह्मण्य वाढीस लागले. अशा स्थितीत रूढीरूपी चिखलात समाज रुतला होता. त्याला बाहेर काढून समाजसुधारणेच्या रस्त्याला लावण्याचे कार्य महाराष्ट्रात फक्त जोतीराव यांनीच केले.

## समाजात पसरलेल्या काही अनिष्ट गोष्टी

समाजसुधारणेस जोतीरावांनी सुरुवात केली; त्या काळी व त्या पूर्वीच्या काळातील काही उदाहरणे पाहिली म्हणजे जोतीरावांनी केलेल्या सामाजिक कार्याचे महत्त्व स्पष्ट होत आहे. (सदाशिव गोवंडे चरित्रावरून) न्यायमूर्ती रानडे म्हणतात—"पॉल डच्बोई या नावाचे एक फ्रेंच मिशनरी मद्रास प्रांतात सुमारे दोनशे वर्षांपूर्वी रहात असत. त्यांनी एक ग्रंथ लिहिला आहे, या ग्रंथात वर्णन केलेल्या वाईट गोष्टी, व्यसने, बीभत्स प्रकार, अघोरी कृत्ये यांपैकी एकदशांश गोष्टीदेखील खऱ्या असल्यास जे दृश्य पुढे उभे रहाते ते पाहून जुन्या संस्कृतीचे आवेशाने समर्थन करणाऱ्या कोणालाहि परिस्थिती अत्यंत खेदकारक असल्याचे कबूल करावयास लावील यात शंका नाही."

**सतीची चाल**

सन १८६६ साली प्रसिद्ध झालेल्या 'पुण्याचे वर्णन' या ग्रंथात सतीविषयी पुढील माहिती मिळते :—

"सुभानू नाम संवत्सरी भाद्रपद वद्य ८ इसवी सन १८२३ रोजी एका कोकणस्थ ब्राह्मणाची स्त्री राधाबाई सती निघाली. तिला ओंकारेश्वराजवळ सरणावर बसविले व अग्नी दिला. पण तिला तो अग्नी सहन न होता तिने सरणातून उडी मारली, तेव्हां तिचे अंग भाजलेले होते; पण प्राण होता म्हणून इंग्रज सरकारच्या कामगारांनी तिला शहरात परत आणून बरी होण्यासाठी उपाय केले; पण ती फार होरपळलेली होती. म्हणून काही उपाय चालला नाही. तीन दिवसांनी ती मेली. गावात सती परत आणली म्हणून शास्त्राधाराने दुष्ट चिन्ह झाले, असे सर्व लोक बोलू लागले! त्याचे अगोदर एक स्त्री सती जात असता तिचेहि अंग पोळून ती बाहेर निघाली आणि सर्वांगाची आग झाली म्हणून नदीत उडी टाकण्यासाठी नदीकडे पळू लागली. पण ब्राह्मण लोकांनी तिला पकडून जुलमाने सरणात फेकली व वर मोठमोठे ओंडके टाकून तिचा प्राण घेतला."

**"नवऱ्याच्या प्रेताबरोबर बायकोला जुलमाने जाळून मारणे, यात कोणता पतिव्रता धर्म आहे? पतिभक्तीचे कोणते स्वरूप आहे? भलत्या गोष्टी लोकांना शिकवून आणि त्यांची मने भोळसट व अंधू करून त्याजकडून पुण्यकर्म जुलमाने करणे यात पुण्य कोठे आहे?"— स्वा. विवेकानंद.**

सती जाण्याची राक्षसी चाल भारतात प्रथम अकबर बादशहाने बंद केली. नंतर इंग्रज सरकारचे गव्हर्नर जनरल लॉर्ड बेंटींग याने सन १८३० मध्ये ती चाल बंद केली. त्यामुळे सनातनी वृत्तीचे लोक आक्रोश करू लागले. कारण स्त्रियांस स्वर्गसुखाचा मार्ग इंग्रज सरकारने बंद केला. स्वर्गवासाचे वर्णन अनेक पुराण ग्रंथात आहे. परंतु ते काल्पनिक आहे. याबाबत जोतीराव सांगतात—"एकंदर सर्व धर्मपुस्तकात स्वर्ग आहे म्हणून लिहितात. परंतु या पृथ्वीच्या पष्ठभागावरील एका तरी गृहस्थास स्वतः स्वर्ग पाहिला म्हणून सांगता येईल काय? त्यांचप्रमाणे काल्पनिक पुराण! शब्दांच्या अर्थाकडे लक्ष देऊन पौराणिक कथेवर विश्वास न ठेवता एखादा मनुष्य स्वर्ग पाहण्यास

गेला व तो परत आला अशी कधीतरी गोष्ट घडून आली आहे काय? अशा प्रकारचा एखादा मनुष्य तरी ह्या भूभागावर सापडेल काय?" असे काल्पनिक स्वर्गाबद्दल जोतीराव सांगत आहेत.

## सती जाण्याबाबत आख्यायिका

पतिव्रता धर्माप्रमाणे एक स्त्री वारली व शेवटी पतीच्या शवाबरोबर ती सती गेली. त्यामुळे तिला स्वर्गवास घडला. स्वर्गात जाताच तिला आश्चर्याने धक्का दिला, कारण पतिव्रता धर्माप्रमाणे फक्त सती गेलेल्य स्त्रियाच तेथे होत्या. एकहि पुरुष स्वर्गात नव्हता. याचें कारण तिने स्वर्गाधिकाऱ्यास विचारले. त्याने उत्तर दिले, "पत्नीस जसा पतिव्रता धर्म तद्वत पुरुषास पत्नीधर्म व न्यायनीतीची बंधने आहेत. त्यांचे पालन एकाहि पुरुषाकडून न घडल्यामुळे त्यांना स्वर्गवास न घडता त्या सर्वांना नरकवास घडला. त्याप्रमाणे तुझा पतीहि नरकवास भोगीत आहे. तुला पतिसहवासच पाहिजे असल्यास मी तुला तेथे पाठवितो." तिने विनंती केली, "मला परत भूलोकीच पाठवा." त्याप्रमाणे तिला परत पृथ्वीतलावर पाठविले. पृथ्वीवर आल्यावर ती स्त्रियांस अधिकारवाणीने सांगू लागली: स्त्रीस जसा पतिव्रता धर्म व न्यायनीतीची बंधने आहेत तशीच पुरुषांस पत्नीधर्म व इतर बंधने आहेत. त्यांचे पालन पुरुष वर्गाकडून घडत नाही म्हणून ते स्वर्गात न जाता नरकात जातात. तरी आपण सती धर्माप्रमाणे जाळून घेणे व स्वर्गाची आशा करणे हे व्यर्थ आहे.

जोतीरावांचे स्नेही सदाशिवराव गोवंडे यांची एक बहीण सती गेली त्या दृश्यामुळे ते सुधारणाप्रिय झाले व जोतीरावांचे साहाय्यार्थी बनले.

## विधवाविवाहास बंदी

विधवांच्या विवाहास बंदी केव्हा झाली व का झाली, याचे कारण जोतीबा शोधीत बसले नाहीत तर विधवांचे प्रत्यक्ष हाल पाहून त्यांचे जिवंत मन अस्वस्थ झाले. लेखन व भाषण यांद्वारे पुर्नविवाहाचा त्यांनी जोरदार पुरस्कार केला. तसा उघडपणे व निष्ठेने केलेला प्रयत्न यापूर्वी भारताच्या इतिहासात कोणीहि केल्याचे आढळत नाही. जोतीराव नुसता उपदेश करणारे नव्हते. प्रत्यक्ष कृती हेच त्यांच्या जीवनाचे ध्येय होते. त्याप्रमाणे स्वत:

पुढाकार घेऊन इ. स. १८६४ मध्ये पुण्यास गोखल्यांच्या बागेत सारस्वत जातीतील एक पुनर्विवाह त्यांनी घडवून आणला. राक्षसी सनातनी वृत्तीस त्यांनी प्रत्यक्ष कृतीने धक्का दिला. त्याचे प्रत्यक्ष फळ म्हणजे प्रो. धों. के. कर्वे यांचा व अनेक समाजसुधारकांचा पुनर्विवाह करण्याचा मार्ग मोकळा झाला.

## धर्माज्ञेच्या नावावर–

सबंध पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याहि देशात आढळणार नाही तो स्त्रियांच्या पुनर्विवाहबंदीचा राक्षसी जुलूम फक्त भारतात आहे आणि तो धर्माज्ञा व घरंदाजपणा यांच्या नावाखाली राजरोस जगत आहे. जन्मास येतानाच स्त्रिया नैसर्गिक आकांक्षा घेऊन येतात. त्यांचे मानवजन्माचे नैसर्गिक हक्क पुरुषांनी हिरावून घेऊन त्यांचा मानवजन्म मातीमोल केला. वरिष्ठ म्हणविणाऱ्या जातींनी स्त्रियांचा पुनर्विवाहाचा हक्क स्वार्थासाठी हिरावून घेतला व स्वतः मन मानेल तसे वागत आहेत. स्त्रीचा नवरा मेला तर तिने उभे आयुष्य खडतर तपश्चर्येत घालवावे परंतु प्रथम स्त्री मेली तर तिच्या तेराव्या दिवसासाठी आणलेला तांदूळ स्वतःच्या डोक्यावर अक्षदा म्हणून उधळून घेण्याचा अधिकार पुरुषवर्गास मात्र आहे. बायको मेल्यावर एक वर्षाच्या आतच दुसरे लग्न केले पाहिजे अशी शास्त्राज्ञा तयारच ! न्यायमूर्ती रानडे यांच्या मातोश्री मरण पावल्या असता सोळाच दिवसांनी त्यांच्या वडलांनी दुसरे लग्न करून पत्नीवियोगाची हानी भरून काढली ! पुरुषास हव्या तितक्या बायका करण्याची परवानगी बंगाल प्रांतात अव्वल इंग्रजी अंमलात होती. वरिष्ठ वर्गातील लोक मनात येईल तितक्या बायका करीत. ज्यांच्या तोंडात दात नाहीत, धड उभे राहता येत नाही व मृत्यूचे दरवाजे ज्यांना स्पष्ट दिसत आहेत अशांना लग्न करण्याची शास्त्राची तेवढी परवानगी !.पण पाच वर्षाच्या मुलीस नवरा म्हणजे काय, हे कळत नाही अशी मुलगी विधवा झाली तर तिचे पूर्वजन्माचे पाप म्हणून तिने सारा जन्म वैधव्यात काढला पाहिजे अशी शास्त्राज्ञा तयारच !

## शंकराचार्यांचे धर्मरक्षण

अस्पृश्य व स्त्रिया यांच्याबाबत शंकराचार्यांच्या गादीच्या वारसांनी

धर्मघातकी दृष्टिकोन आजतागायत बदललेला नाही.– न. र. फाटक (रानडे चरित्रावरून)–" सन १८६४ सालात शंकराचार्यांची स्वारी नगरास गेली होती. तेथे त्यांच्यासमोर व्यभिचाराबद्दल फिर्याद गुदरण्यात आली. एका बालविधवेच्या पित्यास शंकराचार्यांनी गोमूत्र गोमयासह स्वपादोदक तीर्थ पाजून १९ रुपये दंड उपटून उद्धार केला. पण त्याने आपल्या मुलीला शुद्धता प्राप्त व्हावी, अशी इच्छा प्रदर्शित केली. जगद्गुरूंनी फर्माविले प्रायश्चित्त मोठे मासलेवाईक आहे. त्यांनी सांगितले–'आंब्याच्या झाडाचा बुंधा कोरून एक ढोली तयार करावी. तिच्यात या मुलीला बसवावे. बाहेरून गवत, पाचोळा पेटवावा आणि बराच धग लागल्यावर तिला बाहेर काढावे. नंतर तिचे वपन करणे आणि शेवटी सहस्त्र ब्राह्मणास जेवण घालावे. म्हणजे मुलगी शुद्ध होईल.'. . .या बायकाहि विधवा होत्या. त्यांच्यावर ब्रह्मवृंदाने व्यभिचाराचा आरोप ठेवला होता. शंकराचार्यांनी त्यांस वपनाची आज्ञा दिली. आपण ही आज्ञा जुमानीत नाही, असा खडखडीत जबाब आचार्यांच्या तोंडावर विधवांनी दिला. शंकराचार्यच ते! त्यांच्या परिवारात न्हाव्यांची तूट नव्हती. त्यातील काहीजणांना बोलावून आवेशाने 'बायांच्या मुसक्या बांधून त्यांचा केशसंभार उतरून टाका' अशी त्यांनी आज्ञा केली. बाया गांगरल्या नाहीत. त्यांनी जबाब दिला की,' ही मोगलाई नाही. जुलूम जबरदस्ती कराल तर आताच फौजदारांकडे अर्ज देऊन आपणास धडपणे नगरातून जाता येणार नाही अशी व्यवस्था होईल.' हा अनपेक्षित सडेतोड जबाब ऐकताच शंकराचार्य जागच्या जागी थिजले. आणि फिर्यादी ब्राह्मणांच्या तोंडाला खिळ बसली. शेवटी धर्मरक्षणाच्या गादीचा मान राखण्याकरिता या बायांशी कोणीहि अन्नादि व्यवहार करू नये असा हुकूम सोडून शंकराचार्यांनी आपला बोज कसाबसा राखला."

"मद्रासकडील शं[illegible]राचार्यांना हायकोर्टाने एका पुनर्विवाहित जोडप्याची बेअब्रू केल्याबद्दल [illegible] रुपये दंडाची व न दिल्यास एक महिना साध्या कैदेची शिक्षा ठो[illegible]" त्यावेळी कर्मठांनी सरकारवर टीका केली. कमलाबाई देशपांडे या [illegible] कन्याशाळेच्या प्रमुख असतांना सन १९२६ साली संकेश्वर पीठाचे [illegible] आले असता त्यांना शाळा पाहण्यास त्यांनी विनंती केली. परंतु का[illegible] सांगितले, शाळेच्या दरवाज्यावर तुम्ही विधवा

असल्याने उभे राहू नये; कारण विधवेचे तोंड शंकराचार्य पहात नाहीत!' अशा शंकराचार्यांवर जोतीरावांनी जे टीकास्त्र सोडले त्याबाबत कर्मठ लोक आजहि त्यांना दोष देतात. परंतु वरील गोष्टींवरून या पीठाची समाजोद्धारास मदत झाली नाही हे दिसते. महात्मा फुले यांनी स्त्रीजुलमाबाबत समाजात जागृती केली नसती तर धर्माच्या नावावर वरीलप्रमाणे जुलूम आजहि दिसले असते.

## वरिष्ठ म्हणविणारातच--

विधवांचा नैसर्गिक मानवी धर्म हिरावून घेऊन त्यांचे जीवन माती मोल करण्याचे पाप वरिष्ठ म्हणविणारे लोक करीत आहेत. वैधव्याची-प्रथा जिवंत ठेवण्याचे कार्य प्रथम ब्राह्मणांनीच सुरू केले व त्यांचे अनुकरण इतर जातींनी केले. ज्या समाजात पुनर्विवाह रूढ नाही अशा सर्व जाती स्वतःस श्रेष्ठ समजतात. स्वतःचा नकली श्रेष्ठपणा टिकविण्यासाठी कोटच्यावधी विधवांचे बळी घेण्यात आले. त्यांचे मानवी जीवन नष्ट केले. मनुष्य-जन्म एकदाच असतो. पूर्वजन्माचे निमित्त करून असले अघोर पाप ते धर्माच्या नावावर झाकीत आहेत.

## हिमालयापेक्षांहि मोठे

'विधवाविवाहास बंदी' हे तत्त्व ज्या क्षणी जन्मास आले त्या क्षणापासून आजपर्यंत कोटचवधी नव्हे तर अगणित विधवा स्त्रियांचे बळी या समाजघातक रूढीने घेतले असतील. आजपर्यंत झालेल्या प्रत्येक विधवेच्या आकाराची प्रतिमा कल्पून त्या. सर्वांचा ढीग केला तर कदाचित हिमालयापेक्षाहि तो मोठा होईल. हे एवढे महान पाप, धर्म, शास्त्र व रूढी यांच्या बळावर उघड्या डोळ्यांनी पाहून वरिष्ठ म्हणविणाऱ्या समाजाने केले हे जगातील एक आश्चर्यच!

जोतीराव हे युगपुरुष होते. या जबरदस्त म[illegible]नानाशक रूढीस त्यांनी कृतीने, वाणीने, प्रचाराने व हव्या त्या प्रयत्नाने [illegible]दस्त असा धक्का दिला. तिला गदगदा हालवून मुळासकट नष्ट करा[illegible]त्न केला. असा प्रयत्न गतकाळात कोणी समाजसुधारकाने अग[illegible]ने केला नाही.

'अकबर बादशाहाने सतीची चाल बद[illegible] उपयुक्त कायदा

# कै. रावबहाद्दुर नारायणराव सोपानराव बोरावके



जन्मस्थळ सासवड (जि. पुणे). म. फुले यांचे एकनिष्ठ भक्त. स्वकर्तबगारीवर शेतीद्वारे उत्कर्ष. अ. भा. क्षत्रिय माळी परिषदेचे अध्यक्ष. श्रीरामपूर येथे दोन लाख रुपयांची देणगी देऊन आर्टस्, सायन्स कॉलेज चालू. अनेक शैक्षणिक संस्थांना व इमारतींना मदत. सभा–परिषदांना उत्तेजन. सामाजिक व शैक्षणिक सुधारणांचे पुरस्कर्ते. आदर्श शेतकरी. जन्म १८९२. वयाच्या ७६ व्या वर्षी त्यांना नुकताच स्वर्गवास घडला.

## श्रीमान हरिभाऊ बळवंतराव गिरमे, पुणे.



जन्म १८९८, जन्मस्थान सासवड (जि. पुणे). म. फुले यांचे एकनिष्ठ भक्त व त्यांच्या ध्येयाप्रमाणे शेतीसुधारणा. अनेक सहकारी व जिवलग मित्र यांच्या सहकार्याने भारतात पहिली शेतकऱ्यांची, सहकारी पद्धतीवर दि सासवड माळी शुगर फॅक्टरी, माळीनगर (जि. सोलापूर) स्थापना. सतत २० वर्षे मॅनेजिंग डायरेक्टर. अंगातील सर्व गुणांमुळे कारखाना भारतात आदर्श बनविला. त्यांचे जीवनचरित्र शेतकरी व तरुणांना स्फूर्तिदायी. अनेक शिक्षणसंस्थांस मदत. सामाजिक कार्यास उत्तेजन. शेतकऱ्यातील आदर्श.

केला होता. मुलीस "न्हाण" आल्याशिवाय तिचे लग्न करू नये असा तो कायदा चट साऱ्या हिंदूंनी खाली मान घालून पाळला. मुसलमान राज्यकर्त्यांनी जाणूनबुजून विधवाविवाहाकडे दुर्लक्ष केले. कारण हिंदू विधवा हे त्यांच्या धर्मांतराचे मुख्य खाद्य होते. सुमारे साठ–सत्तर वर्षांपूर्वी कलकत्त्याचे बॅरिस्टर मुकर्जी यांनी 'हिंदू धर्म सामर्थ्यवान कसा होईल ?' या पुस्तकात अत्यंत तळमळीने सांगितले– "उच्चवर्णीय विधवा दर दिवशी तीस परधर्मात जात आहेत." परंतु उच्चवर्णीयांनी त्यांच्या सांगण्याकडे त्यावेळी लक्ष दिले नाही. याचाच परिणाम बंगाल प्रांतात हिंदूंपेक्षा मुसलमानांची संख्या वाढली व बंगालचे दोन तुकडे झाले. पृथ्वीराजाचे राज्य महमद घोरीने घेऊन तेथे कुतुबुद्दीन नेमला. त्याच्या जवळ जे सैन्य ठेवले, त्याच्यासाठी अफगाणिस्थानातून किती स्त्रिया त्याने पाठविल्या होत्या, त्याचा इतिहासकारांनी कधी विचार केला आहे काय ?

## श्रेष्ठपणाचे साधन

विधवांच्या जळत्या आयुष्याच्या उजेडात आम्ही आमच्या घराण्याचा श्रेष्ठपणा डोळे उघडे ठेवून पहात असतो. ज्या घराण्यात विधवाविवाह नाही ते घराणे श्रेष्ठ असे समजण्यात येत आहे. महात्मा जोतीरावांचे नाव निघताच काही ब्राह्मण दचकतात. परंतु विधवाविवाहाचा पुरस्कार जोतीरावांनी केला तो बहुतेक ब्राह्मणांच्या पचनी पडला. बहुसंख्य ब्राह्मण विधवाविवाहाचा निषेध आज करीत नाहीत, इतकेच नाही तर ते त्या गोष्टीचा जाहीर पुरस्कार करीत आहेत. ब्राह्मण – विधवाविवाहाच्या जाहिराती राजरोस वर्तमानपत्रात येतात. ही गोष्ट विधवाविवाहास पोषक आहे. परंतु महाराष्ट्रातील काही मराठ्यांना घरंदाजपणाचे 'सर्टिफिकेट' पाहिजे म्हणून पुनर्विवाहाच्या विरुद्ध दिवसेंदिवस त्यांची प्रवृत्ती जास्त वाढत आहे.

खानदानी म्हणविणाऱ्या मराठ्यांनी दारू पिणे, व्यभिचारासाठी उपस्त्रिया ठेवणे, चोरी करणे वगैरे निंद्य कर्म केले तरी त्यात घराण्याचा कमीपणा ते मानीत नाहीत. फक्त पुनर्विवाह ज्या घराण्यात नाही ते खानदानी ! ज्या घराण्याने जास्तीत जास्त विधवांचा बळी दिला, ते घराणे विशेष घरंदाज ! त्यामुळे आपल्याच जातीतील इतर मराठा घराण्यांस ते

निष्कारण कमी लेखतात. महाराष्ट्राच्या इतिहासात ज्या अनेक अनर्थकारक गोष्टी घडल्या, ज्यातून राष्ट्रहित व समाजहित दुभंगले गेले त्याला मुख्य कारण मराठ्यांचा हा नकली घरंदाजपणा ! प्रस्तुत लेखकास सातारा जिल्ह्यातील एक सुशिक्षित मराठा गृहस्थ भेटले. सहज सामाजिक चालीरीतींसंबंधी बोलणे सुरू झाले. त्याने आपल्या घराण्याच्या श्रेष्ठपणाचा पुरावा दिला : 'आमच्या घराण्यास पुनर्विवाहाचा विटाळ कधीच झाला नाही. बहामनी राज्यापासून आमच्या घराण्यात देशमुखी आहे. आमचे घराणे खरे खानदानी आहे. आमचे शरीरसंबंध फक्त पन्नास घराण्यांशीच होतात. इतर मराठ्यांशी होणे शक्य नाही. प्रत्यक्ष छत्रपतींची मुलगी आम्ही करणार नाही व आमची मुलगी छत्रपतींच्या घरात देणार नाही.' शहाण्णव कुळीच्या मराठ्यांची उत्पत्ती ही पुनर्विवाहबंदीतूनच जन्मास येणे शक्य आहे. छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकास ब्राह्मणांनी विरोध केला. परंतु त्यापेक्षा प्रखर विरोध काही मराठ्यांनी घरंदाजपणाच्या नावाखाली केला. याचे मुख्य कारण शिवाजी महाराजांपेक्षा आमचे घराणे श्रेष्ठ आहे ही भावना ! अशा घरंदाज म्हणविणाऱ्या मराठ्यांच्या मुली मुसलमानांनी ओढून नेल्या तर त्या घराण्यातून नष्ट झाल्या म्हणून त्यांचे क्रियाकर्मांतर ब्राह्मणांकडून करीत व आपला घरंदाजपणा जिवंत ठेवीत. साताऱ्च्या छत्रपतींचे राज्य पेशव्यांनी गिळले. पेशव्यांचे छत्रपती बंदीवान बनले. दुसऱ्या बाजीरावाने छत्रपतींच्या अंगावरील जानवे काढून घेऊन त्यांना शूद्र बनविण्याचा प्रयत्न केला, अशा वेळी बडोद्याचे गायकवाड व ग्वाल्हेरचे शिंदे यांना साताऱ्चे छत्रपती 'कमी मराठे' म्हणून मानीत होते. केवळ ह्याच एका कारणामुळे छत्रपतींवर पेशव्यांचे बंदीवान होण्याची पाळी आली. मराठा व रजपूत या दोन समाजात हा उच्चनीच भेद पराकोटीला गेला आहे. खानदानी म्हणविणारा मराठा हा दुसऱ्या मराठ्यास आपल्या बरोबरीचा मानण्यास तयार नसतो. तद्वत तीच प्रथा रजपूत समाजात आहे. या एकाच गोष्टीत पारतंत्र्याचा जन्म झाला. महात्मा जोतीरावांनी पुनर्विवाहाचा धडाडीने प्रचार करून समाजास जागृतीची देणगी दिली. स्त्रियांच्या नैसर्गिक हक्कांची कल्पना समाजास दिली हे विशेष ! आजच्या सुधारणेच्या काळात कोटीवर विधवा दुःखाग्नीत सारख्या भाजून निघत आहेत. जोतीरावांनी

विधवाविवाहाचा पुरस्कार केला नसता तर एखाद्या पाश्चात्य मोठ्या देशातील एकंदर लोकसंख्येइतकी नुसती विधवांची संख्या आज भारतात दिसली असती.

**स्त्रीहृदय**

मनुष्यप्राण्यास देवाने जन्म दिला. त्याचप्रमाणे पशू, पक्षी, जलचर प्राणी, कीटक या सर्वांना त्यानेच जन्मास घातले. ते नर व मादी या नात्याने निसर्गनियमाचा राजरोस उपभोग घेतात. फार काय, सर्प व सर्पिण हेसुद्धा एकमेकांस अलिंगन देऊन नैसर्गिक देणगीचा उपभोग घेतात. परंतु हिंदूतील काही जातींनी विधवा स्त्रियांच्या ह्या नैसर्गिक हक्कावर स्वार्थासाठी धर्माचे बंधन घालून त्यांचा मनुष्यजन्म व्यर्थ केला. या दु:खाने तळमळून त्या जे ऊष्ण श्वास सोडतात त्याची कल्पना फक्त स्त्रीजातीसच येणे शक्य आहे. परंतु स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य व जागृती ही देणगी महात्मा फुले यांनी स्त्रियांस दिली. तिचा उपयोग स्त्रियांनी स्त्रीजातीसाठी केला तरच विधवा स्त्रियांचा उद्धार होऊ शकेल. आज अखिल भारतीय स्त्री परिषदा भरतात पण या विधवाविवाहाच्या प्रश्नाकडे त्या सुशिक्षित स्त्रिया खरे लक्ष देत नाहीत हें विधवांचे व हिंदू जातीचे दुर्दैव !

**बालविवाह**

**"ज्या समाजात कायद्यांची संख्या पुष्कळ आहे, तो समाज नष्ट होण्याच्या मार्गास लागला आहे, हे तुम्ही निश्चित समजा. हिंदूंच्या सामाजिक रचनेचा इतिहास तुम्ही पाहिला तर येथल्याइतके सामाजिक कायदे दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रात नाहीत."– स्वा. विवेकानंद.**

अनेक ग्रंथांच्या धर्माज्ञांनी हिंदू समाज अगदीच जखडून टाकला आहे. सकाळी. परसाकडे कोणत्या दिशेकडे तोंड करुन बसावे तर रात्री झोपतांना कोणत्या दिशेस पाय करुन झोपावे याहि गोष्टी आमच्या शास्त्र ग्रंथात आहेत. इतकेच नाही तर जनावरांमागेहि आमचे धर्मग्रंथ लागले. म्हैस बुधवारी व्याली तर तिच्या मालकाने काय प्रायश्चित घ्यावे, हेसुद्धा ग्रंथात आहे. मुलीचे लग्न वयाच्या आठव्या वर्षीच झाले पाहिजे अशी शास्त्राज्ञा ! रजोदर्शनापूर्वी (वयात येण्यापूर्वी) मुलीचे लग्न जर झाले नाही तर बापाच्या

पूर्वीच्या व पुढील बेचाळीस पिढ्या रौरव नरकात जातील, अशीहि शास्त्राज्ञा! अशा समाजघातक रूढीला जोतीरावांनी सर्व बळानिशी विरोध केला. बालविवाहापासून होणारे तोटे, शेतकरी व मजूर अशा लग्नांमुळे कर्जबाजारी होतात व मुलींना अकली वैधव्य प्राप्त होते, वगैरे अनेक गोष्टी समाजाच्या गळी उतरविण्याचे प्रयत्न त्यांनी केले व प्रौढ विवाहाचा पुरस्कार केला-म्हातारा नवरा व लहान नवरी ह्यांच्या लग्नास जोरदार विरोध केला. मनूची आज्ञा जोतीराव पायाखाली तुडवीत आहेत म्हणून शास्त्री मंडळींनी ओरड सुरू केली. ज्या ब्राह्मण वर्गाने जोतीरावांच्या कार्यास त्यावेळी कडवा विरोध केला त्याच वर्गाने जोतीरावांच्या त्या तत्त्वाचा अवलंब सर्वांआधी केला. आज वीस, पंचवीस, तीस तर काही पस्तीस वर्षे वयाच्या ब्राह्मण कुमारिकांचे लग्न करणे आहे अशा जाहिराती वर्तमानपत्रात नित्यहि झळकतांना दिसतात. परंतु जोतीरावाच्या त्या समाजसुधारक कार्याकडे व त्यांच्याकडे दोषैक दृष्टीने काही ब्राह्मण समाजांचे लोक आजहि पहात आहे हे आश्चर्य!

## संमती वयाचा कायदा

**"संमती वयाचा कायदा पास होण्याचे घाटू लागताच आमच्या धर्म रक्षकांनी एकच कोलाहल करून दिला. 'धर्म बुडाला हो बुडाला' अशी एकच ओरड त्यांनी सुरू केली. बारातेरा वर्षांच्या मुलीला मुले झाली म्हणजे जणू काय धर्मरक्षण होते."– स्वा. विवेकानंद**

पृथ्वीच्या पाठीवरील कोणाहि मानवाची धार्मिक जिज्ञासा पुरवील अशी सनातन धर्मरूपी महापुरुषाची योग्यता आहे. परंतु रूढीधर्म, पौराणिक भाकड कथा, कृत्रिम वर्णाश्रम वगैरे अनेक गळवे (बेंड) त्याच्या अंगावर आल्याने त्याची खरी हालचाल बंद झाली होती. ही सर्व बेंडे फोडण्याचे कार्य जोतीरावांनी केले. त्यामुळे अनेक सामाजिक कार्यकर्त्यात चैतन्य निर्माण झाले. जोतीरावांप्रमाणे प्रत्यक्ष कृती करण्यासाठी अनेक जण प्रयत्नास लागले.

## बहिरामजी मलबारी

बालविवाह व असंमत वैधव्य यांचे खरे राक्षसी स्वरूप जगाच्या वेशीवर टांगण्याचे महान कार्य बहिरामजी मलबारी या पारशी जातीच्या गृहस्थाने केले.

**"अनंत कार्यकारी शक्ती, अनंत उत्साह, अनंत सहनशीलता हे गुण असल्याशिवाय कोणतेहि मोठे कार्य सिद्धीस जात नाही."**

**– स्वा. विवेकानंद.**

'मलबारी यांनी बालविवाहामुळे होणारे दुष्परिणाम व ज्या स्त्रियांना मर्जीविरुद्ध वैधव्यात काळ कंठावा लागतो अशा स्त्रियांची होणारी कुचंबणा यासंबंधी जाणीव करून दोन निवेदने तयार करुन ती देशातील विचारवंतांकडे व वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे आणि पुढाऱ्यांकडे पाठवावयाचे ठरविले. या कार्यात सरकारचेहि पाठबळ त्यांना मिळवायचे होते. व्हाईसरॉय लॉर्ड रिपन यांस भेटण्यासाठी १८८४ च्या मे महिन्यात ते सिमल्यास गेले. लार्ड रिपन यांनी संपूर्ण पाठिंबा दिला व लोकमत अजमावून पहाण्याची सूचना केली .... सरकारतर्फे देशातील निरनिराळ्या प्रांतिक सरकारांकड लोकमत अजमावण्यासाठी मलबारींची निवेदने पाठविण्यात आली. काही सुविचारी लोकांनी मलबारींस पाठिंबा देण्याचे प्रयत्न केले. परंतु लोकांच्या अज्ञानाचा पाठिंबा घेऊन अनेकांनी विरोध केला. धार्मिकतेचे पुरस्कर्ते म्हणून ते पुढे येऊ लागले. 'धर्मशोधनाच्या झटापटीत पुष्कळदा उदात्त हेतूच्या पुरस्कर्त्यांना नानाविध नीच आरोपांचे धनी व्हावे लागते. आणि खऱ्या तीच पुरुषांना धर्मरक्षकाच्या सिंहासनावर अधिष्ठित होण्याची संधी सांपडते.' समाजकंटक धर्मरक्षणाच्या नावावर मलबारीस विरोध करू लागले.

**"लहानपणी लग्ने झालीच पाहिजेत असा आशय कोणत्याहि धर्मग्रंथाने प्रगट केला नाही."– स्वा. विवेकानंद.**

मलबारींच्या प्रयत्नाचा प्रसार होत आहे अशा वेळी पुणे येथील शास्त्री-पंडितात मोठी खळबळ उडाली. त्यांनी मुंबईच्या राज्यपालांची भेट घेतली व महाराणी साहेब यांनी १८५८ साली दिलेल्या आश्वासनांची त्यांना आठवण करून दिली. राज्यपालाने पंडितांस आश्वासन दिले, सरकार लोकमताचा अचूक अंदाज घेतल्याशिवाय धार्मिक किंवा सामाजिक बाबतीत कोणतेच धोरण स्वीकारणार नाही. तसेच शास्त्री-पंडिताच्या वजनास धक्का लागेल किंवा त्यांचे समाजातील वजन कमी होईल असे काही करणार नाही. भारत सरकारने मलबारींच्या समाजोन्नतीच्या कार्यास नकार दिला. कारण

काय तर– 'कायदेपंडितांच्या सल्ल्यावरून सरकार या बाबतीत तूर्ततरी लक्ष घालू शकत नाही.' या बाबत जोतीराव म्हणतात, "आमचे सरकार जिकडे घुगऱ्या तिकडे उदय उदय करीत असते." सरकार लोकहितापेक्षा सरकारचे हित जे लोक पहातात त्यांचेच ऐकत असते. सरकारची अनुदारता, कर्मठांचा विरोध अशा कात्रीतून महात्मा फुले यांनी सामाजिक सुधारणेचा गाडा नेटाने पुढे नेला नसता तर आज महाराष्ट्रात ज्या सामाजिक सुधारणा दिसत आहेत त्या काही वर्षांनंतरहि दिसल्या नसत्या. शास्त्री–पंडितांच्या विरोधास जरी सरकारने उचलून धरले तरी मलबारी ध्येयच्युत झाले नाहीत. कारण असंख्य अबलांचे दुःखे त्यांना स्वस्थ बसू देईनात. सत्याचा पाठीराखा वेळेवर उभा रहातो.व तो मदत करतो या तत्त्वानुसार साता समुद्रांपलीकडून मलबारींस पाठिंबा मिळाला.

## प्रो. मॅक्सम्युल्लर

प्रो. मॅक्सम्युलर यांनी संस्कृत भाषेचे ज्ञान संपादन केले. नंतर ४५ वर्षे प्रयत्न करून ऋग्वेदाचे इंग्रजीत भाषांतर केले. यासाठी कंपनी सरकारने नऊ लाख रुपये खर्च करुन शेकडो पंडितांची मदत घेतली. प्रो. मॅक्सम्युल्लर यांचे मलबारींच्या प्रयत्नांकडे लक्ष गेले. त्यांनी मलबारींस पत्राने कळविले– "पन्नास वर्षांपूर्वीचे सरकार व हल्लीचे सरकार यांमध्ये महदंतर आहे नैतिक दृष्ट्या जी प्रथा अाचरणीय, तिचे आचरण होऊ लागले तर सरकारने दुर्लक्ष करता कामा नये." कंपनी सरकारने धर्माच्या रूढीच्या नावावर चालणाऱ्या अनेक अनिष्ट गोष्टी कायद्याच्या फटकाऱ्याने बंद केल्या होत्या परंतु १८५७ च्या बंडानंतर इंग्रज सरकारने आपले समाजसुधारणेचे धोरण बदलविले. धार्मिक बाबतीत सरकार हात घालणार नाही या एकाच गोष्टीचा नेमका फायदा समाजघातक्यांनी घेण्याचे ठरविले. धार्मिक हक्काच्या नावावर असंख्य समाजघातकी रूढी ते जतन करू लागले. व सरकारहि त्यांना पाठिंबा देऊ लागले. त्यामुळे सामाजिक सुधारणेची प्रगती खुंटली. दक्षिण हिंदुस्थानात माणुसकीला काळीमा लावणाऱ्या अनेक गोष्टी काँग्रेस सरकार स्थापन होईपर्यंत धार्मिक हक्कांच्या नावाखाली इंग्रजी राज्यात राजरोस धिगाणा घालीत होत्या.

प्रो. मॅक्समुल्लरने मलबारींच्या प्रयत्नास जोर येईल अशा अनेक गोष्टी लिहिल्या होत्या. "श्रुति किंवा स्मृति मी वाचल्या आहेत. त्यात कोठेहि बालविवाहास पाठिंबा देण्यात आलेला नाही. शास्त्री-पंडितांनी उगाच शास्त्रीय ग्रंथांची ओढाताण चालविली आहे. सरकारने आपली असमर्थता दाखविताना निदान त्या दुष्ट चालीबद्दल नापसंती तरी स्पष्ट शब्दात जाहीर करणे जरूर होते". वगैरे लिहून मलबारींस त्यांनी पाठिंबा दिला. नंतर मलबारी इंग्लंडला गेले. तेथील स्त्रियांना भारतीय महिलांवर होणाऱ्या जुलमाची कल्पना त्यांनी करून दिली. इंग्लंडमध्ये त्यांनी अगदी रान उठविले. इंग्लंडमधील वजनदार स्त्री-पुरुषांच्या समितीतर्फे भारत सरकारकडे खलित्यावर खलिते जाऊं लागले. या माऱ्यामुळे भारत सरकारवर भरपूर वजन पडले. या चळवळीसंबंधी जोतीराव व त्यांचे अनुयायी यांनी महाराष्ट्रभर जागृती केली व सरकार हे समाजसुधारणेस विरोध करून शास्त्री–पंडितांच्या समाजघातास पाठबळ देत आहे हे जनतेसमोर मांडण्याचे कार्य केले. त्यामुळे काही सुशिक्षितांचे व स्त्रियांचे समाज सुधारण्याकडे लक्ष गेले.

## दयाराम गिडूमल

"दहाबारा वर्षांच्या मुलीला मुले झाली पाहिजेत असे म्हणणारा धर्म कोणत्या जातीचा?"—स्वा. विवेकानंद.

"दयाराम गिडुमल यांनी संभोग समतीचे वय कायद्यात दहा वर्षांचे होते. ते बारा वर्षांचे करावे अशा अर्थाचे एक लहानसे पत्रक प्रसिद्ध केले. इंडियन पिनल कोडातल्या काही कलमात हे वय बारा वर्षांचे मानले होते. बलात्काराच्या संबंधीच्या कलमात मात्र वयाची मर्यादा दहा वर्षांची धरली होती हा पिनल कोडातील घोटाळा काढून टाकावा एवढेच गिडूमल यांनी सुचविले होते. स्त्रियांवर गुदरणारा अनिष्ट प्रसंग टाळण्याचा हा एक मार्ग होता; व त्यामुळे धर्मावर घाला पडत नव्हता. परंतु कायद्यात सरकार फेरबदल करणार या एकच गोष्टीने पुराणमताभिमानी समाज संतापला. गिडूमल यांच्या पुस्तकातल्या मुद्यांना जबाब देऊन संमतीचे आहे तेच वयोमान योग्य आहे, असे आग्रहाने प्रतिपादन करणारे पुस्तक टिळकांनी छापून काढले व त्या वेळेपासून त्यांची गणना धर्मरक्षकात होऊ लागली. कायद्याच्या कलमातील विसंगती काढून टाकणे यावेळी सरकारलाहि श्रेयस्कर वाटल्यामुळे

हा प्रश्न धसास लागला." (फाटककृत रानडे चरित्र) बहिराम मलबारी यांचे एकंदर प्रयत्न व सरकारी अनुकूल धोरण व सुधारक मंडळींचा जोर यांमुळे संमतीचे वयोमान कायद्याने वाढविण्याचे झालेच असते परंतु या गोष्टीस अनुकूल अशी घटना त्याच सुमारास घडली. "फुलमणी खटला" या नावाने ही घटना प्रसिद्ध आहे. बंगालमध्ये हरीमोहन या नावाच्या तिशी उलटलेल्या गृहस्थाने दहा वर्षे वयाच्या फुलमणी नावाच्या आपल्या पत्नीवर बलात्कार केला व त्यातच तिचा अंत झाला! ऑगस्ट १८९० मध्ये घडलेली ही घटना अंतःकरणास हादरा देणारी होती. हरीमोहनवर खटला होऊन खालच्या कोर्टाने त्यास तीन महिन्यांची शिक्षा दिली. सरकारने त्याविरुद्ध अपील केल्यावरून वरिष्ठ कोर्टाने ती शिक्षा एक वर्षाची केली. रूढीशास्त्राच्या आधारापेक्षा या प्रत्यक्ष घटनेमळे पुरुष वर्ग वादविवादाच्या सभात दंग होता "सभांप्रमाणे अनुकूल प्रतिकूल शास्त्रवचनांची धुमश्चक्री वृत्तपत्रातून सुरू झाली. भांडारकर, तेलंग यांनी अनुकूल पक्षातर्फे शास्त्रवचनाचे पुरावे पुढे आणले. टिळकांनी प्रतिकूल शास्त्रवचनांची घोडी नाचविली. राणीच्या जाहीरनाम्यातल्या काही कलमांच्या अर्थाची ओढाताण तेलंग व टिळक यांमध्ये झाली. टिळकांच्या केसरीची नकली आयाळ हासडण्याचे काम आगरकरांच्या सुधारकाने चालविले होतेच. धर्माभिमानी पक्षाची धुरा एकट्या टिळकांनी घेतली होती. त्यांचे साहाय्य नसते तर पुण्यातील धर्माभिमानी लोकांना पुढाऱ्यांची वाण भासून त्यांचे हातपाय मोडण्यास वेळ लागला नसता. पुरुषांच्या सभा व त्यांचे लेख, वादविवाद एकीकडे सुरू असता काशीबाई कानिटकर, पंडित रमाबाई यांच्या प्रयत्नाने स्त्रियांची एक सभा भरली आणि संमती वयाच्या कायद्याचे त्यांनी अभिनंदन केले. कायदा करण्याविषयी सरकारला सुचविणाऱ्या अर्जाखाली सुमारे तीनशे स्त्रियांनी तेव्हा सह्या केल्या होत्या." (रानडे चरित्रावरून). महात्मा जोतीराव फुले यांनी स्त्रीशिक्षणाचा वृक्ष पुणे शहरात प्रथम लावला. स्त्रीजातीच्या सुधारणेसाठी त्यांनी अनेक प्रयत्न केले. त्याचे फळ म्हणजे पुण्यातील तीनशे स्त्रिया धर्ममार्तंडांच्या धर्मघातक रूढीवर घाव घालण्यासाठी तयार झाल्या. हे दृश्य महात्मा फुले यांच्या इच्छेनुसार घडले. शेवटी संमती वयाचे बिल कायदे कौन्सिलमध्ये पास झाले.

## अंधश्रद्धा व व्यक्तिद्वेष

लोकमान्य टिळकांनी पारतंत्र्याच्या बेड्या तोडण्यासाठी प्रयत्न केले. त्याबाबत ते अत्यंत आदरास पात्र आहेत. परंतु संमती वयाचे बिल व स्त्री-सुधारणेस त्यांचा विरोध यांबाबत हल्लीच्या स्त्रियांनी तरी विचार करणे जरूर आहे. स्त्रीस्वातंत्र्याच्या या काळात चांगल्या सुशिक्षित स्त्रिया रेडिओ-वर भाषण करतांना सांगतात की संमती वयाच्या कायद्यास टिळकांचा जो विरोध होता त्याचे कारण सरकारच्या मदतीने असे कायदे नकोत. परंतु वयाच्या पंचविसाव्या वर्षी स्वतःच्या लग्नाची जाहिरात देणाऱ्या स्त्रियांस हे चूक किंवा बरोबर हे सांगण्याचा काय अधिकार? टिळकांची चूक किंवा बरोबर हे त्यावेळी सांगण्याचा अधिकार फक्त फुलमणीसारख्या बालिकेलाच! सरकारच्या मदतीने कायदे नकोत म्हणणारे लो. टिळक चिरोल केसमध्ये सरकारी कायद्याची मदत घेऊन यशस्वी झाले. ज्याने स्त्रीजातीच्या दास्याची शृंखला तोडण्याचा भगीरथ प्रयत्न केला त्या महात्मा फुल्यांचे नाव निघताच काही ब्राह्मण समाजातील सुशिक्षित स्त्रिया आजहि बिचकतात हे आश्चर्य!

कमलाबाई देशपांडे ह्या आपल्या 'स्त्रियांची वाटचाल' या पुस्तकात भीतभीत म्हणतात, "प्रो. कर्वे यांच्या कामाबद्दल हिंगण्याच्या संस्थेच्या 'अभिप्राय' या पुस्तकात मनमोकळेपणाने दोन ओळी कौतुकाच्या लिहिणे व समाजसुधारणेच्या गोष्टीस अप्रत्यक्ष हातभार लागला असता तर लागू देणे टिळकांना पुढेहि जमले नाही. सामाजिक सुधारणेच्या बाबतीत नावड-तीचे मीठ आळणी हेच धोरण खरे!'

## विधवांचे मुंडण

**"आपल्यातील वाळू असतील त्या रीतीभाती हा श्रुतीचा वर्णाश्रम धर्म आहे अशी आपली ठाम समजूत करून घेऊन आणि सर्व प्रकारचे हक्क बळकावून बसून हे उच्चवर्णीय लोक विनाशाच्या मार्गाच्या पंथास झपा-ट्याने लागत आहेत."—स्वा. विवेकानंद.**

नवरा मेला असता त्याच्या बायकोच्या डोक्याचे संन्याशासारखे मुंडण करण्याची पद्धत श्रेष्ठ म्हणविणाऱ्या जातीत आहे. अशी दुष्ट चाल कोणत्याहि धर्मात व देशात नाही. मुंडन करतांना तिच्या वयाकडे लक्ष नसते. ती पाच वर्षे

वयाची असली तरी तिचे मुंडण करून तिला जबरीने संन्यास दीक्षा देणे ही चाल प्रथम बंद करण्याचे धैर्य जोतीरावांनी केले हे पुढील उताऱ्यावरून दिसत आहे. "जोतीराव गोविंदराव फुले यांनी स्वमतप्रसारार्थ काढलेल्या 'दीनबंधू' पत्रातून ब्राह्मण विधवांच्या केशवपनाबद्दल एक लेखमाला सुरू केली. न्हाव्यांची सभा झाली. ४००–५०० न्हावी जमले. कित्येक न्हाव्यांनी आपले विचार प्रदर्शित केले. एक न्हावीबोवा म्हणाले की, शास्त्राला मान्य नसलेले पापकर्म ब्राह्मण आपणांस चारपाच आण्यांसाठी करावयास लावतात. आणि आपण मात्र आठदहा रुपये उपटतात. सभेत विधवेचे वपन करू नये अशा अर्थाचे ठराव पास झाले. न्हाव्यांच्या सभेची बातमी इंग्लंडला पोहोचल्यावर तेथील काही स्त्रियांनी न्हाव्यांना हे सहृदयतेचे कार्य हाती घेतल्याबद्दल एक अभिनंदनपर पत्र पाठविले" (रानडे चरित्र). हजारो वर्षे धर्माच्या नावावर चाललेली अनिष्ट चाल जोतीरावांनी बंद करण्यासाठी त्या काळी अनेक प्रयत्न केले. समाजात ज्या ब्राह्मण विधवा आज सकेशा दिसतात व त्यांना समाजात मानसन्मानाने वागता येत आहे याचे मूळ जोतीबाच !

"विधवेचे वपन हे मोठे पुण्यकर्म आहे अशी समाजाची समजूत असल्याने वपनाचे जुलूम त्यांना सोसावे लागत. वपनावाचून राहिले तर होणारा छळ मरणानंतर सुद्धा चुकत नसे. १८५९ साली सोलापूराजवळच्या माढे गांवात एका गृहस्थाचे घर अतिवृष्टीने पडले होते. त्याखाली त्या गृहस्थाची एक विधवा बहीण सांपडली आणि प्राणास मुकली. तिचे वपन झाले नव्हते. अर्थात तिच्या प्रेताला स्पर्श केल्याने ब्राह्मणांना जातिभ्रष्ट व्हावे लागले असते. प्रेताच्या वपनाला न्हावी तयार होईनात. अखेर शूद्राच्या हस्ते तिला अग्निसंस्कार मिळाला." पेशवाईत एकाच वेळी तीनशे विधवांचे सामुदायिक मुंडण करण्यात आले होते असा उल्लेख आहे.

## भारतातील पहिली असहकाराची शिकवण

सन १८६० मध्ये पुणे शहरात एका न्हाव्याने चांगले घर बांधले होते. वास्तुशांतीसाठी काही ब्राह्मण बोलावले होते. वास्तुशांती करणाऱ्या ब्राह्मणांवर इतर कर्मठांनी बहिष्काराचे शस्त्र उचलले. या सामाजिक अन्याया-

संबंधी पुण्यातील न्हावी जोतीरावांकडे गेले. न्हाव्यांना जोतीरावांनी सल्ला दिला: जे ब्राह्मण बहिष्कार पुकारतात त्यांच्या हजामती न्हाव्यांनी करू नयेत. त्याप्रमाणे न्हावी मंडळींची सभा होऊन त्यांनी तसा ठराव केला. अन्याया-विरुद्ध असहकाराच्या प्रतिकाराची शिकवण देणारे भारतातील पहिले पुरुष म्हणजे जोतीबा. त्या चळवळीच्या वेळी म. गांधी जन्मासहि आले नव्हते.

## समाजसुधारणेतील अडसर

**"त्रावणकोर हा भिक्षुकांनी गजबजलेला प्रांत आहे. एवढी मोठी भिक्षुकांची वस्ती या प्रांताशिवाय दुसरीकडे कोठे सापडेल की नाही यात शंका आहे. प्रांतातील साऱ्या जमीनजुमल्यांवर फक्त ब्राह्मणांचा हक्क आहे. आणि मोठमोठ्या घराणातल्या स्त्रियासुद्धा ब्राह्मणांकडे उपस्त्रिया म्हणून राहण्यात मोठे भाग्य समजतात. ब्राह्मणांचे एवढे वजन जेथे आहे, तेथेच जवळ जवळ चतुर्थांश प्रजा ख्रिस्ती बनली आहे."– स्वा. विवेकानंद.**

समाजसुधारणेची ज्योत जोतीरावांनी पेटविली. तिचा प्रकाश अनेक तरुणांच्या अंत:करणांपर्यंत पोहोचण्यास सुरवात झाली. त्यामुळे धर्माच्या नावावर राजरोस चालणाऱ्या अनाचारास प्रतिबंध-करण्यासाठी अनेक तरुण धैर्याने पुढे येऊ लागले. "गुजराथी समाजात त्या एका संप्रदायाच्या आचार्यांना टीकेच्या भडिमाराने 'त्राहि भगवान' म्हणावयास लावणारा एक साहसी पुरुष समाजात निपजला. कर्सनदास मुळजी हे त्याचे नाव! ते ऐकून ठाऊक नाही असा सुशिक्षित विरळाच असेल. गुजराथी समाजात सुधारणा करण्याचे ब्रीद यांनी स्वीकारले होते. या समाजाच्या एका विभागात धर्मगुरूच दुराचार करीत असत व त्या दुराचाराला निमूटपणे संतोषपूर्वक संमती देण्यात पारलौकिक कल्याण आहे, अशी त्या विभागातल्या लोकांची अढळ समजूत होती.

धर्माच्या नावावर होणारे पाप कर्सनदास मुळजीने जगजाहीर करून धर्मगुरूंच्या पापी श्रेष्ठतेस आग लावली! धर्मगुरूंनी कर्सनदासवर हाय-कोर्टात फिर्याद केली. शेवटी धर्मगुरूंचे पापच बेकायदेशीर ठरले." (रानडे चरित्र). असे धर्माच्या नावावर होणारे अनाचार महाराष्ट्रात अनेक प्रकारांनी होत होते. ते जोतीरावांच्या समाजसुधारणेच्या चळवळीमुळे नष्ट होऊ लागले.

## थोरांचे प्रायश्चित्त

"चोर, दारूबाज आणि अनेक आततताई लोक आपले ज्ञातिबंधु होऊ शकतात आणि त्याजबरोबर आपला अन्नव्यवहारहि होतो. पण एखादा मनुष्य दुसऱ्या एखाद्या सत्त्वशील पण हलक्या जातीच्या मनुष्याबरोबर जेवला, तर त्याची उच्च जात नष्ट होते, त्याजवर बहिष्कार पडतो. अशा प्रकारच्या समाजपद्धतीने आपल्या देशाचे भयंकर नुकसान केले आहे."– स्वा. विवेकानंद.

ता. ४ ऑक्टोबर सन १८९० ला पुणे येथे पंचहौद मिशन या ख्रिस्ती संस्थेच्या समारंभासाठी पुण्यातील प्रतिष्ठित असे ब्राह्मण गृहस्थ गेले होते. त्या समारंभात ख्रिश्चन लोकांच्या हातचा चहा ते प्याले म्हणून ब्राह्मणांनी त्या मंडळींवर बहिष्कार टाकला. त्यात न्या. रानडे, लोकमान्य टिळक वगैरे सापडले. शंकराचार्यांनी या प्रकरणासाठी कमिशन पाठविले.

"कमिशनला मान वाकविणाऱ्या मंडळीत रानडे व टिळक असली धेंडे असल्यावर ब्राह्मणांचा वास्तविक अधिक विजय तो काय व्हावयाचा होता?. . . . .कमिशनने खालीलप्रमाणे व्यक्तिशः निकाल दिला. . . . टिळकांनी चहा घेतल्यानंतर श्री क्षेत्र काशीस जाऊन सर्व प्रायश्चित्त घेतल्याचा दाखला दिला. शिवाय पुण्यातहि दोन 'कृच्छ' प्रायश्चिते केली. म्हणून त्यांनी आणखी प्रायश्चित्त घेण्याचे कारण नाही, असे कमिशनने ठरविले. आठ जणांनी ज्ञाताज्ञात दोषनिवारणार्थ प्रायश्चित्त मिळण्याबद्दल अर्ज दिला होता. सबब त्यांना तो त्यांचा अर्ज बहाल करून सर्व प्रायश्चित्त घेण्याचा हुकुम झाला. हे आठ इसम म्हणजे रा. ब. माधवराव रानडे, रा. ब. विष्णू मोरेश्वर, भिडे, रा. ब. चिंतामण नारायण भट, रावसाहेब गोविंदराव कानिटकर, सीतारामपंत देवधर, वामनराव रानडे आणि वामन राव परांजपे. या मंडळींनी प्रायश्चित्त घेऊन शंकराचार्यांच्या आज्ञेस मान वाकविली."

जातिभेद व स्पर्शास्पर्श भेद हे भारताच्या प्रगतीचे खरे शत्रू आहेत, असे जोतीराव सांगत. स्वच्छ राहणी व पवित्र आचरण करणाऱ्याच्या हातचे अन्नपाणी ते जाहीर रीतीने घेत. मग असे लोक कोणत्याहि धर्माचे अगर पंथाचे असोत! न्या. मू. रानडे, लो. टिळक हे पदवीधर असून जगाच्या

इतिहासाची त्यांना तोंडओळख होती. म्हणून स्वराज्यासाठी ते प्रयत्न करीत होते. कदाचित त्याच वेळी त्यांच्या हाती स्वराज्याची सूत्रे आली असती तर त्यांनी पंथभेद व जातिभेद हे जिवंत ठेवण्याचे प्रयत्न केले असते. लो. टिळक चिरोल केससाठी इंग्लंडला गेले होते. परत आल्यावर त्यांनी समुद्रगमनाचे प्रायश्चित्त सन १९१९ मध्ये घेतले होते. बहिष्कारापुढे त्याकाळी सर्वच पुढाऱ्यांनी मान वाकविली होती. बहिष्कारास भीक न घालणारे महाराष्ट्रात फक्त जोतीरावच होते. ही प्रथा नष्ट व्हावी असे त्यांचे मत होते.

## गावास प्रायश्चित्त

"थोरले माधवराव पेशवे यांचे वेळी झाशीचे सरदार पारोळकर यांचे पदरी नारायण शास्त्री म्हणून विद्वान ब्राह्मण होते. त्यांनी एके दिवशी शौचकूपाजवळ एक भंगिणीची पोर पाहिली . . . . ही 'पद्मिनी' आहे असा शास्त्रीबोवांचा निश्चय झाला . . . . शास्त्रीबोवा तिजशी रममाण होऊ लागले व वेळोवेळी घरीहि आणू लागले. त्याच स्त्रीवर शहरातील पुष्कळ लोकांचा डोळा होता. तेव्हा त्या भंगिणीने शास्त्रीबोवास विचारले असता त्यांनी तिला सांगितले की तुला द्रव्याची आशा नाही तर तू प्रत्येकापासून द्रव्य न घेता एक एक यज्ञोपवीत (जानवे) घेत जा . . . शास्त्रीबोवांसंबंधी तिने पारोळकरांस समजविले. तेव्हा शास्त्रीबोवांनी उत्तर केले की, मीच तर काय, परंतु शेकडो ब्राह्मण बाटले आहेत. असे म्हणून भंगिणीकडून यज्ञोपवीते काढून दाखविली. हे पाहताच पारोळकरांस फार धास्ती पडली. कारण हे सर्व शहर बाटल्याचे वर्तमान पुण्यास समजले तर फार आकांत माजेल. नंतर ताबडतोब दुसरे गावचे ब्राह्मण आणून त्यांकडून शहराबाहेर पंचगव्य तयार करविले व दर एक ब्राह्मणाकडून क्षौरकर्म करवून यज्ञोपवीत व पंचगव्य देऊन शुद्ध केले. आणि सर्व शहरातील रस्त्यांवर व घरात गोमूत्राचा सडा टाकला. खुद्द शास्त्रीबोवा प्रायश्चित घेण्यास नाखुष असल्याने त्यांस भंगिणीसह हद्दपार केले." ('माझा प्रवास अथवा १८५७ सालच्या बंडाची हकीकत'वरून)

प्रायश्चित्ताच्या बंडाने हजारो वर्षे भारतात प्रलय केला होता. विसाव्या शतकाच्या सुरुवातीससुद्धा गावोगाव हे प्रायश्चित्ताचे बंड होते. जोतीरावानी समाजसुधारणेची दृष्टी जनतेस दिली नसती तर असले वरीलप्रमाणे अनेक

प्रकार आजहि दिसले असते. समाजाची सर्वांगीण सुधारणा करण्याचे खरे श्रेय जोतीराव यांनाच आहे. बोलण्याप्रमाणे प्रत्यक्ष कृती त्यांच्याशिवाय इतरांनी केली नाही म्हणून महाराष्ट्राचे आद्य समाजसुधारक फक्त जोतीरावच ! त्यांच्या कृतीचा लाभ आज समाज घेत आहे. विशेषतः ब्राह्मण-समाज प्रायश्चित्त व बहिष्कार या कात्रीतून वाचला याला खरे कारण महात्मा फुले यांनी समाजसुधारणेचे दाखविलेले धैर्य !

● ● ●

## प्रकरण आठवे

# ग्रंथनिर्मिती

**"तुमचे सिद्धांत कितीहि उच्च असले आणि तुमच्या तत्त्वज्ञानाचे जाळे कितीहि सूक्ष्म विणलेले असले, तरी जोपर्यंत त्याची व्याप्ती ग्रंथातील शब्दांपलीकडे अथवा हटवादी धर्माज्ञांपलीकडे गेली नाही तोपर्यंत ते सिद्धांत आणि ते तत्त्वज्ञान निरर्थक आहे असे मला वाटते. ग्रंथाच्या मर्यादेच्या आत जो धर्म कोंडून बसला आहे तो धर्म तरी कसला ?" – स्वा. विवेकानंद**

वैदिक धर्म संस्कृतरूपी किल्यात कोंडून त्याच्यावर सोवळ्या-ओवळ्याचा कडक बंदोबस्त कर्मठांनी ठेवला होता. वेदान्त धर्माचे हृद्गत बहुजनसमाजास समजू नये म्हणून संस्कृत भाषा शिकण्याची धर्माज्ञेच्या नावाखाली त्यांनी बंदी केली होती. परंतु परधर्मीयांस ते वेदाचे ज्ञान देत होते.

**"तुझ्या खिशात पुरेसा पैसा असला की तुझ्या हव्या त्या कर्माला शास्त्राधार काढून देण्यास भटभिक्षुक एका पायावर तयार."**

**– स्वा. विवेकानंद**

**"कर्मभ्रष्ट झाले द्विज । म्लेंछा संगती वेदबीज ।।**
**सर्व गेले सहज । मंदगती झाले ब्राह्मण ।। (एकनाथी भागवत)**

"अकबर बादशहास पंडितांनी वेदाचे तत्त्व सांगितले. इतकेच नाही तर 'अल्लोपनिषद्' या नावाचा एक ग्रंथहि बादशहाच्या आज्ञेवरून तयार केला

असे सांगण्यात येत आहे. यावरून स्वार्थासाठी परधर्मीयांस वेदाचे तत्त्वज्ञान आमचे धर्ममार्तंड सांगत होते हे स्पष्ट दिसते.

जोतीराव सांगतात :– "या धूर्त आर्यभट ब्राह्मणांनी हा काळपावेतो आम्हां शूद्रादि अतिशूद्रांस संस्कृत शिकण्याची बंदी केली होती. म्हणून आपणांस त्यांच्या वेदातील गोम शोधून काढण्यास मार्ग उरला नव्हता. परंतु कर्नल लिग्रँड जेकप, विल्यन्स वगैरे कनवाळू युरोपियन सत्पुरुषांस आम्हां शूद्रादि अतिशूद्रांची दया आली. त्यांनी वेदातील गोम बाहेर काढून जगभर प्रसिद्ध केली आहे. याला मूळ आधार युरोपियन सद्गृहस्थांचा लेख." संस्कृत भाषेची द्वारे बहुजन समाजास बंद, परधर्मीयांस मात्र खुली होती.

**"उपनिषद ग्रंथ क्षत्रियांनी निर्माण केले असून ब्राह्मणे वगैरे ग्रंथ ब्राह्मणांनी निर्माण केले आहेत. हिंदुस्थानातील बहुतेक अवतारी पुरुष क्षत्रिय वर्गाचे होते. त्यांनी विश्वव्यापी सनातनी धर्माचा उपदेश केला. उलटपक्षी बहुतक ब्राह्मण अवतारी पुरुष कोत्या मार्गाने जाणार होते. राम, कृष्ण आणि बुद्ध हे अवतार क्षत्रिय वर्गात उत्पन्न झाले." – स्वा. विवेकानंद**

उपनिषद ग्रंथास जन्म देणारे क्षत्रिय. परंतु त्यातील धर्मज्ञान वाचण्याचा व ऐकण्याचा हक्क त्यांच्या वंशजांकडून हिरावून घेतला. संस्कृत भाषा ही शास्त्री–पंडितांच्या मालकीची होताच त्यांनी मन मानेल तसे काल्पनिक ग्रंथ निर्माण केले व देश अधोगतीच्या मार्गास लावला.

## कलीयुग

सनातनी वृत्तीच्या लोकांनी केवळ स्वतःचे महत्त्व कायम राहण्यासाठी अनेक काल्पनिक ग्रंथ संस्कृत भाषेत निर्माण केले. त्यातच 'कलीयुग' हा राष्ट्रनाशक ग्रंथ जन्मास आला. महिकावतीच्या बखरीतील पुढील अवतरण पहा.

**"कलीयुगात असा (हिंदू राज्य नष्ट होण्याचा) प्रकार होणार अशी भाक लक्ष्मी नारायणाने दिली होती. ती शके १२७० त खरी ठरली. हरिहर गुप्त झाले. ऋषि बद्रिकाश्रमी गेले. वसिष्टही गेले. सूर्यवंशी, चंद्रवंशी क्षत्रिय यांची शस्त्रविद्या लुप्त झाली."**

अल्लाउद्दीन खिलजीस देवगिरीचे राज्य घेण्यास हे कलीयुगाचे वर्णन

विशेष उपयोगी पडले असेल. क्षत्रियांची शस्त्रविद्या लुप्त होणार असे ठरविणारे शास्त्री–पंडित हे देशाचे व धर्माचे कोण? याचा विचार सूज्ञांनी करावा. या कलीयुग कल्पनेचे जोखड झुगारण्यास शिवछत्रपतींस किती प्रयास पडले असतील. हे कलीयुगाचे वर्णनच मुसलमानांस त्यांच्या शौर्यापेक्षा जास्त मदत करणारे ठरले असेल. कारण कलीयुग–कल्पनेने हिंदूंची शूर वृत्ती पांगळी बनणे शक्य आहे.

**" शिवाजी महाराजांनी मोठी क्रांती केली, त्यांनी कलीयुग कल्पना नष्ट केली. हरिहर हिंदूंना पाठमोरे झाले, आपले देवच मुसलमानांना वश आहेत हा घातकी समज जनमनातून समूळ काढून टाकला. अदष्टफलप्रधान धर्म उच्छिन्न करुन टाकून 'महाराष्ट्र धर्माची' संस्थापना केली. पतितांची शुद्धी, परदेशगमन, समुद्रप्रवास हे नवे आचार सुरू केले. जन्मजात श्रेष्ठत्व क ी करुन गुणास मोल दिले. वतनदारी मिरासदारी मोडून काढली. अशा अनेक नव्या गोष्टी त्यांनी केल्या.** पाहा– 'शिवछत्रपतीचे क्रांतिकार्य' हा डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे यांचा लेख'– **वैयक्तिक व साजाजिक कार्य ह्या निबंध**-संग्रहामध्ये.

कलीयुग कल्पनेमुळे भारतभू होरपळली गेली होती. पावलागणिक दुःखाचे सुस्कार ती सोडीत होती.अशा वेळी शिवछत्रपतीने तरुण मावळ्यांच्या ताज्या रक्ताचा सडा शिंपडून रक्तरंगण केले. कलीयुग कल्पनेच्या नाशासाठी असंख्य स्त्रियांनी आपली कपाळे पांढरी फटफटीत करून घेतली. अगणित मातापित्यांनी पुत्रप्रेमासाठी कळवळत्या अंतःकरणाने ढाळलेल्या अश्रुधारानी कलीयुगाची कल्पना भिजवून नष्ट केली. तेव्हा कोठे शिवप्रभूस सूर्यवंशाची शस्त्रविद्या प्रगट करता आली व कलीयुग कल्पनेस मूठमाती देता आली. त्यामुळे धर्मरक्षण व स्वातंत्र्यरक्षणाचा धडा त्यांना जनतेस देता आला. कलीयुग नष्ट झाले हे जनतेस दाखविण्यासाठी शिवप्रभूने प्रत्यक्ष कृती केली. फलटणचा बजाबा निंबाळकर यास विजापूरच्या बादशहानी बाटवून मुसलमान केले होते. त्याला शिंगणापूरच्या महादेवाच्या देवळात महाराजांनी परत हिंदू करून घेतले. शिवप्रभूचा उजवा हात नेताजी पालकर यास औरंगजेब बादशहाने बाटवून त्याचे नांव कुलीखान ठेवले व त्याला सात वर्षे अफगाणिस्थानात पाठविले होते. शिवाजी महाराजांवर स्वारी

करण्यासाठी नेताजीस (कुलीखानास) औरंगजेबाने पाठविले असता शिवप्रभूंने त्याला परत हिंदू करून घेतले. कलीयुगाची कल्पना नष्ट करण्यासाठी महाराजांनी आरमार ठेवून समुद्रमार्गे परदेशांशी व्यापार सुरू केला. समुद्रगमन करणे हे धर्मबाह्य आहे ही भावना नष्ट केली. नंतर पेशवाई काळात समुद्रगमन हे पाप म्हणून आरमाराकडे दुर्लक्ष केले गेले.

समुद्रगमनच काय पण अनेक राष्ट्रहिताच्या व सुधारणेच्या गोष्टींचा जोतीरावांनी जाहीर पुरस्कार केला. त्यामुळे अनेक तरुण परदेशगमन करू लागले व महाराष्ट्र प्रगतीच्या मार्गास लागला. याचे खरे श्रेय जोतीरावांनाच आहे. अनिष्ट चालीरीतींवर ते शास्त्रांची व रूढींची भीडमुर्वत न ठेवता प्रहार करीत.

## पुराणे

**"दिवसेंदिवस अधिकाधिक दुर्बल होण्याचा यत्न जणू काय आपण गेली हजार वर्षे केला. आमची सारी पुराणे पहा, त्यातहि त्याच दौर्बल्य आणणाऱ्या गोष्टींची संख्या इतकी होईल की त्यांनी पाऊण हिस्सा पुस्तकालय भरुन जातील." – स्वा. विवेकानंद**

पुराण ग्रंथातील साऱ्याच गोष्टी असंभाव्य व काल्पनिक आहेत. त्यामुळे हिंदूंची मने दुर्बल बनली. पृथ्वी शेषाच्या डोक्यावर आहे. समुद्राचे पाणी खारे असण्याचे कारण अगस्ती ऋषीने समुद्रप्राशन केले, नंतर लघवीवाटे सर्व पाणी बाहेर टाकले, त्यामुळे समुद्राचे पाणी खारट झाले. चंद्र-सूर्यांचे ग्रहण म्हणजे राहू–केतू नावाचे राक्षस त्यांना गिळतात, दानधर्म केला म्हणजे ते त्यांना परत ओकतात व ग्रहण सुटते अशा अनेक गोष्टींनी आमची सारी पुराणे बरबटलेली आहेत. अशा पुराणांवर जे विश्वास ठेवणार नाहीत त्यांच्या संसाराची राखरांगोळी होऊन शेवटी नरकवास, अशी भीती प्रत्येक पुराणकाराने घातली. त्यामुळे समाज अंधश्रद्धेने पुराणांवर विश्वास ठेवतो. कल्याण प्रांतात भूकंपाचा धक्का बसला, त्याचे कारण शेषास पृथ्वीचे ओझे सहन झाले नाही म्हणून पेशव्यांनी होमहवने करून लाखो रुपये खर्च केले. पंढरपूर येथील विठ्ठलाच्या डोक्यावर पाल पडली, त्यावेळी पेशव्यांनी बराच खर्च केला, अशा तऱ्हेचे उल्लेख आढळतात. दशावताराच्या वर्णनाची पुराणे

ज्या क्षणी जन्मास आली त्याच क्षणी हिंदू जात व हिंदू धर्म यांच्या दुर्दशेचा जन्म झाला. अशा पुराणांवर जोतीरावांनी चिकित्सेचा मारा करुन जनतेस अंधश्रद्धेपासून दूर करण्याचे महान कार्य केले.

**गुलामगिरी**

**"निःसत्त्व झालेल्या लक्षावधी लोकांना हात देणारी शास्त्रे आम्हांस हवीत. युद्धाच्या धुमश्चक्रीत आम्हांबरोबर असतील, जयाच्या महोत्सवात आणि पराभवाच्या दुःखप्रसंगी आमच्या सुखदुःखात भागीदार होतील, आणि मृत्यूची भयप्रद छाया आम्हांवर पसरली असता आम्हांस धीर देतील, अशी शास्त्रे आम्हास हवीत. ही कार्य न करणारी शास्त्रे आम्हां मनुष्यजातीच्या उपयोगी नाहीत आणि आमच्या दृष्टीने ती शास्त्रेच नव्हेत."**

**– स्वा. विवेकानंद**

हिंदूंची असंख्य शास्त्रपुराणे असून फक्त मुसलमानांच्या एकाच 'कुराण' ग्रंथाच्या अनुयायांनी आम्हास दे माय धरणी ठाय केले. 'बायबल' हा एकच शास्त्रग्रंथ हातात घेऊन ख्रिश्चन लोकांनी जगभर सत्ता गाजविली.

**"योग्य काळी महापुरुष, ऋषी सामान्य जनात जन्म घेतात व त्या काळच्या परिस्थितीस अनुरूप अशी समाजरचना म्हणजे स्मृती निर्माण करतात." – स्वा. विवेकानंद**

मानव जातीच्या हितकर्त्याच्या ठिकाणी जे अलौकिक व श्रेष्ठ गुण असतात, ते सर्व जोतीरावांच्या ठिकाणी होते. राष्ट्रसंस्थापक अगर समाजोद्धारक यांच्या अंगी जी जबरदस्त आकर्षक शक्ती व लोकसंग्राहक वृत्ती असते ती जोतीरावांच्या अंगी होती. त्या दैवी बळावरच ते समाजात नवचैतन्य उत्पन्न करू शकले. समाजाच्या दुर्दशेचे कारण ते शोधू लागले असता त्यांना कळून आले की, याला मूळ कारण पुराण ग्रंथ व ब्राह्मणी धर्म ! यांचे उच्चाटन ग्रंथांद्वारे करण्याचे त्यांनी ठरविले. ग्रंथरचनेस जोतीरावांनी सुरुवात केली, परंतु निरनिराळे ग्रंथ मिळणे कठीण भासू लागले. कारण, ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ आदि महाराष्ट्रीय संतांचे वाङमय सन १८५६ पर्यंत छापले गेले नव्हते. संस्कृत ग्रंथ न छापण्याचे कारण पंडित सांगत, "छापखान्यात जो शाई वापरली जाते ती चरबीयुक्त असते. त्यामुळे

ग्रंथांचे पावित्र्य नष्ट होते." अशा सर्वस्वी प्रतिकूल परिस्थितीत जोतीरावांनी हवे ते ग्रंथ मिळविले व त्या आधारावर ग्रंथरचनेस सुरुवात केली.

**"एक राजा दहा हजार वर्षे जगला अथवा दुसरा वीस हजार वर्षे जगला अशी वर्णने पुराणातून आढळून येतात." – स्वा. विवेकानंद**

पुराण ग्रंथांचा गाभा म्हणजे दशावतार! या अवतारकल्पनेवर जोतीरावांनी 'गुलामगिरी' या ग्रंथाद्वारे प्रखर विचार मांडले. कारण समाजाच्या गळयात अनंतकाळ धार्मिक गुलामगिरी अडकविणारी गोष्ट म्हणजे अवतार-परंपरा! प्रत्येक अवतारासंबंधी आपल्या 'गुलामगिरी' पुस्तकातून माहिती देऊन परशुराम, वामन यांची दुष्कृत्ये त्यांनी सांगितली. 'गुलामगिरी' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत परशुरामाबाबत ते म्हणतात, "त्याने पुष्कळ क्षत्रिय लोकांचे प्राण घेऊन त्यांच्या अनाथ झालेल्या स्त्रियांपासून त्यांची लहान लहान चार–चार पाच-पाच महिन्यांची गरीब बिचारी निर्दोषी बालके हिसकावून घेऊन अंतःकरणात काही द्रव न येऊ देता त्यांचे प्राण किती मोठे दुष्ट रीतीने हरण केले! तो दुष्ट इतकेच करून राहिला नाही, तर आपल्या पतीच्या मृत्युमुळे दीन झालेल्या स्त्रिया आपल्या पोटात असलेल्या गर्भाच्या रक्षणार्थ रानोमाळ क्लेशाने पळत असता पारध्याप्रमाणे त्यांचा पाठलाग करून त्यास पकडून आणून कैदेत ठेवले व त्यास पुत्र झाला असे ऐकले की, लागलीच येऊन त्या अर्भकाचे प्राण घ्यावे. भट लोक क्षत्रियांच्या विरुद्ध पक्षाचे होते. त्या अर्थी त्याजपासून त्यावेळची सर्व खरी हकिगत समजेल असे नाही. कारण आपण केलेली वाईट कर्मे आपल्या तोंडाने कोणी सांगत नाही; म्हणून वर दिलेली हकिगत त्यांनी आपल्या ग्रंथात लिहून ठेविली हे मोठे आश्चर्य आहे." असे नीच कृत्य करणारास विष्णूचा अवतार म्हणून शास्त्री–पंडित कंठरवाने सांगत आहेत. परशुरामाच्या अवतार-कल्पनेतून क्षत्रियांचा द्वेष ब्राह्मण करू लागले. मुसलमानांनी हवे ते अत्याचार केले तरी त्यांचा क्षत्रियद्वेष कधीच नाहीसा झाला नाही. छत्रपती शिवाजी महाराजांनी राज्याभिषेक केला. त्यावेळी ब्राह्मणांनी विरोध केला. कारण शिवाजी महाराज क्षत्रिय नाहीत. एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करणाऱ्या परशुरामाचा रामचंद्र ह्या सूर्यवंशीय क्षत्रियाने पराभव केला असे जोतीरावांनी

लिहिले आहे. परशुराम चिरंजीव असून त्यास मृत्यू नाही, असे पुराणग्रंथात लिहिले आहे. त्याबाबत जोतीबा 'गुलामगिरी 'त लिहीत आहेत:

"चिरंजीव परशुराम उर्फ आदिनारायणाचा अवतार यास मुक्काम सर्वत्र ठायी असे.

"अरे दादा परशुरामा, तू ब्राह्मणांच्या ग्रंथावरून चिरंजीव आहेस. कडू का होईना, परंतु कारली खाण्याचा तू धिक्कार केला नाहीस. पहिल्या-सारखे तुला कोळयाच्या मढयापासून दुसरे नवीन ब्राह्मण उत्पन्न करावे लागणार नाहीत. कारण मढयापासून तू उत्पन्न केलेल्या ब्राह्मणांपैकी हल्ली कित्येक 'विविधज्ञानी' बनून बसले आहेत. त्यांना काही अधिक ज्ञानसुद्धा देण्याची तुला जरुरी नाही. फक्त तू येथे ये आणि त्यांनी शूद्रांची गाजरे खाल्ल्याबद्दल त्यास चांद्रायण प्रायश्चित देऊन त्यांच्याकडून तुझ्या वेदमंत्र जादूच्या सामर्थ्याने पहिल्यासारखे काही चमत्कार इंग्लिश, फ्रेंच वगैरे लोकास करून दाखीव म्हणजे झाले. तू असा तोंड चुकवून पळत फिरू नकोस. तू या नोटीशीच्या तारखेपासून सहा महिन्यांच्या आत येऊन हजर झाल्यास मी तर काय पण एकंदर सर्व जगातील लोक तू सर्वसाक्षी आदिनारायणाचा अवतार खास आहेस म्हणून तुला मानतील. तू तसे न केल्यास आमच्या म्हसोबाच्या पाठीस लपून बसलेल्या तुझ्या 'विविधज्ञानी' म्हणविणाऱ्या ब्राह्मण बच्च्यास ओढून आणून त्यांची फटफजिती करावयास येथील महार, मांग कधी कमी करणार नाहीत. तेणकरून त्याच्या तुणतुण्याची तार तुटून त्याच्या झोळीत दगड पडल्याने उपाशी मरू लागल्याने विश्वामित्रासारखे कुत्र्याचे फरे खाण्याचा प्रसंग त्याच्यावर आणू नको."

| | |
|---|---|
| ता. १ली माहे आगस्ट इ. स. १८७२, पुणे, जुनागंज घ. नं. ५२७. | आपला खरेपणा पाहणारा जोती गोविंदराव फुले. |

परशुरामाचा काल्पनिक पराक्रम व त्याने एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली या आधारावर फक्त ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ग असल्याचे शास्त्री-पंडित सांगतात. त्यांचे म्हणणे जोतीरावांनी फोल ठरवून परशुरामाचेच खरे स्वरूप उघडे केले. याच कारणास्तव काही कर्मठ ब्राह्मण जोतीरावांचा द्वेष करीत आहेत. वामन– अवताराबाबत जोतीराव अत्यंत तळमळीने सांगत आहेत: "बळी राजा हा अत्यंत न्यायी असून प्रजेचे पालन पुत्रवत करीत होता.

त्याचा वामनाने कपटविद्येने घात केला. अशा कपटी वामनासहि अवतारी ठरविण्यात आले व तो अवतार विष्णूने घेतला असे पुराणात वर्णन आहे."

बळीचे राज्य हे उत्तम होते. याबाबत गुलामगिरी ग्रंथात जोतीराव सांगत आहेत:

"क्षत्रिय वंशाच्या स्त्रियांनी दरवर्षी आश्विन शुद्ध दशमीस संध्याकाळी आपल्या पतीस व पुत्रास ओवाळून पुढे येणाऱ्या बळीचे राज्य यावे म्हणून इच्छिण्याचे सोडले नाही. त्याचप्रमाणे कार्तिक शुद्ध द्वितीयेस आपल्या बंधूस यथाशक्ती भोजन घालून तृप्त केल्यानंतर त्यास ओवाळून "इडापिडा जावो आणि बळीचे राज्य येवो" अशी येणाऱ्या बळीची आठवण दिली त्या वेळेपासून आज दिवसपर्यंत दरवर्षी दिवाळीत भाऊबीजेस क्षत्रिय कन्या आपापल्या बंधूस येणाऱ्या बळीच्या राज्याच्या आठवणीशिवाय दुसरा आशीर्वाद देत नाहीत. परंतु उपाध्यायांचे कुळीत अशी आठवण देण्याची वहिवाट मुळीच नाही."

"बळी तो कान पिळी" अशी म्हण त्यापासून समाजात रुढ होणे शक्य आहे. बळीराजा जेव्हा काही महत्त्वाचे काम आपल्या सरदारावर सोपवित असे तेव्हा आपला दरबार भरवून तेथे एका तबकात भंडार व नारळ यांसह पानाचा विडा मांडून तो म्हणत असे की ज्यास हे काम करण्याची हिंमत असेल त्याने हा विडा उचलावा. नंतर ही पद्धत मराठी राज्यातहि सुरु होती. जोतीबा पुढीलप्रमाणे सांगतात :

"बळीच्या सर्व महावीरांपैकी भैरोबा, जोतीबा व नऊ खंडोबा हे रयतेच्या सुखाकरिता झटण्याची शर्थ करीत असत. याकरिता मराठ्यांनी हरएक शुभकार्य सुरू करण्याच्या पूर्वी तळी उचलण्याचे संस्कार करण्याचे सुरू ठेवले असून त्यात बहिरोबा, जोतीबा व खंडोबा ह्यांस देव मानून त्यांची नावे सामील करून ते तळी उचलतात . . . बळीराजा आपल्या सर्व प्रजेसहित हरहर महादेवाच्या नावाने आदितवारास पवित्र मानीत असे. बळीराजाची आज्ञा मराठे पाळीत असत." या परंपरेस अनुसरून महाराष्ट्रातील बहुजन-समाज रविवारच्या वारास पवित्र मानीत आहे. इतकेच नाही तर देशस्थ ब्राह्मण हा रविवार पवित्र म्हणून पाळीत असतात व तळी भरतात. चंपाषष्टीहि बहुजनसमाजाप्रमाणे विधिपूर्वक देशस्थ ब्राह्मणसुद्धा पाळतात.

'गुलामगिरी' हे पुस्तक सोळा भागातून जोतीरावांनी लिहिले. त्यात दशावतारांबाबत लिहून सामाजिक व धार्मिक गुलामगिरीबाबत उपयुक्त असे विवेचन त्यांनी केले. सरकार कर घेते त्या प्रमाणात बहुजनसमाजास शिक्षण द्यावे, सरकारी नोकरीत अस्पृश्य व बहुजनसमाज यांना लोकसंख्येच्या प्रमाणात नोकऱ्या देणे वगैरेंबाबत लिहून सरकारी धोरणावर प्रसंगोपात सत्य अशी टीका केली. 'गुलामगिरी' या पुस्तकाबाबत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आपल्या जोती निबंधांत लिहित आहेत:

"जोतोबा फुले यांनी पहिल्यांदा जो आढावा घेतला, त्यात त्यांना हिंदू समाजाच्या अधोगतीचे मूळ हिंदू समाजात हजारो वर्षे खोल रुजलेल्या सामाजिक गुलामगिरीत दिसले. आणि ही गुलामगिरी सुधारलेल्या इंग्रजी राज्यातहि तशीच कायम आहे असे त्यांनी पाहिले. ह्या गुलामगिरीच्या मूळ कारणाचा शोध त्यांनी केला व त्यात त्यांना असे आढळून की ब्राह्मणांनी आपल्या नेतृत्वाखाली निर्माण केलेला धर्मच याला जबाबदार आहे. म्हणून त्यांनी पहिले जे पुस्तक लिहिले त्यास "सुधारलेल्या इंग्रजी राज्यात ब्राह्मणी धर्माच्या आडपड्यात गुलामगिरी" असे नामाभिधान केले. त्यांना विचाराची स्फूर्ती पाश्चात्य लोकसत्तावादी तत्त्वज्ञांनी दिली. म्हणून त्यांनी हे पुस्तक निग्रोंना दास्यमुक्त करण्याची चळवळ करणाऱ्या अमेरिकन नागरिकांना अर्पण केले.

त्यांनी आपल्या पुस्तकात त्यावेळच्या परिस्थितीस अनुसरून असे विधान केले आहे की, "ब्रिटिश लोकांचे राज्य असूनहि प्रत्यक्ष राज्यकारभाराची अंमलबजावणी करणारे लोक प्रामुख्याने ब्राह्मणच आहेत. म्हणून ब्राह्मणेतर अशिक्षित बहुजनसमाजाची हरएक बाबतीत नाडणूक होत आहे. जातिभेदातील उच्चनीच भाव पूर्वीइतकांच कठोरपणाने पाळला जातो. पुण्यासारख्या शहरातहि ब्राह्मणांच्या पाणवठ्यावर किंवा हौदावर ब्राह्मणेतरांचा शिरकाव होऊ शकत नाही. शिक्षणसंस्थातून ब्राह्मणांचाच भरणा अधिक होतो. शिक्षणातील क्रमिक पुस्तकात ब्राह्मणांनी लिहिलेल्या धर्मग्रंथातील दोषांवर पांघरुण घातले आहे. खेड्यातील बहुजनसमाज व विशेषतः शेतकरी शिक्षण घेऊ शकत नाही. तो निरक्षर आहे, त्यामुळे तो सगळ्या व्यवहारात ठोकर खातो व त्याची फसवणूक निरनिराळ्या तऱ्हांनी करण्यास

शिक्षित लोक तयार असतात. बहुजनसमाज दरिद्री असल्यामुळे त्याला शिक्षण घेणे परवडत नाही. धार्मिक भोळ्या भावामुळे त्याने निढळाच्या घामाने मिळविलेला पैसा अनाठायी खर्चिला जातो. त्याच्यावर होणाऱ्या अन्यायाची त्याला एक तर जाणीवच नसते व जाणीव झाली तरी अज्ञानामुळे आणि दारिद्र्यामुळे त्याला आपल्यावरील अन्यायाचे परिमार्जन करून घेता येत नाही. त्याच्या गाऱ्हाण्यांची दादच कोठे लागत नाही." अशा रीतीने सर्वसामान्य परिस्थितीचे वर्णन जोतीबांनी 'गुलामगिरी' या पुस्तकात केले आहे.

"जनता गुलामगिरीत असते. परंतु ती गुलामगिरी नष्ट करण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्यामध्ये असतेच असे नाही. स्वतः गुलाम मालकाच्या बाजूचे असतात. अमेरिकेतील निग्रो गुलामांना दास्यनाशाचे इतके महत्त्व वाटले नाही, जितके स्वतंत्र गोऱ्या अधिकाऱ्यांना वाटले. इंग्लिश अधिकाऱ्यांनी कोकणातील खोतांबद्दल कुळांनी योग्य त्या तक्रारी कराव्यात अशी योजना केली. कोकणात खोत-जमीनदार कुळाला चोवीस तास राबवत आणि जगण्यापुरते अन्न देत. खोतमालक कुळांना झोडपून काढीत. परंतु इतकी स्थिती असूनहि कुळांनी जेव्हा साक्षी दिल्या तेव्हा त्यांनी आपल्या मालकाचीच बाजू घेतली. म्हणून जनतेला शिक्षणाची आवश्यकता आहे व ते शिक्षण अंधश्रद्धा व भोळा भाव नष्ट करणारे असले पाहिजे. असे शिक्षण म्हणजे आधुनिक शिक्षणच होय. आपल्या हितसंबंधांस जागृत असणारे व बहुजन-समाजाच्या अज्ञानावर व मागसलेपणावर ज्यांचे प्रस्थ व वैभव अवलंबून आहे असे ब्राह्मण इत्यादि लोक असे शिक्षण प्रजेला मिळण्याच्या विरुद्ध असतात." तर्कतीर्थांनी महात्मा जोतीरावांच्या कार्याचे महत्त्व सत्यदृष्टीने जाणले आहे व समाजापुढे स्पष्ट मांडण्याचे धैर्य दाखविले हे विशेष असे आहे.

## शेतकऱ्याचा आसूड

**"हिंदुस्थान आळशी भामट्यांनी भरलेला आहे. केवढाहि दुष्काळ पडो असल्यांची पोटे नेहमी तुडुंब. त्यांना उपवास पडला असे कधी घडावयाचे नाही. – स्वा. विवेकानंद.**

इ. स. १८७७ साली मोठा दुष्काळ पडला होता. तेव्हा शेतकऱ्यांची

अन्नान्नदशा झाली होती. अशा वेळी जोतीरावांनी 'शेतकऱ्याचा आसूड' हे दोन चाळीस चाळीस पानांचे निबंध लिहिले व सरकारी अधिकाऱ्यांकडे रवाना केले. त्यात त्यांनी शेतकऱ्याच्या दैन्याचे हुबेहुब चित्र रेखाटले होते. आपत्तीत सापडलेल्या शेतकऱ्यास सर्वतोपरी साह्य करणे हे सरकारचे आद्य कर्तव्य आहे असे आग्रहाने त्यांनी प्रतिपादले होते. काही वर्षांनंतर त्यांनी याच विषयावर दोन निबंध लिहिले. पण ते त्यांच्या काळी प्रसिद्ध झाले नाहीत. त्या निबंधात ते म्हणतात, "मी जो जो विचार करतो तो तो मला एखाद्या महासागराकडे दृष्टी फेकल्यासारखे होते." गोरगरीब व पीडित लोकांच्या दुःखांशी जोतीराव अगदी एकरूप बनत. 'आसूड' हे पुस्तक नुकतेच समाज-हिताबद्दल कळवळणाऱ्या श्री. धनंजय कीर व श्री. स. गं. मालशे ह्यांनी प्रसिद्ध केले आहे. ते वाचकानी जरूर पहावे.

**"जिस तन लागे वही तन जाने ।**
**बिजा क्या जाने गव्हारा रे" ।।**

श्रीमंत सयाजीराव गायकवाड सन १८८५ च्या पावसाळ्यात पुण्यास आले होते. त्यावेळी मराठा समाजाने त्यांना मानपत्र दिले. ह्या समारंभात बोलतांना न्यायमूर्ती रानड्यांनी "जातिभेद असला म्हणून आपल्या इष्ट हेतूस तो बिलकुल आडवा येत नाही" असे उद्‌गार काढले होते. त्यांचे खंडण करण्यासाठी जोतीरावांनी 'इषारा' नावाचे लहान पुस्तक लिहिले. त्यात जातिभेद समाजाच्या ऐक्यास व प्रगतीस कसा विघातक आहे याचे साधार वर्णन केले आहे. मुसलमानी राज्यात व पेशवाईत जातिभेदामुळे किती क्रूर जुलूम होई याची काही उदाहरणे देऊन शेतकऱ्यांच्या दुःखद स्थितीचे वर्णन केले आहे. शेतकऱ्यांची दैन्यावस्था दूर होऊन देशास चांगले दिवस येण्यासाठी सर्वत्र पाटबंधाऱ्याची सोय होण्याबद्दल तसेच बंडिंग, पाझर तलाव, नाले अडविणे वगैरेंबाबत ते कळकळीने सांगतात.

## सार्वजनिक सत्य धर्म पुस्तक

**सत्य सर्वांचे आदीघर ।। सर्व धर्मांचे माहेर ।।**
**जोती प्रार्थी सर्व लोकां ।। व्यर्थ डंभा पेटू नका ।।**

"या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनी धर्मपुस्तके

केले आहेत त्यांपैकी एकाहि ग्रंथात आरंभापासून शेवटपर्यंत सारखे सार्वजनिक सत्य नाही. कारण प्रत्येक पुस्तकामध्ये काही एका व्यक्तींनी त्या वेळच्या प्रसंगास अनुसरून हेकटपणा केल्यामुळे ते धर्म एकंदर सर्व मानवी प्राण्यास सारखे हितकारक न होता सहजच त्यामध्ये अनेक फळ्या होऊन त्या एकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करू लागतात. ....या पृथ्वीच्य पृष्ठभागावर एकंदर सर्व मानव प्राणी अवयवाने व बुद्धिकौशल्याने एकसारखे असून त्यापैकी काही लोक पिढीजात पवित्र बनून श्रेष्ठ कसे होऊ शकतील? सर्वांसारखे त्यास जन्ममरण असून ते सर्वप्रमाणे सद्‌गुणात व दुर्गुणात निपुण नाहीत काय ?" याबाबत तुकाराम महाराज म्हणतात :

**मलमूत्री जन्मला, योनिद्वारा आला। ब्राह्मण काय जन्मला– कानावाटे ।।**

याच पुस्तकात निर्माणकर्ता, पूजा, नामस्मरण, नैवेद्य अथवा अन्नदान, अनुष्ठान, स्वर्ग, स्त्रीपुरुष, पाप–पुण्य, जातिभेद, पशुपक्षादि आणि मानव प्राणी यामधील भेद नीती, तर्क, आर्यभट ब्राह्मणांचे वेद आणि सार्वजनिक ईश्वरप्रणित सत्याची तुलना, सत्य, आकाशातील ग्रह, जन्म, लग्न, सत्यपाल, स्त्री–पुरुषांचा आशीर्वाद, वर (शपथ), वधू (शपथ), दुष्टाचरण, मृत्यू, प्रार्थना, प्रेताची गती, श्राद्ध, एकंदर सर्व मानव स्त्रीपुरुषांस ग्रंथकर्त्याची प्रार्थना अशा प्रत्येक विषयावर सांगोपांग व प्रचलित कालास उपयुक्त असे विचार मांडून त्यात समाजोन्नती व धर्मोन्नती यांचे बीज मोठ्या कौशल्याने तर्कशुद्ध व शास्त्राधारे पेरले आहे. या ग्रंथासाठी वेद, श्रुती, स्मृती, पुराणे व महाराष्ट्रीय संतांचे ग्रंथ इत्यादि जोतीरावांनी धुंडाळले. या ग्रंथाकरिता त्यांनी किती श्रम घेऊन वाचन केले असेल हे पाहून या महापुरुषाच्या दीर्घोद्योगाचे व मानवहिताचे ऋण मानावे तेवढे थोडेच होणार! या ग्रंथाचे वाचन केल्यावर जोतीबांच्या महात्मेपणाची खात्री होईल. या ग्रंथात जोतीबांनी पदे, कविता व अभंग जागोजाग दिले आहेत व धार्मिक, शैक्षणिक व समाजसुधारणेबाबत माहिती दिली. इतकेच नाही तर भारताचा शेतकरी हा प्राण असून शेतकीप्रधान भारताचा शेतकरी हाच खरा अन्नदाता आहे, देशाच्या खऱ्या सुधारणेसाठी पाटबंधारे, नवीन सुधारलेली औजारे, जनावरांची जोपासना, जनावरांसाठी दवाखाने, शेतकऱ्यांसाठी जोडधंदा वगैरे उपयुक्त गोष्टींची माहिती त्या ग्रंथात दिली आहे.

## प्रकाशन व प्रकृती

**"सत्याच्या शोधासाठी होणारे परिश्रम सोसण्याची तयारी क्वचित एखाद्याच्या ठिकाणी आढळली तर आढळते. – स्वा. विवेकानंद**

ज्याप्रमाणे एखादा ध्येयवादी योगी केवळ इच्छित ध्येयासाठी देहावर उदार बनतो, देह व आत्मा हे भिन्न आहेत असे मानून देहधर्माबाबत उदास बनतो तद्वत जोतीरावांनी वाचन, लिखाण, उपदेश, सार्वजनिक कार्ये व खेडोपाडी दौरे यासाठी देहाची कधीच पर्वा केली नाही. इच्छित ध्येयासाठीच सारी तळमळ ! " **रात्रंदिन आम्हांसी युद्धाचे प्रसंग**।। या संतश्रेष्ठाच्या उक्तीप्रमाणे त्यांचे वर्तन. त्यामुळे शरीरधर्माने त्यांना ऐनवेळी दगा दिला. ते अर्धांगवायूने आजारी झाले. त्यांचे परमभक्त रावबहादूर डॉ. घोले यांनी केवळ समाजसेवा म्हणून पदरखर्चाने जोतीरावांना उपचार केले. यावेळी महाराजा सयाजीराव गायकवाड यांनीहि मदत केली. जोतीरावांचा देह ही सार्वजनिक मालमत्ता! राष्ट्रहिताची ठेव ! ती सुस्थितीत राहिली तरच समाजाचे हित होणार ! या भावनेने डॉ. घोले यांनी निष्ठेने उपचार केले जोतीरावांस आराम वाटला. परंतु त्यांचे लेखनाचे खरे साधन जो उजव हात तोच निकामी झाला. लिहिणे अशक्य झाले. अशा वेळी ह्या महात्म्या केवळ समाजकल्याणासाठी आपल्या डाव्या हाताने 'सत्य धर्म' हा महत्त्वाचा ग्रंथ लिहून पुरा केला. जगाच्या इतिहासात असले ध्येयनिष्ठेचे उदाहरण क्वचितच सापडेल. सत्य तत्त्वाच्या प्रसारासाठी जोतीरावांनी अपंग स्थितीत किती श्रम घेतले असतील याची कल्पना हा ग्रंथ वाचल्यानंतर येईल.

**"ब्राह्मण वर्ग आणि ब्राह्मण्याचे गुण ह्या वेगवेगळ्या गोष्टी आहेत."**

**– स्वा. विवेकानंद**

जोतीरावांच्या शरीरबळाबरोबरच त्यांचे द्रव्यबळहि कमी झाले. त्यामुळे हे पुस्तक छापणे त्यांना अशक्य वाटू लागले. केवळ द्रव्याअभावी जोतीरावांचा ग्रंथ प्रसिद्ध होत नाही हे पाहून जोतीबांचे खरे मित्र मोरो विठ्ठल वाळवेकर ह्या खऱ्या ब्राह्मणाने ग्रंथ छापण्यासाठी त्यांना द्रव्यबळ दिले व जोतीरावांच्या ग्रंथप्रकाशनास सुरुवात झाली. परंतु दुर्दैवाने ते प्रकाशन जोतीराव पाहू शकले नाहीत. पण वाळवेकरांचे आभार जोतीरावांनी स्वत: एका सुंदर अशा काव्यात मानले आहेत.

"सार्वजनिक सत्य धर्म पुरा केला ॥ त्यास छापण्याला ॥ द्रव्यतूट ॥
जाणूनी ही वार्ता मित्र मोरोपंते ॥ नेले छापण्याते ॥ पुस्तक हे ॥
एकोणीस शतकी ग्रंथ केला सिद्ध ॥ वाचोत प्रबुद्ध ॥ जोती म्हणे ॥

◆ ◆

स्त्रीपुरुषे सर्व कष्टकरी व्हावे ॥ कुटुंब पोसावे ॥ आनंदाने ॥
नित्य मुलांमुली शाळेत घालावे ॥ अन्नदान द्यावे ॥ विद्यार्थ्यांस ॥
सार्वभौम सत्य स्वतः आचारावे ॥ सुखे वागवावे ॥ दंगू लोकां ॥३
अशा वर्तनाने परा सुख द्याल ॥ स्वतः सुखी व्हाल ॥ जोती म्हणे ॥४॥

## श्री छत्रपती शिवाजी महाराजांचा पोवाडा

जोतीराव जसे लेखक होते तसेच सहृदय असे श्रेष्ट राष्ट्रकवी होते. त्यांनी जनजागृतीसाठी पदे, अभंग, कविता वगैरे विपुल लिखाण केले. शिवप्रभूसंबंधी त्यांच्या मनात अत्यंत आदर होता. शिवाजी महाराजांच्या रायगडावरील समाधीकडे जनतेचे लक्ष त्यांनीच प्रथम वेधले. स्वतः समाधीचे दर्शन घेतले. तिच्या दुर्दशेबाबत जनतेत जागृती केली. शिवाजी महाराजांसंबंधी जनतेस खरी माहिती व्हावी म्हणून शिवाजी महाराजांचा ऐतिहासिक सत्याच्या आधारावर सुंदरसा पोवाडा लिहिला. त्यात महाराजांचा खरा जन्मकाल सन १६२७ हाच त्यांनी विश्वसनीय म्हणून मानला. त्या पोवाड्यामुळे महाराष्ट्रात स्वातंत्र्याबाबत त्यावेळी मोठी जागृती झाली. कारण पोवाड्याचा प्रचार शाहिरांनी खेडोपाडी सर्वत्र केला.

## महाराष्ट्रातील पहिला राष्ट्रभक्त

शिव छत्रपती ही विभूती राष्ट्राची खरी स्फूर्तिदेवता ! या पुण्यपुरुषासंबंधी राष्ट्रीय दृष्टीने माहिती देऊन जनतेत स्वातंत्र्यप्रेमाची भावना निर्माण करणारे जोतीराव हेच महाराष्ट्रातील पहिले देशभक्त असतील. कारण त्यापूर्वी शिवचरित्रासंबंधी लिखाण बहुतेक आढळत नाही. शिव छत्रपतीने सुरू केलेला राजशक पेशवाई काळात मुद्दाम बंद करण्यात आला. शिवाजी महाराजांपेक्षा पेशव्यासच नाना फडणीस विशेष महत्त्व देत असे. ती राष्ट्रघातक परंपरा पेशवाईत पुढे चालणे शक्य आहे. सन १८९६ मध्ये शिवाजी महाराजांची स्वातंत्र्याची, राष्ट्रप्रेमाची दृष्टी जोतीरावांनी

महाराष्ट्रापुढे प्रथम ठेवली. त्यावेळी विष्णु कृष्ण चिपळणकर यांची निबंधमाला जन्मास सुद्धा आली नव्हती. ती तारीख २६ जानेवारी सन १८७४ ला सुरू झाली. नंतर राष्ट्रीयपणाचे बाळसे धरण्यास तिला काही दिवस गेले असतील.

श्री छत्रपती शिवाजी महाराजांचा पोवाडा जोतीरावांनी अत्यंत सुंदर असा रचला आहे. महाराजांच्या जन्मापासून एकंदर चरित्र ऐतिहासिक सत्यावर आधारले आहे. त्यांत सर्व प्रकारची माहिती त्यांनी वर्णन केली आहे. त्यांतील महत्वाचे ऐतिहासिक प्रसंग आधुनिक शिवचरित्रकारास अद्याप दाखवता आले नाहीत. पोवाडा बराच विस्तृत असून अत्यंत वाचनीय आहे. त्यात महाराजांचे धैर्य, शौर्य, युद्धकौशल्य, समयसूचकता, साहस, धाडस, प्रजाप्रेम, स्वराज्यप्रेम व धर्मनिष्ठ वगैरे गुणांची मोठ्या कौशल्याने गुंफण केली आहे. तो वाचणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे.

म. फुले यांना गोरगरिबांबद्दल जिवंत तळमळ होती. त्याचे प्रत्यंतर म्हणजे त्यांचे पुढील काव्य–

**मारवाडी भट यांच्या कसबाविषयी**

कायेपुरती लंगोटी । फिरती नांगराचे पाठी ।।१।।
एका घोंगडयावाचुनी । स्त्रियां नसे दुजे शयनी ।।२।।
ढोरामागे सर्व काळ । पोरे फिरती रानोमाळ ।। ३।।
ताक कण्या पोटभरी । धन्य म्हणे तो संसारी ।।४।।
असे वस्त्रांची कमती । एकमेकां चिकटती ।।५ ।।
सरकारी पट्टी नेट । पडे तीनशेंड्या गाठ ।।६ ।।
कर्जरोखी लिहिणे आट । निर्दय मारवाडी काट ।।७ ।।
अज्ञान्याला समजत नाही । कुलकर्ण्याने लिहिले काही ।।८।।
वकिलाची महागाई । न्यायाधीशा दया नाही ।।९।।
पाप पुण्य जेथे नाही । पैशापुरते दादा भाई ।।१०।।
नित्य जमती एके ठायी । शूद्रांची ती दाद नाही ।।११।।
राजे धर्मशील म्हणविता । आता का रे मागे घेता ।।१२।।
विद्या द्यावी पट्टीपुरती । धिःकारुनी सांगे जोती ।।१३।।

('गुलामगिरी' मधून)

## ब्राह्मणांचे कसब

सन १८६९ सालात "ब्राह्मणांचे कसब" हे काव्य जोतीबांनी लिहून प्रसिद्ध केले. पेशवाई काळातील ब्राह्मण्यमाहात्म्याचा पूर अद्याप ओसरला नव्हता. आपल्या पायाचे पाणी ब्राह्मण इतर जातींस तीर्थ म्हणून पाजून त्याद्वारे लोकांस पुण्य देत होते. ही प्रथा विसाव्या शतकाच्या सुरुवातीस सर्वत्र आढळत होती. परंतु सत्यशोधक चळवळीमुळे ती समाजातून नष्ट झाली. जोतीरावांनी आपल्या काव्यात वर्णन केलेल्या काही गोष्टी खालीलप्रमाणे आहेत:– मूल पोटात जन्मास आल्यापासून तो मृत्युच्या क्षणीसुद्धा ब्राह्मणास दान करावे लागत आहे. मृत्यूनंतर नित्योपयोगी वस्तू ब्राह्मणास दिल्या तर त्या मृत माणसास स्वर्गात पोहचतात. म्हणून ब्राह्मणास त्या वस्तूचे दान देणे वगैरे अनेक प्रसंगांच्या दानाचे फोलपणा दाखविणारे वर्णन त्यांनी केले आहे. स्वार्थसाधूंच्या कारवाया उघड करुन दाखविल्या. हे काव्याचे पुस्तक कुणबी, माळी, महार, मांग वगैरे लोकांस जोतीरावांनी अर्पण केले. यावरून पीडित व गांजलेल्या लोकांसंबधी त्यांच्या मनाचा खरा ओलावा दिसत आहे,

म. फुले यांनी १) जातिभेद विवेकसार भाग १, २ (२) शेतकऱ्यांचा आसूड भाग १, २, ३, ४ (३) इशारा भाग १,२ ३ (४) सारासार विचारसार भाग १, २, ३ (५) अखंडांजली (अभंग) (६) ब्राह्मणांचे कसब (७) मीठभाकर (निबंध) (८) गुलामगिरी (९) अस्पृश्यांची कैफियत (१०) ब्रह्मसंमधाचे चाळे (११) सत्कार विधी, (१२) शिवाजी राजा (पोवाडा), (१३) सार्वजनिक सत्यधर्म, (१४) संसारमाला मासिक (१५) थोर राजा सयाजीराव गायकवाड (१६) मंगलाष्टके व धार्मिक विधी (१७) सत्यपाळ (अभंग) (१८) तृतीय रत्न (पांच अंकी नाटक) (१९) मजूर (१ अंकी नाटिका) (२०) शेतकरी इ. पुस्तके लिहिली. (सदरची माहिती द. स. झोडगे पुणे यांच्याकडून मिळाली)

जोतीरावांनी इ. स. १८५६ मध्ये एक लहानसे नाटक लिहिले होते. त्यात त्यांनी भट–जोशी अज्ञानी शूद्रास कसे फसवितात वगैरेंबाबत लिहिले होते. ते नाटक त्यांनी दक्षिणा प्राईज कमिटीस अर्पण केले होते परंतु तिने ते नापास केले कारण तिचे सभासद ब्राह्मण होते.

### जोतीबांच्या वाङ्मयाचे वैशिष्टय

आपल्या ग्रंथात जोतीरावांनी जी तत्त्वे सांगितली त्यांना ग्रंथात न कोंडता ती समाजाच्या गळी प्रत्यक्ष उतरविण्याचे त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. धर्मसंस्थापकांनी जसे धर्मज्ञान प्रत्यक्ष स्वकृतीने अनुयायांच्या गळी उतरविले त्याचप्रमाणे जोतीरावांनी आपले विचार कृतीने समाजात पसरविले. त्यांनी देहधर्मास रजा दिली. मानापमानाचे गाठोडे गुंडाळून ठेवले. अंगीकृत कर्तव्यासाठी तीन तपांवर कडकडीत अशी तपश्चर्या केली. लिहिल्याप्रमाणे प्रत्यक्ष कृती केली. लोकापवादाची अगर रूढीधर्माची पर्वा केली नाही. नाराजी हा शब्दा उभ्या आयुष्यात त्यांच्यापुढे उभा राहिला नाही. त्यांचे लिखाण म्हणजे ध्येयनिष्ठ व सत्यनिष्ठेचा प्रत्यक्ष ठेवा आहे. शब्दाशब्दातून त्यांचे जिवंत अंतःकरण जणू उतू येत आहे. सामाजिक समतेचा पुरस्कार त्यांनी आपल्या वाङ्मयात भीतभीत केला नाही. हजारो वर्षे दृढमूल झालेल्या वर्णश्रेष्ठतेस त्यांनी आपल्या लेखणीने आग लावली. कृत्रिम उच्चनीचता गाडण्यासाठी साधार लिहिले. शास्त्रपुराणांच्या नावावर वाढणारी अंधश्रद्धा, पापपुण्य, स्वर्गनरक यांचे काल्पनिक स्वरूप नष्ट करण्यासाठी चवताळलेल्या मनाने लेखणीच्या द्वारे त्यांवर घावावर घाव घातले. सत्य धर्माचे व सत्य आचरणाचे सर्वांच्या निरंतर उपयोगी पडेल असे वाङ्मय लिहिले. स्त्रिया, शूद्रादि अतिशूद्र, पददलित व पीडलेले यांच्या उद्धारार्थ जोतीरावांनी निर्भयतेने जे स्पष्ट लिहिले, तसे स्पष्ट व तळमळीचे मानवहिताचे खरे लिखाण भारताच्या वाङ्मय–इतिहासात शोधू गेले असता सापडणार नाही. उलट काहींनी धर्मग्रंथाच्या नावाखाली वर्णाश्रमास डोके वर काढण्याची सवड दिली. सामाजिक जुलमाच्या बाबतीत हिंदूंची हृदये पाषाणासारखी कठीण झाली होती. एक अस्पृश्य वेदाचे पठण करतो म्हणून त्याला कसलाहि इशारा न देता श्री रामाने त्याचा शिरच्छेद केला, हे काम अत्यंत अन्यायाचे होते, असा विचार श्रीरामाची स्तुती करणाऱ्या कोटयवधी भक्तांपकी एकालाहि सुचला नाही ही केवढी खेदाची गोष्ट आहे. उच्चनीचतेची कल्पना चांगली समजावी म्हणून ज्ञानेश्वरांनी "**जैसा विप्रापुढे । भांग**" अशी शब्दयोजना केली. परंतु यामुळे एका जातीचा अपमान करून कृत्रिम उच्चनीचतेस ते पोषक ठरणार याचा विचार केला नाही. म. फुले यांचे लिखाण समभावासाठी आहे.

**सर्वांचा निर्मीक आहे एक धनी ।। त्याचे भय मनी।। धरा सर्व ।।१।।**
**न्यायाने वस्तूंचा उपभोग घ्यावा ।। आनंद करावा ।। भांडू नये ।।२।।**
**धर्म राज्य भेद मानवा नसावे ।। सत्याते वर्तावे ।। ईशासाठी ।।३।।**
**सर्व सुखी व्हावे हे मी मागतो ।। मनुजा सांगतो ।।जोती म्हणे ।।४।।**

सर्व मानव प्राण्यांचा निर्माता परमेश्वर एकच आहे. त्याचे अस्तित्व मानणे हे मनुष्याचे परम कर्तव्य आहे. सत्य व सत्याचरण हेच देवाला प्रिय आहेत असे जोतीराव समाजास आग्रहाने सांगत. देवास सर्व समसमान आहे असे ते म्हणत.

## मामा परमानंद व जोतीराव

"मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड' या पुस्तकातील माहितीवरून जोतीरावांनी तारीख २ जून १८८६ या दिवशी नारायण माधवराव परमानंद मु. वांद्रे यांना पत्र लिहिले. त्याबाबत त्या पुस्तकाचे लेखक सांगत आहेत. "मामा परमानंद यांना जोतीरावाने पाठविलेले पत्र संग्रही आहे. ते मोडीत असून जोतीरावांचे अक्षर अत्यंत सुंदर आहे. पत्रास कारण मुंबई आन्थ्रॉपॉलॉजिकल सोसायटीचे उपाध्यक्ष एच्. ए. अॅक्वर्थ यांना ऐतिहासिक पोवाडे जमविण्याचा छंद होता. तो त्यांच्या आवडीचा विषय होता. छत्रपती शिवाजी महाराज यांच्याबद्दल जोतीबास असलेल्या आत्यंतिक आदराची मामांना चांगली कल्पना होती. शिवाय त्यांनी छत्रपती शिवाजी महाराज यांच्यावर एक पोवाडा रचला होता. मामांनी पोवाड्याच्या बाबत विचारलेल्या माहितीसंबंधाने खुलासा करणारे जोतीबांनी त्यांस जे पत्र पाठविले ते पुढीलप्रमाणे होते. त्यातील काही भाग:-

"फितुरी गोपीनाथ पंताच्या साहाय्याने शिवाजीने दगा करून अफजुलखानाचा वध केला, तान्हाजी मालुसऱ्याने घोरपडीच्या साहाय्याने सिंहगड किल्ला काबीज केला व शिवाजीने पुण्यात दरवडा घालून मुसलमान लोकांस कापून काढले- या सर्व कच्च्या हकीगतीचे खरे पोवाडे माझ्या पहाण्यात आले नाहीत. आज दिनपावेतो युरोपियन लोकांनी काही इतिहास तयार केले आहेत. ते सर्व शूद्र आणि अतिशूद्रांची स्थिती ताडून न पहाता केवळ डोळे झाकून आर्यभट ब्राह्मणाच्या ग्रंथांवर व भट कामगारांच्या सांगण्यावर भरवसा ठेवून इतिहास तयार केले आहेत. व अलीकडे भट-ब्राह्मणांची

विद्वान पोरे वगैरे नवीन पवाडे करून मैदानात आणीत आहेत. त्यांपैकी माझे पहाण्यातहि बरेच आले आहेत. आणि त्यातील शूद्रांनी कमाविलेल्या मोत्यापोवळ्यांचा चुरा करणारे भगवती गोब्राह्मणांसह दादोजी कोंडदेवास फाजील अंगातुकी करावयास लावल्यामुळे तसल्या बनावट पोवाड्यांचा मी संचय केला नाही. ''

" आठ वर्षांपूर्वी मी मुंबईत आपल्या घरी भेटावयास आलो होतो. तेव्हा पाचगणीचे राम पाटील यासमक्ष आपल्या शूद्र शेतकऱ्यांच दीनवाण्या स्थितीचा काही देखावा जगापुढे आणणार म्हणून कबूल केले होते. त्याप्रमाणे त्या देखाव्याचे ' आसूड ' या नावाने तीन वर्षांपूर्वी एक पुस्तक तयार केले व त्याची एक एक प्रत आपले कलकत्याचे गव्हर्नर जनरल साहेब व श्रीमान महाराज बडोद्याचे गायकवाड सरकारांस पाठविल्या आहेत. आम्हा शूद्रात भेकड ×× छापखानेवाले असल्यामुळे ते पुस्तक छापून काढायचे काम तूर्त एका बाजूस ठेवले आहे. 'आसूड'ची प्रत आपल्यास पहाण्याकरता पाहिजे असल्यास त्याप्रमाणे लिहून आल्याबरोबर त्याची नक्कल करावयास लेखक बसवितो. नक्कल होण्यास सुमारे एक दोन महिने लागतील असा आदमास आहे. कळावे लोभ असावा हो विनंती. ''

इंग्रज इतिहासकारास दोष देण्यात येतो. परंतु जोतीरावांनी सत्य गोष्टींवर प्रकाश टाकला. छत्रपती शिवाजी महाराज निरक्षर होते व दरोडेखोर होते हे जे इंग्रज इतिहासकारांनी लिहिले याचे कारण तशी माहिती आमच्यातील वरिष्ट म्हणविणाऱ्या लोकांनी त्यांना जाणून बुजून सांगणे शक्य आहे. त्यामुळे त्यांनी ऐतिहासिक लिखाण विद्रूप स्वरूपात केले त्यामुळे इंग्रज लेखकांना दोष देता येत नाही. पुण्यात इंग्रजांचे राज्य येऊन साठ पासष्ठ वर्षे झाली होती. तरी पेशवाईचे स्वरूप तेथे जागृत होते. कारण बहुजनसमाजातील छापखान्याचे मालकसुद्धा जोतीरावांचे ' आसूड ' हे पुस्तक छापण्यास तयार नव्हते. यावरून जोतीरावांस आपले सर्व इच्छित कार्य कोणत्या कठीण परिस्थितीत करावे लागले असेल याची कल्पना येते. सर्व प्रकारच्या प्रतिकूल परिस्थितीस न जुमानता जोतीरावांनी असले वाङमय समाजोद्धाराच्या उघड्या स्वरूपात मांडले. निर्मळ सत्यासाठी व निर्भयतेने केवळ जनहितासाठी लिहिणारे फक्त महात्मा जोतीबाच !



भारतभूषण राष्ट्रसंत तुकडोजी महाराज



म.फुले व म.गांधी यांच्या ध्येयानुसार भारतभर धार्मिक व सामाजिक जागृती आणि मानवता धर्माचा प्रसार.

दानशूर जयरामभाई डायाभाई चौहाण (बिटको)



महात्म्यांच्या तत्त्वानुसार शिक्षणप्रसार व धर्मकार्यास उदार मदत. जगद्गुरू शंकराचार्य (द्वारका) यांच्याकडून 'धर्मधुरंधर' पदवी.

डॉ. दादासाहेब घोगरे



पद्मभूषण कै. भाऊराव पाटील



कै. भाऊसाहेब हिरे



म. फुले यांच्या तत्त्वानुसार या कर्मवीर त्रिमूर्तींनी व अनेक समाजोद्धारकांनी महाराष्ट्रभर शिक्षणप्रसार केला.

## प्रकरण नववे

# सत्यशोधक समाज व चिपळूणकर

" केवळ सत्याच्या प्रचारासाठी चौदा वर्षे एकसारखी मेहनत तुम्ही घेतलीत तर तुमच्या वचनावर लोकांचा खास भरवसा बसेल. यामुळे सामान्य जनतेवर तुम्ही मोठे उपकार कराल. " – स्वा. विवेकानंद

जोतीरावांनी समाजसुधारणेसाठी सुखी जीव दुःखात घातला, नानाविध दुःखांस त्यांनी होऊन आमंत्रण दिले. आलेले कठीण प्रसंग त्यांनी धैर्याने सहन केले. समाजसेवेच्या पुण्यप्राप्तीस्तव जन्मदाता, घरदार, आप्त-स्वकीय यांचा त्याग केला व विरोधकांस तोंड देण्याचे धैर्य दाखविले हीच जोतीरावांची तपश्चर्या ! त्यामुळेच समाजाचे ते उद्धारकर्ते बनले. जनतेचे नेतृत्व त्यांच्याकडे येऊ लागले. त्यांच्या शब्दावर व कृतीवर समाजाचा भरवसा बसू लागला. जनहितासाठी निर्भयपणे ते सत्य सांगत असत.

### सन १८५७ चे बंड

सन १८५७ चे बंड हे स्वातंत्र्ययुद्ध होते, असे काही म्हणतात. तर काही तज्ज्ञ म्हणतात त्या बंडास ध्येय नव्हते. या बंडाबाबत जोतीराव म्हणतात, " देवाजीने शूद्रादींवर दया करून इंग्रज बहाद्दराच्या हातून भटनानाचे बंड मोडविले म्हणोन बरे झाले. नाहीतर त्या शादावलाच्या पुढल्या लिंगापुढे रुद्र करणाऱ्या सुधारलेल्या भटांनी आजपावेतो कित्येक महारांस एकेरी धोतर नेसल्यामुळे अथवा कीर्तनामध्ये संस्कृत श्लोकांचा उच्चार केल्यामुळे काळे पाणी दाखविले असते. " 'माझा प्रवास' अथवा '१८५७ सालच्या बंडाची हकिगत' या पुस्तकावरून : " शत्रुक्षय व्हावा व राज्य सुरक्षित रहावे या हेतूने बाईसाहेबांनी (लक्ष्मीबाई झाशी) अनेक अनुष्ठाने चालू केली होती. महालक्ष्मीस रोज नवचंडी सुरू होती. ग्रहाबद्दल जप व दाने सुरू होती. गणपती देवालयात रोज अथर्वशीर्षाची सहस्त्र आवर्तने होत; अनुष्ठानासंबंधी दररोज ब्राह्मणभोजने होत किल्ल्यात साहेब लोक शिरले होते म्हणून तेथील भुया नवीन करवून

व गोमूत्राने सर्व किल्ला शुद्ध करवून बाईसाहेब सुमुहूर्तावर तेथे रहावयास गेल्या." बंडासंबंधी ग्वाल्हेरची हकिगत: "तात्या टोपे आणि (पेशवे) श्रीमंतांस (लक्ष्मीबाईने) निरोप पाठविला की आपण यावे. वाड्यात काही एक कपट नाही. तेव्हा रावसाहेब मोठ्या थाटाने शहरात येऊन हळू हळू बाजारातून वाड्यात आले. शिंदे सरकारचे कारभारी, कारकून वगैरे भेटले. त्यांस श्रीमंतांनी (पेशवे) सांगितले की, आम्हांस येथे ब्राह्मणभोजन करणे आहे. तेव्हा उद्यापासून येथे मुक्तद्वार भोजनाचा बंदोबस्त करावा. बेसनाचे लाडू पक्वान्न करुन पात्री एक रुपया दक्षणा द्यावी. असे आम्ही येथे आहे तोपर्यंत चालले पाहिजे.' तेव्हा वाकनिस वगैरेंनी 'महाराज हुकूम करतात, त्याप्रमाणे सर्व सिद्धता आहे. बंदोबस्त करतो' म्हणून सांगितले आणि दुसरे दिवसापासून मुक्तद्वार सुरू केले. दर पात्रास रुपया दक्षणा मिळू लागली... ...श्रीमंत ग्वाल्हेरीस आठरा दिवस होते. मुक्तद्वार सुरू होते... मुक्तद्वारात ब्राह्मणभोजनाची धांदल उडून गेली, उदक सुटून ब्राह्मण भोजनास बसले होते. काही ठिकाणी दक्षणा ठेवली होती. काही ठिकाणी नव्हती. तीच भयाचे योगाने ब्राह्मण पात्रे टाकून उठून गेले. एकहि मनुष्य तेथे राहिला नाही." सत्तावन्न सालचे बंड यशस्वी झाले असते तर दुसऱ्या बाजीरावा-प्रमाणे सर्वत्र ब्राह्मण्य माजून त्याचा पूर देशभर वाहू लागला असता व ब्राह्मणभोजनासाठीच जनतेचा सर्व पैसा पेशवाईप्रमाणेच खर्ची पडला असता. जोतीरावांनी बंडाबद्दल वरीलप्रमाणे उद्गार काढले म्हणून त्यांच्यावर काही जण रागावत आहेत. परंतु रावसाहेब मंडलीक यांनी बंडखोरांस दोष तर दिलाच परंतु इंग्रजांची स्तुती केली त्याबाबत मात्र त्यांना फारसा दोष कोणी देत नाही. 'त्रिमूर्तिदर्शन' अथवा सदाशिव गोवंडे चरित्रावरून: "स्वातंत्र्ययुद्धाचे म्हणजे १८५७चे बंडाचे वेळी पुण्यात काही मुसलमानांनी पुढे यावे, एखाद्या गणू माळ्याने पुढे यावे व असंख्य ब्राह्मण 'वीरांनी' घरात बसून राहावे ही गोष्ट वाचून तात्याराव सावरकरांना खेद होईल यात शंका नाही." उत्तर हिंदुस्तानात बंड धगधगत होते. त्याच्या ज्वाला सर्वत्र पसरत होत्या. अशा वेळी पेशव्यांची राजधानी जे पुणे शहर हे मात्र शांत होते. फक्त महात्मा फुले यांना नावे ठेवण्यासाठी देशभक्तीचे उसने सोंग घेतलेले काही ब्राह्मण आजहि महात्मा फुले यांना बंडाबद्दल काढलेल्या उद्गारांबद्दल दोष देत आहेत.

## सत्यशोधक समाजाची स्थापना

"हिंदू लोकांनो आता उठा, आणि पुरुषासारखे काही तरी वागा. उन्नतीच्या आड येणाऱ्या भिक्षुकवर्गाची प्रथम हकालपट्टी करा, कारण हा वर्ग सुधारण्याची आशा नको. त्याची सुरकतलेली अंतःकरणे पुनः विस्तार पावण्याची आशा आता मुळीच राहिलेली नाही. शेकडो वर्षांच्या धर्मवेडाने आणि सामाजिक जुलमाने हा भिक्षुक वर्ग आता पुरा मठ्ठ बनून गेला आहे. याकरिता या वर्गाचे पुरे उच्चाटन करणे हेच प्रथम जरुरीचे आहे."

– स्वा. विवेकानंद

हिंदू धर्माचे सारसर्वस्व ग्रंथात गुंडाळून देवाचे देवपणाचे स्थान ब्राह्मणांनी स्वतः बळकावले. ते 'भूदेव' म्हणून मिरवू लागले. ब्राह्मणाची सेवा म्हणजे देवाची सेवा! ब्राह्मणाच्या मुखात घातले तर प्रत्यक्ष देवाच्या तोंडात ते पडते. अशी समाजाची सर्वत्र भावना केली गेली होती. त्यामुळे सत्य सनातन धर्माची तत्त्वे बाजूस राहून ब्राह्मणी धर्माचे प्राबल्य सर्वत्र पसरले होते. यासाठी जोतीरावांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली.

तारीख २४ सप्टेंबर सन १८७३ रोजी सत्यशोधक समाजाची स्थापना पुणे येथे झाली. सुरवातीस साठ लोक हजर होते. समाजाच्या उद्देशांबाबत जोतीरावांचे मार्गदर्शनपर भाषण झाले. सभासद होणारांनी प्रथम खंडेराव या दैवताची शपथ घेऊन नंतर समाजमताचा स्वीकार करावा असे जोतीरावांनी सांगितले. त्याप्रमाणे जमलेल्या लोकांनी शपथा घेतल्या. नंतर समाजाची स्थापना झाल्याचे जाहीर करण्यात आले. आणि त्याचे कार्य पुणे शहरात सुरू झाले. नंतर त्याच्या शाखा महाराष्ट्राभर सर्वत्र पसरल्या.

## सत्यशोधक समाजाचे सुरवातीचे ब्राह्मण सभासद

सखाराम यशवंत परांजपे, सदाशिवराव गोवंडे, विनायक बापूजी भांडारकर, शिवराम सखाराम दातार, वाळवेकर वगैरे ब्राह्मण सत्यशोधक समाजाचे सुरवातीचे सभासद होते. त्यांच्याशिवाय अनेक नामवंत विद्वान सभासद बनले. सभासदांची संख्या लवकरच तीनशेवर गेली. ब्राह्मण्याचा नकली बागुलबोवा दूर करण्यासाठी किंवा ब्राह्मणांच्या गुलामगिरीतून मुक्त करण्याकरिता व सत्य सनातन धर्माची तत्त्वे सर्वसामान्य लोकास समजावून सांगण्यासाठी या समाजाची स्थापना झाली.

**सत्यशोधक समाजाची तत्त्वे**

१) ईश्वर एक असून तो सर्वव्यापी, निर्गुण, निराकार व सत्स्वरूप आहे व सर्व मनुष्यप्राणी त्याची प्रिय लेकरे आहेत.

२) ईश्वराची भक्ती करण्याचा प्रत्येक मानवास पूर्ण अधिकार आहे. आईस संतुष्ट करण्यास अगर बापास विनविण्यास जशी मध्यस्थ दलालाची जरुरी नसते त्याप्रमाणे सर्वसाक्षी परमेश्वराची भक्ती करण्यास भट-दलालाची आवश्यकता नाही.

३) मनुष्य जातीने श्रेष्ठ ठरत नसून तो गुणाने श्रेष्ठ ठरतो.

४) कोणताहि ग्रंथ सर्वस्वी प्रमाण व ईश्वरप्रणित नाही.

५) परमेश्वर सावयवरूपाने अवतार घेत नाही.

६) पुनर्जन्म, कर्मकांड, जपतप या गोष्टी अज्ञानमूलक आहेत.

"ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादिक लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकास मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्र लोकांस नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत यास्तव सदुपदेश व विद्याद्वारे त्यास त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधी ब्राह्मणांचे बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यांस मुक्त करण्याकरिता काही सूज्ञ व शूद्र मंडळींनी हा समाज ता. २४ माहे सप्टेंबर सन १८७३ इसवी रोजी स्थापन केला. या समाजात राजकीय विषयावर बोलणे अजी वर्ज आहे."

आपल्या 'सार्वजनिक सत्यधर्म' या संवादात्मक पुस्तकात म. फुले यांनी मानवता आणि धर्म यासंबंधी असे विचार व्यक्त केलेले होते की—

"आपल्या सर्वांच्या निर्माणकर्त्याने एकंदर सर्व स्त्रियांस अगर पुरुषांस एकंदर सर्व मानवी हक्कांविषयी आपले पाहिजे तसे विचार, आपली पाहिजेत तशी मते बोलून दाखविण्यास, लिहिण्यास आणि प्रसिद्ध करण्यास स्वतंत्रता दिली आहे. परंतु ज्या विचारांपासून व मतांपासून कोणत्याहि व्यक्तीचे कोणत्याच तऱ्हेचे नुकसान मात्र होऊ नये म्हणून जे खबरदारी ठेवतात, त्यांनाच सत्य वर्तन करणारे म्हणावे.

"स्त्री अथवा पुरुष जे आपल्या सर्वांच्या निर्मिकाने निर्माण केलेल्या प्राणिमात्रांपैकी मानव स्त्री–पुरुषांमध्ये कोणत्याहि तऱ्हेची आवड न करता

रावांचे भाषण होत असे. नवीन सभासद करून घेतांना त्याच्या हाती बेलभंडार देऊन त्यास सभासद करून घेतले जाई.

## सत्यशोधक झेंड्याची मिरवणूक

स्वराज्यप्राप्तीनंतर शिवप्रभूंच्या राष्ट्रझेंड्याची (जरीपटका) मिरवणूक ज्या डौलाने व आत्मविश्वासाने निघत असेल तद्वत सत्यशोधक समाजाच्या झेंड्याची मिरवणूक समता व समभाव यांचे दर्शक म्हणून सन १८८५ च्या गुढीपाडव्यास निघाली. झेंडा दोन स्वयंवकांनी धरला होता. मिरवणुकीत जोतीराव, न्या. मू. रानडे, भालेकर, घोरपडे, ठोसर, नेरकर वगैरे असून बहुजनसमाजाचा ओघ मिरवणूकीत सारखा वाढत होता. सभास्थानी जोतीराव यांचे भाषण झाले. मिरवणूकीमुळे पुणे शहरात नवविचारांचे चैतन्य उत्पन्न झाले. झेंड्याची हीच पहिली मिरवणूक. त्यांत काही वर्षांनी कॉंग्रेसच्या झेंड्याची मिरवणूक निघू लागली. जेणेकरून समज जागृत होईल अशा निरनिराळ्या गोष्टी जोतीराव करीत असत.

## रूढीस आश्चर्यकारक धक्का

**"धर्मज्ञानाचा मक्ता आजपर्यंत ब्राह्मणांनी आपल्या हाती ठेवला होता. पण कालचक्राच्या लाटेपुढे त्यांना तग धरवेना." – स्वा. विवेकानंद**

समाजाला धार्मिक व सामाजिक सत्य दृष्टी देणे हे जोतीरावांचे व्रत! लग्नविधीसारख्या धार्मिक समारंभात ब्राह्मण पुरोहित काहीतरी म्हणत व लग्न लावीत. विसाव्या शतकाच्या सुरवातीस शाळेतील कविता म्हणून ब्राह्मणांची मुले लग्न लावीत असत. ही सत्य स्थिती आचार्य अत्रे यांनी एका सभेत सांगितली. लग्नविधीसाठी जोतीरावांनी स्वतः मंगलाष्टके तयार केली होती. ह्यातील वैशिष्ट्य म्हणजे वधूवरांस ती प्रतिज्ञादर्शक आहेत. ब्राह्मणांच्या हातूनच लग्नविधी झाला पाहिजे ही रूढी नष्ट करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. जुन्नर भाग सत्यशोधकांचा बालेकिल्ला होता. त्या भागातील बाळाजी केशवजी पाटील या सत्यशोधकाने आपल्या मुलाचा विवाह ब्राह्मणाशिवाय (पुरोहित) लाविला. महाराष्ट्राभर खळबळ उडाली. भटजींच्या हक्कासाठी राजकारणी, सनातनी व समाजसुधारक ब्राह्मण एक झाले. त्यांनीसर्व प्रकारे ओरड केली. शेवटी त्या गावच्या ग्रामजोश्यास उत्तेजन दिले. खर्चाची तरतूद केली व त्याला पाटलावर पुणे सब–जज्ज

कोर्टात दावा लावण्यास सांगितले आणि लग्न लावण्याचा ब्राह्मणाचा हक्क नष्ट केला व लग्नातील मिळणारी दक्षणा बुडाली म्हणून नुकसान–भरपाई मिळावी या दोन मुद्यांवर पुणे सब–जज्ज कोर्टात दावा दाखल झाला. सत्य-शोधक समाजास यावेळी वकील मिळाला नाही. सब-जज्ज ब्राह्मण होते. त्यांनी भटजीच्या बाजूने निकाल दिला. सत्यशोधकांनी फर्स्टक्लास सब–जज्ज कोर्टात अपील केले. जज्ज खानबहादूर एम्. एन्. नानावटी होते. त्यांनी खालच्या कोर्टाचा निकाल आमूलाग्र फिरविला. भटजीने मुंबई हायकोर्टात अपील केले. जोतीरावांनी युरोपिअन बरिस्टर दिला. त्याला हिंदू धर्माच्या ग्रंथांचे अनेक अनुकूल आधार दाखविले. या कामी त्यांनी प्रयत्नांची परा काष्ठा केली. हायकोर्टाने खालच्या कोर्टाचा निकाल मान्य केला. ब्राह्मण पुरोहिताशिवाय दुसऱ्या जातीच्या लोकांस लग्न लावता येते व लग्न न लावता दक्षणा (मजुरी) मागता येत नाही असा हायकोर्टाने निकाल दिला. या कायदेशीर निकालामुळे महाराष्ट्रास नवीन धार्मिक दृष्टी मिळाली धर्माच्या नावावर होणारा जुलूम बंद झाला. ब्राह्मणांचे नकली श्रेष्ठपण नष्ट झाले. जोतीरावांच्या या कृत्यास त्यावेळी सर्वत्र ब्राह्मणांनी कसून विरोध केला. भटजीस सर्व प्रकारे साह्य केले. धर्म बुडाला म्हणून ठराविक ओरड केली. परंतु आजकाल ब्राह्मण समाजातील काही लोक लग्नातील धार्मिक विधीस फाटा देऊन ब्राह्मण पुरोहिताऐवजी [रजिस्ट्रारसमोर शपथ घेऊन रजिस्टर पद्धतीने लग्ने करीत आहेत. त्या सर्वस्वी प्रतिकूल काळात जोतीरावांनी सुचविलेल्या सामाजिक व धार्मिक सुधारणांचा अवलंब ब्राह्मण समाज आज प्रामुख्याने करीत आहे. परंतु जोतीरावांचे नाव निघतांच काही कावरे बावरे मात्र होतात !

## भारतातील पहिले बालहत्या प्रतिबंधक गृह

**"जिवंत देवाची सेवा करण्याहून अधिक मोठा असा दुसरा धर्म नाही." – स्वा. विवेकानंद**

ब्राह्मण समाजाने धर्माच्या नावावर व शास्त्राच्या आधारावर विध-वांच्या विवाहास बंदी करण्याचा समाजघातकी प्रयत्न केला. त्याचे अनुकरण इतर काही जातींनी केले. त्यामुळे कामवासनेस बळी पडलेल्या **विधवांच्या**

पोटी जन्मलेले जीव नाहक बळी पडतात. अशांचा संहार किती मोठ्या प्रमाणावर होत असेल याची कल्पना करवत नाही. विधवाविवाह सुरू असता तर असला अनर्थ गुदरला नसता. याबाबत लोकहितवादी सांगत आहेत—"पूर्वी परशुराम भाऊ पटवर्धन यांची मुलगी विधवा झाली. तेव्हा त्यांनी मार्तंड वगैरे पुस्तकातून असे ठरविले की पुनर्विवाह करावा. परंतु राज्यात नाना फडणवीस मोठे शहाणे होते. त्यांनी त्यास विघ्न केले. आणि सांगितले की तुम्ही असे करू नका. कारण एकाने केले म्हणजे सर्व करतील. तेव्हा ते सिद्धीस गेले नाही. ही गोष्ट केव्हाही झाली. तथापि त्याचे लोक वर्णन करितात आणि सांगतात की, पानशे हे तोफखान्यावरील सरदार होते. त्यांचे घरी सत्तावन्न बोडक्या होत्या. हे मोठे शहाणपण समजतात परंतु मला वाटते हा मोठा अनर्थ आणि मनुष्ययज्ञ होय." नाना फडणवीस हे विधवांच्या विवाहास विरोध करतात. परंतु त्यांनी स्वतःची सात लग्ने केली होती असा उल्लेख आहे. शेवटचे लग्न केले त्यावेळी त्यांच्या बायकोचे वय नऊ वर्षांचे होते. त्याबाबत लोक म्हणत, 'औरत आयेगी उमरमे ! तो नाना जाईंगे कबरमें.' अशा नाना फडणवीसास लोक शहाणा व मुत्सद्दी म्हणतात. परशुरामभाऊंच्या म्हणण्यास त्यांनी मोडता घातला नसता तर असंख्य विधवांस प्राणत्याग करण्याचा प्रसंग आला नसता किंवा त्यांच्या पोटी येणाऱ्या बालकांचा अमानुष रीतीने संहार झाला नसता.

पोटात जन्मलेल्या दुर्दैवी बालकास व स्वतःस या अन्यायी व जुलमी हिंदू समाजाचे तोंड पाहण्याचा दुर्धर प्रसंग येऊ नये म्हणून काशीबाई या नावाची बालविधवा ब्राह्मण बाई नदीकाठाने भयंकर अशा काळोखातून जात होती. तो रात्रीचा दहा अकरा वाजण्याचा सुमार असेल. अशा वेळी दैववशात ती जोतीरावांच्या नजरेस पडली. येवढ्या रात्री ही बाई एकटी कोठे जात असेल या विचाराने जोतीरावांनी तिला थांबवून तिची विचारपूस केली. वैतागलेल्या मनाने व विधवांवर होणाऱ्या उघड्या जुलमी अन्यायाने ती अंतरीच्या बोलाने धीटपणे, स्पष्ट बोलू लागली:

"विधवेच्या पोटी अनैतिक रीतीने जन्मास आलेला दुर्दैवी जीव हा या पापी जगात बहुतकरून जिवंत रहात नाहीच, परंतु प्रसंगी तो आपल्या आईसहि या अन्यायी जगातून आपल्या बरोबर घेऊन जात

असतो. त्याप्रमाणे मी जगातून नष्ट होण्यास जात आहे." तिच्या त्या प्रखर उद्‌गारांमुळे जोतीरावांचे संतहृदय कळवळून जागृत झाले. पितृ-वात्सल्याच्या ओलाव्याने तिला त्यांनी धीर दिला व उपदेश केला. आणि तिच्या हेतूपासून तिला परावृत्त केले. व स्वतःच्या घरी घेऊन आले. सावित्रीबाईंस जोतीरावांनी हाक मारून सांगितले, "देवाने ही मुलगी आपणांस दिली आहे. तिचा सर्व प्रकारे नीट सांभाळ कर." सावित्रीबाई ही प्रत्यक्ष धर्मदेवता! तिने मुलीची एकंदर हकिगत ऐकून तिला धीर दिला व सांगितले 'मी तुला प्रत्यक्ष मुलीप्रमाणे सांभाळीन.' हल्लीच्या सुधारलेल्या काळातसुद्धा अशा प्रकारच्या दुर्दैवी विधवेस आश्रय देणारी सुशिक्षित व समाज-सेविका म्हणविणारी स्त्री मिळणे अशक्य! मग त्या शंभर वर्षांपूर्वीच्या काळात रूढीने बरबटलेल्या समाजाच्या अनिष्ट चालीरीतींस झुगारून देऊन त्या मुलीस उघड आश्रय देणे हे असामान्य धैर्य! ह्याच काशीबाईच्या पोटी जन्म-लेला 'यशवंत' ह्यास जोतीरावांनी दत्तक घेऊन त्यास आपला वारस ठरविला.

### नैतिक धैर्य

**"आपल्या समाजात वैवाहिक पावित्र्य अधिक राहावे म्हणून हिंदूंनी बालविवाह सुरू केले पण यामुळे अखेरीस ते अधोगतीस गेले."**

**– स्वा. विवेकानंद.**

काशीबाईस घरी आणल्यानंतर दुसरेच दिवशी जोतीरावांनी जाहीर निवेदन केले: "जी कोणी दुर्दैवी विधवा नैसर्गिक कामवासनेस बळी पडून गरोदर राहिली असेल तिने स्वतःच्या देहाचा अगर बालकाचा नाश न करता माझ्या घराचा आश्रय घेणे. बाळंत झाल्यावर इच्छेनुरूप तिला इज्जतीने परत जाता येईल."

असले नैतिक व धार्मिक धैर्य भारतात प्रथम जोतीरावानेच प्रगट केले. त्यापूर्वी याबाबत नुसते शाब्दिक बोलण्याचे धैर्यसुद्धा कोणी दाखविल्याचे आढळणार नाही. स्वतःच्या घरात बालहत्या प्रतिबंधक गृह जोतीबांनी सुरू केले. हेच अखिल भारतात पहिले बालहत्या प्रतिबंधक गृह!

### प्राणाचे मोल देण्याचा प्रसंग

**"आपल्या कर्तव्यासाठी मान तोडून ठेवण्याची ज्याची तयारी असेल तोच पुढारी होऊ शकतो." – स्वा. विवेकानंद**

ज्या थोर महात्म्यांनी धार्मिक व सामाजिक क्रांती केली आणि मानवी हिताचे खरे मार्ग जनतेस दाखविले. आणि सत्य धर्माचे दरवाजे मानवासाठी उघडले अशा कित्येकांना आपले प्राण गमवावे लागले. तर काहींना मरण्याच्या दारात उभे रहाण्याचे प्रसंग आले. त्यांपैकी कोणत्या तरी एका बाबतीत जोतीरावांना अडकविण्याचे समाजकंटकांनी ठरविले कारण शास्त्राज्ञेस पायाखाली तुडविण्याचे जणू व्रतच जोतीरावांनी घेतले. 'स्त्रीजात ही अगोदरच नीच वृत्तीची असते. त्यातून विधवांच्या पापास तो उघड उघड उत्तेजन देत आहे. त्याने बालहत्या प्रतिबंधक गृह काढले. विधवांच्या प्रत्यक्ष पापाचे अनेक पुरावे त्या पापगृहात जिवंत आहेत. त्यांचा जिवंतपणा पाहणे हे आमच्या श्रेष्ट अशा धर्मास कमीपणा आणणारे कृत्य आहे. असल्या पापास राजरोस उत्तेजन देणारा जोतीराव यालाच प्रथम जगातून नष्ट केले पाहिजे.' या दुष्ट विचाराने कर्मठांनी दोन मारेकरी तयार केले. प्रत्येकी हजाराचे त्यांना आमिष दाखविले. जोतीरावाचा, नव्हे तर प्रत्यक्ष दयाधर्माचा प्राण घेण्यासाठी एका रात्री त्या मारेकऱ्यांना पाठविले. महात्म्याच्या व्रताने त्या अनाथ बालकांचा सर्व प्रकारे सांभाळ जोतीराव रात्रंदिवस करीत होते. जिवंत मनाने त्या धर्मकार्यात सावित्रीबाई सर्व प्रकारे लक्ष घालीत होत्या.

जोतीरावांचा प्राण घेण्यासाठी मध्यरात्री मारेकऱ्यांनी घरात प्रवेश करताच एका तान्ह्या बालकाने भयंकर रडण्याच्या स्वरुपात आरोळी मारली त्यामुळे जोतीराव जागे झाले. व त्याच्या पाळण्याकडे जाऊ लागले. त्या अनाथ बालकाने मारलेल्या किंकाळीमुळे मारेकऱ्यांचे राक्षसी मन विरघळले. व त्यांची पावले बेसावधपणे पडू लागली. माणसाच्या पावलांचा आवाज जोतीरावास आला. हातातील दिव्याची वात सरसाविली तोच दोन यमदूत त्यांना दिसले. एवढ्या अपरात्री येण्याचे कारण त्यांना विचारताच ते आपला मूळ स्वभाव विसरले. सत्य सांगण्यास त्यांनी सुरुवात केली. "तुमचा खून केला तर आम्हांस दोन हजार रुपये मिळणार आहेत." जोतीराव लगेच म्हणाले, "गरीबांसाठीच माझा हा देह आहे. केवळ माझ्या मरण्याने जर गरीबांचे कल्याण असेल होत तर माझी ही मान तुमच्यापुढे तयार आहे."

मारेकऱ्यांनी आपल्या हातातील शस्त्रे खाली टाकली. जोतीरावांच्या पायांवर त्यांनी लोळण घेतली व ते पश्चाताप करू लागले. **"आपणांसारखे करिती तत्काळ। न लागे तया काळ वेळ॥"** जोतीरावांनी त्यांना अभय दिले. त्यापकी एक धोंडीराम कुंभार असून दुसरा रोडे या नावाचा रामोशी होता. ते उभयता जोतीरावाचे परम भक्त त्याच वेळी बनले. रात्रीच्या शाळेत त्यांना जोतीराव शिक्षण देऊ लागले. आजच्या सुधारणेच्या काळातील प्रौढांच्या रात्रीच्या शाळांची सुरुवातही जोतीरावांनी त्या काळी केली होती हे लक्षात येईल. धोंडीराम हा बुद्धीने विशेष हुषार होता. त्याला संस्कत शिक्षणासाठी जोतीरावांनी काशीस पाठविले. तेथे संस्कृतचा तो पंडित बनला. 'वेदाचार' या नावाचा त्याने संस्कृतमध्ये ग्रंथ लिहिला. शंकराचार्यांशी त्याने अनेकदा वादविवाद केले. रोडे हा जोतीरावांचा कायमचा शरीररक्षक बनला. 'दयाधर्मका मूल है' हे हिंदु धर्माचे सारसर्वस्व असे श्रेष्ठ तत्व फक्त ग्रथांत कोंडले गेले होते. शाब्दिक उपदेश करतांना संतमहंतांच्या तोंडात नित्यही भिजत असे परंतु या महान नावाचे प्रत्यक्ष कृतीने आचरण करून ते हिंदूंच्या गळी उतरविणारे भारतात पहिले महात्मा फुले हेच होत !

## विष्णुशास्त्री चिपळूणकर

**"अनेक युगांच्या संस्कृतीची ठेव ब्राह्मण वर्गापाशी आहे. आणि त्यातील भाग आता त्याने सामान्य लोकांस दिला पाहिजे. ही ठेव ब्राह्मण वर्ग आजपर्यंत कृपणपणाने दडपून बसल्यामुळे हिंदुस्थानावर मुसलमानी राज्य होणे शक्य झाले. आज हजारो वर्षे कोणत्याहि जेत्यापुढे आम्हांस मान वाकवावी लागली, याचेंहि कारण हेच आहे की या ठेवीचा उपयोग सामान्य लोकास न होता ही फक्त एकाच वर्गाच्या ताब्यात आहे."–स्वा. विवेकानंद**

हिंदू संस्कृतीवर चढलेला ब्राह्मण्याचा व वर्णश्रेष्टतेचा गंज झाडण्याचे कार्य प्रथम जोतीरावांनीच केले. यामुळे चिपळूणकर त्वेषाने त्यांच्यावर तुटून पडले, कारण त्यांना पेशवाईच्या उत्तरकालाचा पुनरुद्धार व्हावा असे वाटत होते हे 'चिपळूणकर–काल आणि कर्तृत्व' पुस्तकातील पुढील हकिगतीवरून स्पष्ट होत आहे. "विष्णुशास्त्री पंडित यांचे चुलत बंधू साताराचे हरीशास्त्री पंडित, हे पुण्यातील दक्षिणेच्या समारंभासाठी कृष्णशास्त्रींकडे येऊन उतरत

असत व केव्हा केव्हा तीन चार महिने त्यांचा मुक्काम पुण्यात रहात असे. स्वराज्याचे अखेरचे दिवस प्रत्यक्ष बघितलेल्या त्या शास्त्रीबुवांची स्मरणाशक्ती इतकी प्रखर व वक्तृत्व इतके प्रभावी होते की ते आपल्या जुन्या आठवणी एकदा उजळावयाला लागले म्हणजे त्यांच्या रसवंतीच्या अस्खलित ओघात ते ते रस-प्रसंग डोळ्यांपुढे अगदी मूर्तिमंत उभे रहात असत. पेशवाईच्या उत्तर काळाचा चालता बोलता ज्वलंत इतिहासच जणू त्यांच्या रूपाने चिपळूणकरांना प्रत्यक्ष पहावयास मिळाला." पेशवाईच्या उत्तर काळातील सुखस्वप्ने पहाण्यातच चिपळूणकरांची सारी हयात गेली व त्या दृष्टीने त्यांनी जोतीराव व त्यांचे कार्य यांवर टीका केली. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे जोती निबंधामध्ये सांगत आहेत: "फुले यांचा ब्राह्मणी धर्मावरील हल्ला मात्र अचूक होता असे म्हणण्यास हरकत नाही. चातुर्वर्ण्याची उत्पत्ती ब्रह्मदेवाच्या निरनिराळ्या अवयवांपासून झाली, या कल्पनेवर त्यांनी झोड उठविली. दुसरे असे की ब्राह्मण्याच्या पावित्र्याचा दंभस्फोट करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. तोहि त्यांनी धर्मग्रंथांच्या आधारामुळे केल्याने तो बिनचूक होता असे म्हणता येते. उदाहरणार्थ- वेदकाळातील ब्राह्मण घोड्याचे व बैलाचे मांस खात होते आणि सोमाची दारू पीत होते ही गोष्ट कोणताही तज्ज्ञ अमान्य करू शकणार नाही. . . . चिपळूणकर या काळचे प्रतिगामी विचारांचे अध्वर्यू होत. खोटा देशाभिमान, अंध राष्ट्रभक्ती आज आपल्या देशात फार माजली असून विवेकबुद्धीने परंपरेची बंधने तोडण्याचे सामर्थ्यच लोकांच्या ठिकाणी दिसत नाही. या प्रवृत्तीचे महाराष्ट्रातील पहिले जनक म्हणून चिपळूणकरांचे नाव चिरस्थायी झाले आहे. चिपळूणकरांना जोतीराव फुल्यांच्या लेखनातील मूळ महत्वाची विधाने मुळीच खोडता आली नाहीत. येवढेच नव्हे तर ते मूळ मुद्यांचा परामर्शसुद्धा घेण्यास धजले नाहीत."

## रागाचे कारण

परशुरामाच्या अवताराचे खरे पितळ जोतीरावांनी उघडे केले. परशुरामाचा अवतार हा भगवान विष्णूचा अवतार असे चिपळूणकर आग्रहाने सांगत. त्यातील फोलपणा जोतीरावांनी समाजापुढे ठेवला. ह्या एकाच कारणास्तव सर्व बळानिशी चिपळूणकर जोतीरावांवर टीका करीत.

## चिरंजीव

अत्यंत अन्वनित कृत्ये करणाऱ्या अशा परशुरामास विष्णूचा अवतार ठरवून त्याला क्षत्रियांच्या नाशासाठी पुराणकारांनी चिरंजीव ठरविले. परशुरामाचा अवतार फक्त हिंदू क्षत्रियांच्या मागे लावला. अकबर बादशहाशी प्राणपणाने लढून अगणित क्षत्रियांचे रक्त राणा प्रताप रणांगणावर सांडीत आहे व परकीय सत्तेचे उच्चाटन भारतातून करीत आहे अशा प्रसंगी कृष्ण नरसिंह शेष' ह्या शास्त्र्याने परशुरामास जिवंत केले.हा पंडित काशी क्षेत्री रहात होता. त्याने 'शूद्राचार शिरोमणी' या नावाचा ग्रंथ लिहून कलीयुगात क्षत्रियांचे अस्तित्व नाही, असे त्या ग्रंथात प्रतिपादन केले. अकबराची सत्ता कळमास पोहोचविण्यास व राणा प्रतापसिंहास नामशेष करण्यास हाच ग्रंथ मुख्यत: त्या काळी कारणीभूत झाला असेल. छत्रपती शिवप्रभूंच्या राज्याभिषेकास कर्मठांनी विरोध केला. त्यावेळी ते सांगत, परशरामाने पृथ्वीवर क्षत्रिय ठेवले नाहीत, त्यामुळे शिवाजीस क्षत्रिय म्हणून राज्याभिषेक करून घेण्याचा हक्क नाही. हीच परंपरा पुढे सुरू राहिली! रियासतकार सरदेसाई साताऱ्च्या छत्रपतींसंबंधी सांगत आहेत: "प्रभू–ब्राह्मण वादात प्रतापसिंहाने प्रभूंवरील आचरणाचे ब्राह्मणांनी बसविलेले निर्बंध काढले, तेव्हा पुणे–वाई प्रांतातील ब्राह्मणांनी मोठा गवगवा चालविला. त्यास चिंतामणराव पटवर्धनाने प्रोत्साहन देऊन ब्राह्मणांच्या तर्फेने संकेश्वराच्या शंकराचार्यांकडून आज्ञापत्र घेतले की, 'कलीयुगात क्षत्रिय नाही. शिवाजी महाराज वगैरे क्षत्रिय नव्हते, प्रतापसिंहाने 'क्षत्रियकुलवतंस' पद धारण करू नये आणि आपल्या राजवाड्यात वेदोक्त विधीने कृत्ये करू नयेत. . . – प्रतापसिंहाच्या राज्यात ब्राह्मणांवर जुलूम होतो आणि आपला धर्म बुडतो, अशी हाकाटी नातूंच्या मार्फत सरकारात (इंग्रज सरकार) जाऊन त्याजबद्दल वरिष्टाचे (इंग्रज) मत बदलत गेले आणि इरेस पडलेल्या पक्षाने पराचा कावळा करून राजद्रोहाची उपस्थिती केली. प्रतापसिंहाने दुश्चिन्हे लक्षात घेऊन आवरते घ्यावयाचे, ते घेतले नाही. उलट ही प्रकरणे जास्त पेट घेत असताच वेदोक्त विधीचा नवा ग्रंथ तयार करून त्याने आपला राज्याभिषेक करविला."

ज्या शिवछत्रपतीने प्रत्यक्ष क्षात्रधर्माच्या जोरावर शंकराचार्यांचे पीठ

मुसलमानापासून जिवंत ठेवले, त्याच पीठाचे शंकराचार्य परशुरामाच्या अवताराच्या नावाखाली शिवाजी महाराज क्षत्रिय नव्हते असे सांगत होते. देशाच्या सर्व अनर्थांस कारण परशुरामाचा अवतार! भारतातील प्रसिद्ध अशी सर्व देवळे मुसलमानांनी भ्रष्ट केली. त्यात चिपळूण येथील परशुरामाचे देऊळ सुटणे शक्य नाही. अशा वेळी क्षत्रियांचा वैरी चिरंजीव परशुराम हा स्वस्थ कसा बसला? कदाचित मुसलमान हे सूर्यवंशीय, चंद्रवंशीय क्षत्रियांच्या माना छाटीत आहेत हे आपलेच कार्य मुसलमान करतात या समाधानाने त्याने आपला चिरंजीवपणा त्या काळी प्रकट केला नसेल! कारण एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करणारा परशुराम मुसलमानांच्या पराक्रमास भिऊन गप्प कसा बसला? अकबर बादशहाने रजपूत स्त्रीशी लग्न लावले. तिच्या पोटी जहांगीर झाला. शहाजहान हाहि रजपूत आईच्या पोटी जन्मला व औरंगजेबाची आईसुद्धा रजपूत होती. हिंदु मातांच्या पोटी येऊन हिंदूंचा छळ करणाऱ्या ह्या तिन्ही मुसलमान बादशहांप्रमाणेच परशुरामाने क्षत्रिय असलेल्या आईच्या (रेणुका) पोटी येऊन क्षत्रियांचा संहार केला. (परशुरामाची आई रेणुका क्षत्रियकन्या होती व बाप ब्राह्मण होता अशी माहिती श्री. म. माटे 'परशुराम चरित्रा'त देतात.)

कर्मठ ब्राह्मण्यामुळेच भारतावर परकी सत्ता आली हे स्वामी विवेकानंदाचे वचन सत्य असून त्याबाबत चिपळूणकर विचार न करता उलट ब्राह्मण्यासच महत्त्व देत आहेत.

## पारतंत्र्याचे कारण

महात्मा फुले सांगत, "मुसलमानांनी शौर्यामुळे हिंदुस्थान जिंकला नाही तर हिंदुमध्ये एकदशांश ब्राह्मण–पण त्यांचे धार्मिक, सामाजिक व सांस्कृतिक वर्चस्व, त्यामुळे हिंदूंचा सर्व प्रकारे कोंडमारा झाला. या कारणाने मुसलमानास मनमानेल तशी सत्ता गाजविता आली. जोपर्यंत समाजाची सर्वांगीण सुधारणा होत नाही तोपर्यंत समाजाला स्वातंत्र्य मुळीच भोगता येणार नाही."

## चिपळूणकरांचे ध्येय

**"हिंदुस्थानातील ब्राह्मणांस माझे सांगणे आहे की, प्रिय बंधूंनो, आपण जन्मजात श्रेष्ठ आहोत, हा तुमचा अभिमान फुकट आहे. शास्त्रदृष्टीने**

**खरे ब्राह्मणपण तुमचे ठिकाणी उरलेले नाही. म्लेंच्छ राजांच्या अमला खाली तुम्ही इतका काळ काढला आहे की त्यात तुमचे ब्राह्मणत्व नष्ट झाले आहे." – स्वा. विवेकानंद**

चिपळूणकरांस पेशवाईतील उत्तर काळातील फक्त ब्राह्मण्य दिसत होते. पेशव्यांच्या राज्यात सामान्य जनतेवर जे क्रूर जुलूम होत, स्त्री–शूद्रांस जनत वरांपेक्षा वाईट रीतीने वागवीत त्याबद्दल चिपळूणकरांना वाईट वाट नसून उलट ब्राह्मण्याच्या श्रेष्ठतेसाठी या गोष्टींची जरुरी होती, असे त्यांचे मत असावे असे वाटते. समाजाच्या अनिष्ट चालीरीतींवर ज्या ब्राह्मण सुधार कांनी बेगुमानपणे कोरडे ओढून समाजजागृती केली ते सारे सुधारक चिपळूणन करांच्या दृष्टीने स्वजनद्रोही ठरत होते. स्त्री–शूद्रांचा कैवार जोतीराव घेऊ- ब्राह्मण्यावर प्रहार करीत होते. त्यामुळे चिपळूणकरांस वाईट वाटत होते.

## स्वामी दयानंद सरस्वती

**"अगदी अर्वाचीन काळी ब्राह्मो आणि आर्य समाजांची स्थापना झाली. हे समाज निर्माण झाले नसते तर आर्यावर्तात आजमितीला ख्रिस्त आणि मुसलमान यांची संख्या हिंदूंहून अधिक झाली असती यात संशय नाही." – स्वा. विवेकानंद**

आर्य समाजाचे संस्थापक दयानंद सरस्वती यांचा जन्म काठेवाडात सन १८२४ साली झाला. प्रखर बुद्धिमत्ता व चौकस वृत्ती हे त्यांचे वैशिष्टच- वयाच्या चौदाव्या वर्षी सारी यजुर्वेद संहिता त्यांनी कंठस्थ केली होती. नंतर त्यांनी वेदांचे अध्ययन केले. वेदांची नुसती घोकंपट्टी त्यांनी केली नव्हती तर वेदांचा खरा अर्थ त्यांनी जाणला होता. पुर्नविवाहबंदी, अस्पृश्यता, जातिभेद जन्मावर उच्च अगर कनिष्ट भेद वगैरे गोष्टी वेदांस मान्य नाहीत असे वेदग्रंथांच्या आधारावर ते सांगत. वेद वाचण्याचा अखिल स्त्री–पुरुषांस हक्क आहे व परधर्मातील लोकास हिंदू धर्मात घेण्यास वेदांची परवानगी आहे, असे ते आवाहनपूर्वक सांगत. स्वमतप्रचारासाठी त्यांनी आर्य समाजाची स्थापना केली. स्वामींना ख्रिस्ती व मुसलमानी धर्माचे ज्ञान होते. त्यांनी दहाबारा वर्षांत सारा उत्तर हिंदुस्थान जागृत केला होता. मुसलमानी व ख्रिस्ती धर्मांच्या आक्रमणांस तोंड देऊन त्यांनी हिंदू समाज स्थिर ठेवला. सन १८७८ साली स्वामी मुंबईस आले व नंतर पुण्यास गेले.

## स्वामी दयानंद व महात्मा फुले

**" लोहचुंबकाकडे लोखंड धाव घेते त्याप्रमाणे सर्व जगाला आपणांकडे धाव घ्यायला ज्यांनी लावले व ज्यांची प्रतिमा आज हजारो नव्हेतर लक्षावधी लोकांच्या चित्तात खेळत आहे असे पुरुष धर्मवीर होते. सर्व जगाला हालविण्याचे सामर्थ्य त्यास धर्मामुळे प्राप्त झाले." – स्वा. विवेकानंद**

धर्मतत्त्वांच्या आधारे समाजात जागृती करून सत्य तत्त्वे त्याच्या समोर ठेवणे, हे जोतीरावांचे ध्येय होते. हेच ध्येय स्वामींचे असल्याने जोतीराव त्यांच्या पुणे येथील प्रचारकार्यास मदत करीत. स्वामींस पुण्यास-आणण्यासाठी न्यायमूर्ती रानडे यांनी पुढाकार घेतला होता. स्वामींच्या व्याख्यानाने सारे पुणे शहर खडबडून जागे झाले. स्वामींच्या प्रत्येक तत्त्वास वेदांचा आधार असे. पुण्यातील ब्राह्मणांचे वेदांचे ज्ञान फक्त पाठांतरात होते ! त्यामुळे स्वामींशी प्रत्यक्ष वादविवाद करण्यास कोणी धजले नाहीत. न्यायमूर्ती रानडे यांनी जोतीरावांच्या मदतीने स्वामींची हत्तीवरून मिरवणूक काढण्याचे ठरविले. परंतु स्वामींनी सांगितले, हत्तीवर फक्त वेद ग्रंथ ठेवणे, मी स्वतः पायी चालेन ! मिरवणुकीवर पुण्यातील कर्मठांनी हल्ला केला पण जोतीरावांच्या सत्यशोधकांनी तो परत फिरवून उलट त्यांचीच फटफजिती केली. स्वामी बांधीत असलेल्या फेट्याप्रमाणेच सनातन्यांनी एक फेटा गाढवाच्या डोक्यास बांधला व गाढवाची मिरवणूक काढून आपले सत्य-धर्मद्रोही हृदय प्रगट केले. स्वामींच्या मिरवणुकीचे व त्यांच्या कार्याचे वर्णन चिपळूणकरांनी आपल्या निबंधमालेत अत्यंत द्वेष बुद्धीने विकृत स्वरूपात केले व आपली सनातनी वृत्ती दाखविली. इतकेच नाही तर स्वामी दयानंद व त्यांचे धर्मोद्धाराचे कार्य यांवरहि टीका केली.

**"जातिभेदाने तुमचा समाज चाळणीसारखा करून टाकला आहे. तुमचा धर्म म्हणजे भोळसटपणा, निर्दयता, दांभिकपणा आणि भेकडपणा यांचेशी तुमचे सख्य !" – स्वामी विवेकानंद.**

जातिभेदाचा व वर्णश्रेष्ठतेचा पुरस्कार करणे हाच चिपळूणकरांचा जीवनहेतू. म्हणून त्यांनी महात्मा जोतीराव, स्वामी दयानंद यांच्यावर टीकास्त्र सोडले. जोतीरावांनी स्त्री, शूद्र, अतिशूद्र यांच्या उद्धाराचा मार्ग

मोकळा केला. त्याचप्रमाणे स्वामींनी वेदांचे दरवाजे अखिल मानव जातीस उघडे केले. स्त्री, शूद्रादि सर्वांस वेदांचा अधिकार आहे, असे शास्त्राधारे जाहीरपणे सांगितले. स्वामींच्या आर्य समाजाच्या शाखा भारतभर असून परदेशातहि आहेत. आर्य समाजाने शिक्षणाच्या बाबतीत मोठी क्रांती केली. स्वामींच्या नावाने भारतभर कॉलेजे, हायस्कुले व स्त्रीशिक्षणाच्या संस्था आहेत. आर्य समाजाने परधर्माच्या आक्रमणापासून हिंदू धर्माचे रक्षण केले अशा स्वामी दयानंद सरस्वतींवर चिपळूणकर केवळ वर्णाभिमानास बळी पडून टीका करतात हे आश्चर्य ! भावी काळात स्वामी दयानंद सरस्वती व महात्मा फुले यांचे स्थान भारतभर श्रेष्ठ ठरणार असून ते भारताचे आदर्श पुरुष होणार आहेत याची कल्पना चिपळूणकरांना त्यावेळी येणे शक्य नव्हते, कारण त्यांच्या डोळ्यांपुढे फक्त वर्णाभिमान व पेशवाईची सुखस्वप्ने होती !

## सुंदर भाषा

**"नमुनेदार आणि सुंदर भाषेच्या पोटी पुष्कळ वेळा नुसता केरकचरा भरलेला असतो असे मला मोठ्या कष्टाने म्हणावे लागते."**

**– स्वा. विवेकानंद**

ताजमहालाच्या सौंदर्याच्या पोटी हिंदू संस्कृती व स्वातंत्र्य हे त्याच्या पायात जणू गाडले गेले. तद्वत चिपळूणकरांच्या सुंदर भाषेत बहुजनसमाज, स्त्री, शूद्रादि अतिशूद्रांचे हित जणू पुरले गेले. त्यांची ती सुंदर भाषा बहुजनांच्या हितासाठी नाही. याबाबत काही सत्याचे पुरस्कते ब्राह्मण सांगत आहेत. इतिहाससंशोधक प्रा. न. र. फाटक हे ब्राह्मण विद्वान म्हणतात, "महाराष्ट्रातल्या एका राजकीय पक्षाने त्यांची आपल्या संप्रदायाच्या आदिपीठावर स्थापना केली. दरसाल त्यांच्या पुण्यतिथीचा दिवस साजरा केला जाऊन त्यांच्या कर्तबगारीच्या स्मृतीला तजेला आणण्याची खटपट होत असते. . . तथापि भाषेला जोरदार बनविण्यासाठी त्यांनी लोकांच्या अभिरुचीला इष्ट व निर्दोष वळण लावले की काय ? याविषयी विद्वानात एकमत नाही. जोरकस भाषेचा प्रयोग करण्यासाठी त्यांनी प्रायः असेच विषय निवडले की त्यामध्ये प्रतिकूल टीकेशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या विवेचनास अवसर सापडू नये." डॉ. भांडारकर यांचे चरित्रलेखक श्री. कर्नाटकी

यांनी चिपळूणकरांचे जातीयवादी व राष्ट्रघातकी धोरण स्पष्ट केले. त्याच-प्रमाणे प्रा. नलिनी पंडित म्हणतात: "ब्राह्मण्याच्या फाजील अहंकाराने फुले व त्यांचे सहकारी यांचा त्यांनी (चिपळूणकर) जो अनुदारपणे उपहास केला त्याने ब्राह्मणेतरांची मने दुखविली गेली." महात्मा जोतीराव यांच्या-संबंधी बहुसंख्य ब्राह्मणांच्या मनात जी विकृत भावना उत्पन्न झाली त्याचे मूळ कारण विष्णुशास्त्री चिपळूणकर हेच !

### द्वेषास कारण

भाऊ महाजन, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, गोवंडे, सार्वजनिक काका, परांजपे, वाळवेकर, न्या. मू. रानडे, सर भांडारकर वगैरे ब्राह्मण मंडळींनी समाजऐक्यासाठी, जातिऐक्यासाठी आणि समाजोद्धारासाठी प्रयत्न केले. केवळ ह्याच कारणास्तव अशा थोर पुरुषांवर अकारण आपल्या लेखणीने चिपळूणकरांनी वार करून त्यांच्यासंबंधी गैरसमज समाजात पसरविला. ब्राह्मण–ब्राह्मणेतर या राष्ट्रघातकी वादास चिपळूण-करांनीच महाराष्ट्रात जन्म दिला. ब्राह्मण्याच्या अहंकाराने त्यांनी ब्राह्मणेतर संतांबद्दलही द्वेष पसरविला. सन १८६९ साली संतश्रेष्ट तुकाराम महाराजांची गाथा मंबई सरकारने प्रकाशित केली. त्यावेळी चिपळूणकरांनी सरकारला दोष दिला. इतकेच नाही तर तुकाराम महाराजांसंबंधी अनुदार उद्गार काढले. त्यामुळे राजवाडे, वि. ल. भावे, पांगारकर वगैरे अनेक लेखकांनी तीच परंपरा चालवून तुकाराम महाराजांविषयी अनुदार उद्गार काढले, इतकेच नाही तर त्यांची पत्नी जिजाबाईचे सतीस्वरूप विद्रूप केले. व स्त्रीजातीच्या पतिधर्मास कमीपणा आणणारे असे लिहिले. आधुनिक काही लेखकहि तसेच करीत आहेत. प्रा. ह. भ. सोनोपंत दांडेकर हे आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावना पान ७८ वर लिहितात, " तुकारामबुवा हे खेडे-गावची भाषा वापरणारे रागीट संत दिसतात. शांतिब्रह्म एकनाथ हे मन-मोकळेपणाने सर्व सांगणारे दिसतात. नागर भाषा वापरणारे ज्ञानदेव हे निजानंदात निमग्न असल्यामुळे आपणांस कोण धक्केचपेटे देतो याची खबर नसणारे असे सत्पुरुष दिसतात. तुकारामबुवा रागवले तर षष्टीचा प्रयोग करण्यासही मागेपुढे पहाणारे ते नव्हते. "

ज्ञानेश्वरांनंतर सुमारे ३०० वर्षांनी तुकाराम महाराज जन्मास आले. ज्ञानेश्वरांच्या नावावर दांडेकर तुकाराम महाराजास हीन ठरवितात. काही पचांगकर्ते 'तुकाराम बीज' असे पंचागात लिहितात; लगेच चार दिवसांनी येणाऱ्या एकनाथ षष्ठीस 'श्री एकनाथ षष्ठी ' लिहितात, हे विचार करण्यासारखे आहे. तुकाराम महाराजांसारख्या संताच्या नावाआधी नुसताच ' श्री ' हा शब्द घालण्यासहि ते तयार नाहीत. यावरून चिपळूणकराची परंपरा चालविणारे आजहि महाराष्ट्रात आहेत हे दिसते.

## लोकमान्य टिळक

चिपळूणकरांचा वारसा टिळकांनी चालविला व चिपळूणकरांस त्यांनी विशेष महत्व दिले. सर्व सामाजिक सुधारणांस टिळकांनी विरोध केला. प्रा. नलिनी पंडित आपल्या 'जातिवाद आणि वर्गवाद' या पुस्तकात, म्हणतात : "वेदोक्त प्रकरणामध्ये मराठे क्षत्रिय नाहीत असा आग्रह धरणाऱ्या ब्राह्मणांच्या युक्तिवादाचेच टिळकांनी केसरीतून समर्थन केले. इतकेच नाही तर द्वैवर्णिकांच्या हितसंबंधांची जपणूक करणाऱ्या प्राचीन हिंदू समाजव्यवस्थेची बाज त्यांनी वेळोवेळी उचलून धरली. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची ब्राह्मणेतरांची मागणी जेव्हा पुढे आली तेव्हा टिळकांनी आपला मतभेद व्यक्त केल्याने बहुजनसमाज त्यांच्यावर रुष्ट झाला. म्हणून ब्राह्मणेतरांचे मागासलेपण जोवर नाहीसे झाले नाही, तोवर हिंदू लोकांच्या हातात राजकीय सत्ता आली तर ब्राह्मणांच्या हातात ती एकवटली जाईल आणि उच्चवर्णीयांचे वर्चस्व कायम राहील ही ब्राह्मणेतरांची भीती बळावत गेली. टिळक व्यक्तिशः उदार वृत्तीचे असले तरी त्यांच्या अनुयायात वर्णाभिमानी सनातन्यांचाच भरणा होता. म्हणून टिळकांबद्दल सर्वसामान्य जनतेला कधीच जिव्हाळा वाटला नाही." चिपळूणकरांप्रमाणे टिळकांनी जन्याचा पुरस्कार व सुधारणेस विरोध हे तत्त्व अमलात आणले आणि समाजसुधारणेच्या विरुद्ध पुणे येथे त्यांनी भाषण केले. त्यावेळी जागृत समाजाने त्यांचे भाषण बंद करून त्यांना सभा सोडन जाणे भाग पडले. असे प्रकार महाराष्ट्रात काही ठिकाणी घडल. बहुजनसमाज जागृत नव्हता तोपर्यंत टिळकांनी सुधारक व सुधारणा यांना प्रखर विरोध केला. परंत सत्यशोधक समाजाच्या जागतीने त्यांना टीका करणे अशक्य झाले.

## महात्मा फुले व वीर सावरकर

वीर सावरकर सांगतात की, "रोटीबंदी, बेटीबंदी व सिंधुबंदी वगैरे सप्तशृंखला हिंदू लोकांच्या पायात आहेत व त्या तोडल्यावाचून भारताला स्वातंत्र्य मिळावयाचे नाही. आणि मिळाले तरी टिकविता येणार नाही." असे आपले मत त्यांनी 'जात्युच्छेदक' निबंधातून मांडलेले आहे.

जोतीरावांनी शंभर वर्षांपूर्वी हेच मत अगदी स्पष्ट तऱ्हेने मांडले होते. स्वातंत्र्यवीर सावरकर हेच खरे सत्यशोधक होते म्हणून त्यांच्या त्यागाच्या व राष्ट्रभक्तीच्या मानाने त्यांचा समाजात उदो उदो नाही. चिपळूणकर व टिळकांप्रमाणे त्यांनी समाजसुधारणेस विरोध केला असता तर कर्मठांनी त्यांना अवतारांच्या मालिकेत घातले असते.

## चिपळूणकरांची वृत्ती

पेशवाईचा पुर्नजन्म झाला पाहिजे असे चिपळूणकरांना वाटत होते. सत्यशोधक हे नव्या मनूची वाट पहात होते. चिपळूणकरांचा हेतू मध्यमवर्गीयास ब्रिटीश राज्याविरुद्ध चेतवणे एवढाच! सत्यशोधकास ते तत्त्व त्यावेळी मान्य नव्हते म्हणून त्यांची सत्यशोधकांवर टीका! चिपळूणकर जोतीरावांना ब्राह्मणद्वेष्टा म्हणत परंतु सर्वच जातींचा द्वेष चिपळूणकरांनी केला. फक्त ब्राह्मण हेच स्वर्गातून उतरले असे त्यांना वाटत असे. चिपळूणकरांनी ब्राह्मण्याच्या अहंकारामळे इतर जातींकडे लक्ष दिले नाही. उलट त्यांच्या प्रगतीस घालता येईल तितकी खीळ मात्र घातली.

## मराठी भाषेचा शिवाजी

चिपळूणकरांस त्यांचे भक्त 'मराठी भाषेचा शिवाजी' म्हणतात व ते स्वतःहि तसे समजत. शिवाजीच्या तलवारीने सर्वांचे रक्षण केले. चिपळूणकरांनी लेखणीरूपी तलवारीने ब्राह्मणांसह सर्व जातींच्या सुधारणांची कत्तल केली. शिवाजीच्या तरवारीने शेकडो वर्षांची गुलामगीरी नष्ट केली. चिपळूणकरांच्या लेखणीने हजारो वर्षांपासून चालत आलेली धार्मिक गुलामगिरी व उच्चनीच जातिभेद समाजाच्या गळयात बांधण्याचा राष्ट्रघातकी प्रयत्न केला.

भाषेची कसरत करणारासंबंधी स्वा. विवेकानंद सांगत आहेत:

**"अक्षरशत्रू मनुष्य आपल्या वटवटीने जगाच्या शांतीचा बिघाड करीत नाही. पण हे शब्दवादी बडे आचार्य जगाच्या शांतीचा भंग करून मनुष्य जातीस अधिक दुःखात लोटण्यास मात्र कारणीभूत होतात."**

हे विवेकानंदांचे उद्‌गार चिपळूणकरांच्या लेखणीच्या बाबत सार्थ ठरतात.

## सत्यशोधक समाजाची सीमा

चिपळूणकर सत्यशोधक समाजावर टीका करतांना म्हणतात, "पण ज्या अर्थी जोतीबांचा समाज अद्याप बाल्यावस्थेतच आहे, एकीकडे हडपसर आणि दुसरीकडे भांबूर्डे याच त्यांच्या प्रचंड सीमा होत, त्या अर्थी असल्या 'शूद्र' सभेवर हत्यार धरण्यास आम्ही उत्साह पावत नाही." चिपळूणकर भावी काळाचे महत्व विसरले पण नित्य दिसणारी गोष्टहि त्यांच्या नजरेस आली नाही. 'वडाचे बीज' हे एकंदर सर्व वृक्षातील बीजात लहान असते. परंतु त्याच्या विस्ताराची बरोबरी जगातील कोणतेहि झाड करू शकत नाही. सत्य हे शून्यातून निर्माण होऊन प्रकाशमान होत असते. जोतीरावांच्या सत्यशोधक समाजाचा प्रसार महाराष्ट्रभर झाला. त्यांचे अनुयायी 'महात्मा फुले' यांचे जागोजाग पुतळे उभारीत आहेत. त्यांची नरनिराळी स्मारके होत आहेत, यापढे गावोगाव होतील. उलट चिपळूण-करांचे फोटो काही कर्मठ वृत्तीचे लोकच आपल्या संस्थेत लावीत आहेत। चिपळूणकरांच्या जयंतीस श्रोत्यांपेक्षा वक्तेच जास्त! तर जोतीरावांच्या पुण्यतिथीस प्रचंड मिरवणुकी निघून जयघोषाने दिशा दणाणून जातात. त्यांच्या स्मृतीसाठी महाराष्ट्र सरकारने राज्यभर सरकारी सुटी जाहीर केली हाच त्यांच्या श्रेष्ट अवतारकार्याचा पुरावा. चिपळूणकरांस जे महत्व प्राप्त झाले, याचे मुख्य कारण जोतीबावर त्यांनी केलेली प्रखर टीका व आपल्य हृदयात असलेला वर्णाभिमानाचा व्यक्त केलेला पुरावा! परंतु या वृथा वर्णाभिमानामुळेच आम्हांस अनेक शतके पारतंत्र्य भोगावे लागले. याचा विचार चिपळूणकरांनी केला नाहीच पण त्यांचे आधुनिक भक्तहि करीत नाहीत. हे देशाचे उघडे दुर्दैव!

## खरा महात्मा

द्वेष नाही जया चित्ती । समता सर्वांभूती ।।
तुका म्हणे जे ऐसे । ते भगवंता सरिसे ।।

जोतीराव हे कोणाहि व्यक्तीच्या अगर ब्राह्मण समाजाच्या विरुद्ध नव्हते. फक्त ब्राह्मण्याच्या विरुद्ध होते. त्यांचे खरे साहाय्यकर्ते ब्राह्मणच होते. त्यांच्या सत्यशोधक समाजात ब्राह्मण सभासद होते. परंतु जोतीराव ब्राह्मण-द्वेष्टे आहेत हा प्रचार विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीच सुरू केला व तो आत्ता-पर्यंत चालू आहे. परंतु जातिद्वेष अगर व्यक्तिद्वेष जोतीरावांच्या ठिकाणी मुळीच नव्हता ते पुढील हकिगतीवरून स्पष्ट होत आहे. विष्णुशास्त्री चिपळूण-कर यांचे निधन झाले त्यावेळी अशी बातमी पसरली की त्यांनी कोल्हापूर प्रकरणाच्या बाबत हाय खाल्ली व आत्महत्या केली. त्यामुळे उत्तरक्रियेस पोलिसांनी हरकत घेतली. ' नैसर्गिक मृत्यू आला ' असे डॉक्टरचे सर्टिफिकेट पाहिजे असा आग्रह पोलिसांनी धरला. कोणीहि डॉक्टर तसा दाखला देण्यास धजेना. अशा वेळी रावबहादूर डॉ. विश्राम रामजी घोले यांच्याकडे प्रो. केरुनाना हे गेले व त्यांची मदत मागितली. त्यांनी सांगितले "जोतीराव सांगत असतील तर मी तसा दाखला देईन." जोतीरावांनी आपल्या संतपणास अनुसरून तसा दाखला देण्यास डॉ. घोले यांना सांगितले. दाखला मिळाल्यावर चिपळूणकरांची उत्तरक्रिया पार पडली. या एकाच गोष्टीवरून जोतीरावांचे महात्मेपण सिद्ध होत आहे.

## मुंबई युनिव्हर्सिटी

वि. ल. भावे (ठाणे) हे चिपळूणकर परंपरेचे लढाऊ वीर होते. यांनी 'महाराष्ट्र सारस्वत ' ग्रंथ लिहून बहुजनसमाजातील संतांच्या जातीय ऐक्याच्या कार्यास जणू जातिद्वेषाची आगच लावली. तो ग्रंथ मुंबई, पुणे युनि-व्हर्सिटीने अभ्यासक्रमासाठी ठेवला आहे. त्या ग्रंथातील अंतरंग पहाण्याचा कोणाहि प्रामाणिक मनुष्याने प्रयत्न केला तर तो आपले स्पष्ट मत देईल. ह्या ग्रंथात संतांच्या खऱ्या कार्याचा मुडदा पाडून त्यावर समर्थ रामदासाचे महत्त्व उभे केले. श्री. भावे यांनी संतश्रेष्ट तुकाराम महाराज व समर्थ रामदास यांच्यात बाराकलमी तुलना करुन तुकारामास अत्यंत हीन ठरवून

समर्थास सर्वश्रेष्ठ ठरविले ! जातिवादाचा व वर्णश्रेष्ठतेचा पुरस्कार त्या ग्रंथात करून समाजातील ऐक्य भंग पावेल असेच लिखाण भावे यांनी केले आहे. जोतीरावांनी समाजऐक्याचा मार्ग महाराष्ट्र जनतेस दाखविला त्यासाठी सदरचे जातिभेद, वर्णभेद वाढविणारे पुस्तक युनिर्व्हसिटीने बंद करावे म्हणून प्रस्तुत लेखकाने महारष्ट्र सरकारच्या शिक्षणखात्यास ता. ५ जानेवारी सन १९६५ रोजी पत्राने विनंती केली. त्याचे उत्तर ता. १५ जून १९६५ रोजी आले: "युनिर्व्हसिटी सदरचे पुस्तक बंद करू शकत नाही." जातिद्वेष पेटता ठेवणारे पुस्तक कायम ठेवणे हे आश्चर्य ! श्री. भावे यांनी तुकाराम महाराजांच्या पवित्र चारित्र्यास व संतपणास कडकडून चावा घेऊन त्यांना लोकांनी संत का म्हणावे असे उद्गार काढले.

चिपळूणकरांच्या परंपरेतील लोक जातिद्वेष पसरवित असून उलट जोतिरावांचे अनुयायी जातिद्वेष पसरवितात असे म्हणणारांनी भावे यांचे लिखाण जरूर पहावे. म्हणजे सत्य ते स्पष्ट होईल. चिपळूणकरांचे भक्तच आज महाराष्ट्रात जातिद्वेष पसरवत आहेत. अलीकडे अनेक सुशिक्षित ब्राह्मण स्त्री–पुरुष समाजऐक्यासाठी प्रयत्न करीत आहेत. व जोतीरावांच्या कार्याचे कौतुक करीत आहेत व वाङ्मयभक्त त्यांच्या ग्रंथावर विचारपूर्वक संशो–धनात्मक लिहीत आहेत हे समाजाचे भाग्य.

## विष पेरले

**"ज्याला दुष्कर्मच करावयाचे आहे, त्याला कोणत्याहि मतातून आधार सापडतो." – स्वा. विवेकानंद**

महात्मा फुले यांच्यासंबंधी समाजात निष्कारण गैरसमज पसरविण्या-साठी चिपळूणकर यांनी प्रयत्न केले. याबाबत तर्कतीर्थ जोशी जोती-निबंधात सांगतात :

"गुलाम आपल्या गुलामगिरीचा पाश निर्माण करणारी चळवळ करण्यास मागे पुढे पाहात नाही. ही गोष्ट फुले यांनी अनेकवार सांगितली आहे. परंतु वरिष्ठ वर्ग हे शिक्षित आणि व्यवहारात मुरलेले असल्यामुळे ते स्वतःची फसवणूक होऊ देत नाहीत. त्यांचा स्वतःच्या हितसंबंधांवर जागरूक पहरा असतो. फुले यांनी जी सत्यशोधक कळवळ निर्माण केली तिचा हेतू मागासलेल्या जनतेच्या हितसंबधांचे रक्षण करणारा जागरूक बुद्धिवादी

लढावू, कर्तबगार शिक्षक वर्ग निर्माण करणे हा होता." अस्पृश्यादि बहुजन-समाजाची गुलामगिरी कधीच नष्ट होऊ नये व ब्राह्मण समाजाचे वर्चस्व त्यांच्यावर कायम राहावे ही चिपळूणकरांची मनीषा होती. तिलाच जोतीरावांनी सत्यशोधक समाजाच्या द्वारे आग लावली म्हणून जोतीरावांवर द्वेषाची आग चिपळूणकर व त्याचे अनुयायी पाखडीत आहेत. चिपळूणकर म्हणतात, "बळीराजाने पवित्र पाळलेला ' व 'आकाशांतील' बापाने लावून दिलेला जो आदीतवार तो छानलोक पोषाख करून देवाच्या नावाने डोळे मिटण्यात घालवण्याची रीत समाजाने (म्हणजे सत्यशोधक समाजाने) सुरू केली. ब्राह्मणांचे बंड मोडून टाकण्यात, आपल्या शूद्र बंधूंची आणि भगिनींची पारलौकिक स्थिती सुधारण्यास म्हणून जी सामाजिकांनी (म्हणजे सत्यशोधक समाजाचे संस्थापक श्री. जोतीराव) वर सांगितल्या-प्रमाणे तजवीज केली आहे तिजपासून त्यांचे कितपत हित होईल हे आमच्याने सांगवत नाही. . . . .मि. जोती वयाने चांगले पोक्त आहेत म्हणून ऐकतो व लोककल्याणाच्या कामात तरी त्यांची गडबड वीस पंचवीस वर्षे तरी आहे. मग आकाशातील बापाची ओळख झाल्यास इतका काळ लोटला असत व इतकी वर्षे त्यांनी त्याचे दर रविवारी ध्यान केले असता त्यांचा स्वभाव तर प्रसिद्ध शूद्र कवीच्या अभंगात सांगितल्याप्रमाणे जसाच्या तसाच अद्याप राहिला आहे." महात्मा फुले यांच्या दुधासारख्या पवित्र कार्यात ते ख्रिस्ताचे अनुयायी होते असे वर्णाभिमानाचे काल्पनिक मीठ टाकून ते महान पवित्र कार्य अपवित्र भासविण्याचा राष्ट्रघात चिपळूणकर करीत आहेत. त्याच वेळी ते संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांस शूद्र कवी म्हणून अंतःकरणाचा उथळपणा व वर्णद्वेष दाखवितात.

चिपळूणकरांनी पेरलेले विष बरेच दिवस कर्मठांनी महाराष्ट्रात वाढीस लावून महात्मा फुले ह्यांच्यासंबंधी समाजात गैरसमज पसरविण्याचे पाप केले. परंतु बहुजनसमाज महात्मा फुले यांच्या ध्येयाप्रमाणे जागृत झाला. महात्मा फुले यांच्या कार्याचा राष्ट्रभर प्रकाश त्याने पाडला. तेव्हा कोठे कर्मठांची तोंडे बंद झाली ! महात्मा फुले यांच्या कार्याकडे निर्दोष वृत्तीने कित्येक विद्वान ब्राह्मण व स्त्रिया पाहू लागल्या आहेत व त्यांचे श्रेष्ठ असे राष्ट्रकार्य मान्य करू लागले आहेत हे समाजाचे भाग्य !

• • •

## प्रकरण १० वे

# समाजोद्धाराचे विविध कार्य

**"चित्तातील सर्व लौकिक विचारांस रजा देऊन केवळ नैतिक अशा वातावरणात जे संचार करीत असतील अशांना अत्यंत गहन असे विचारहि आपोआप सुलभ होतील. असे लोक अशिक्षित असले तरी महापंडित होतील."**

**— स्वामी विवेकानंद**

भारताच्या गत इतिहासात शोधू गेले असता आढळून येणार नाहीत, अशी समाजोपयोगी अनेक कामे जोतीरावांनी केली आहेत.

"मामा परमानंद–कालखंड" ह्या ग्रंथात श्री. पु. पां. कुलकर्णी ह्यांनी म. फुले ह्यांचे कार्य किती महत्त्वाचे होते हे सत्य स्पष्ट करून सांगतांना म्हटले आहे की–

"शंभर वर्षांपूर्वीच्या काळात सार्वत्रिक अज्ञान, अंधश्रद्धा, विषमता, अविचार, आळस, अज्ञानमूलक धार्मिक व सामाजिक बंधने वगैरे, सर्वांगिण विकासाच्या आड येणाऱ्या बांडगुळांनी समाजवृक्षाला घट्ट विळखा घातला होता. त्यामुळे समाजवृक्ष सुकत व रोडावत चालला होता. ह्या बांडगुळांची मोडतोड करणे ही साधी गोष्ट नव्हती. ती करण्यासाठी निर्भीड, निर्भय व निःस्वार्थी माळ्याची जरूर होती. त्या बांडगुळात विषारी भुजंगांची वसती होती. ते त्यांचे सुखाचे निवासस्थान होते. ती त्यांची मिरास होती. या मिराशीवर प्रहार करण्यासाठी जो कोणी पुढे येईल त्याच्यावर प्रतिकाराचा व विषारी फुत्कारांचा मारा होणे स्वाभाविक होते. परंतु काही झाले तरी समाजाच्या सर्वांगिण विकासासाठी कोणी ना कोणी स्वबलिदान करण्यासाठी पुढे सरसावणे जरूर होते. आपल्यावर होणारे कठोर प्रहार व विषारी फुत्कार पचनी पाडून त्याप्रमाणे सर्वत्र समतेची व स्वाभिमानाची दिव्य ज्योत पेटवून समाजाला खडबडून जागे करणारा पहिला महाराष्ट्रीय महापुरुष म्हणजे म. जोतीबा फुले हाच होय."

## स्वाभिमानाची देणगी

महारमांग आदि अस्पृश्य व स्पृश्य समाजामधील लोकांना श्रावण महिन्यात एकत्रित केले. त्यांची श्रावणी केली. प्रत्येकाच्या गळ्यात जानवे घातले. त्याप्रसंगी जोतीरावांनी सांगितले की, " जानवे घालण्याचा प्रत्येक हिंदू म्हणविणारास हक्क आहे. कर्मठांनी हा हक्क हिरावून घेतला तरी लग्न-समारंभात नवरा व नवरी यांना जानवे (पोयते) घातल्याशिवाय लग्नास उभे राहता येत नाही. वेदकाळी स्त्रियासुद्धा जानवे घालीत. म्हणून लग्नात नवरीस जानवे (पोयते )घालण्यात येते ! "

जोतीबांनी नवविचारांच्या प्रसारासाठी श्रावणी घडवून आणल्यामुळे समाजास स्वाभिमानाची देणगी मिळाली. हल्लीच्या काळी, कित्येक अस्पृश्य, आदिवासी व बहुजनसमाजातील लोक जानवे घालतांना आढळतात. त्या प्रथेचे मूळ जोतीरावांच्या कृतीत आहे. पेशवाई काळात ब्राह्मणांशिवाय इतर जातींना जानवे घालण्याची मनाई होती.

## शेती सुधारण्यासाठी प्रयत्न

पीकवाढीसंबंधी शेतकऱ्यात आवड उत्पन्न व्हावी म्हणून जोतीरावांनी बक्षीसे ठेवली. उत्पादनवाढीसाठी त्यांच्यात स्पर्धा निर्माण केली. सुधार-लेली औते, उत्तम बी-बियाणे, इत्यादींचे महत्त्व पटविले. प्रत्येक शेतास बांध (बंडिग) असलेच पाहिजे असे आग्रहाने सांगितले. सुधारलेल्या देशातील शेतीसंबंधी शेतकऱ्यास माहिती व्हावी म्हणून सरकारने प्रयत्न केले पाहिजेत, दुभ्राळ गाईम्हशींची जोपासना करून शेळ्या-मेंढ्या वगैरे शेतकऱ्यांनी पाळल्या पाहिजेत, सरकारने जनावरांसाठी दवाखाने काढले पाहिजेत अशा शेती व शेतकरी ह्यांच्या उन्नतीसाठी त्यांनी अनेक महत्त्वाच्या सूचना त्याकाळी सरकारला केल्या होत्या ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे त्यांची व्यापक व विधायक दृष्टी लक्षात येते.

सन १८७६ मध्ये वक्तत्वसभा भरविली. मूर्तिपूजा, जातिभेद, अनिष्ट चालीरीती वगैरे समाजसुधारणेचे विषय त्यांनी त्यासाठी ठेवले. ह्या विषया-वर उत्कृष्ट बोलणारास त्यांनी बक्षिसे दिली. सत्यशोधक कार्यकर्त्यांनी खेडो-

पाडी जाऊन मुलामुलींच्या शाळा स्थापन करण्याचा प्रचार केला. शिक्षण-प्रसार व शेतीसुधारणा यासाठी जोतीरावांनी अशा प्रकारे अनेक प्रयत्न केले.

## पुणे म्युनिसिपालिटी

पुणे म्युनिसिपालिटीत सरकारतर्फे जोतीराव काही दिवस सभासद होते. रे मार्केटची नवी इमारत बांधतांना त्यांनी विरोध केला. दगडचुन्यात सुमारे तीनचार लाख रुपये गुंतविण्यापेक्षा तो पैसा शिक्षणप्रसारासाठी खर्च व्हावा असे आग्रहाने मांडले. भाजी विकणारापासून कर घेण्यात येऊ नये असेहि त्यांनी सांगितले. पुण्याला गव्हर्नर जनरल येणार म्हणून त्यांच्या स्वागतासाठी म्युनिसिपालिटीने बरीच मोठी रक्कम खर्च करण्याचे ठरविले तेव्हा जोतीरावांनी त्यास कडाडून विरोध केला. कररूपाने जनतेकडून घेतलेला पैसा लोकांसाठीच खर्च झाला पाहिजे, असे सांगणारे फक्त जोतीरावच त्यावेळी होते! त्यामुळे त्यांच्यावरची सरकारची गैरमर्जी वाढत गेली!! जोपर्यंत ते म्युनिसिपल मेंबर होते तोपर्यंत जनतेच्या हिताच्या बाबींकडे त्यांनी कटाक्षाने लक्ष पुरविले.

त्यानंतरच्या काळात निर्माण झालेल्या परिस्थितीबाबत ते सांगत आहेत, "शूद्रांचा प्रतिनिधी म्युनिसिपालिटीत नाही, म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष होत आहे. पाणी खाते, दिवाबत्ती खाते वगैरे ब्राह्मण अधिकाऱ्यांकडे असल्यामुळे ते शूद्रांकडे लक्ष देत नाहीत. अस्पृश्यांस दुष्काळात पाणीसुद्धा मिळत नाही." जोतीराव जेव्हा म्युनिसिपल सभासद राहिले नाहीत तेव्हा सूडबुद्धीने त्यांच्या दारापुढे कचऱ्याची कुंडी ठेवण्यात आली! आणि त्या भागाकडे मुद्दाम दुर्लक्ष होऊ लागले. ज्या मार्केटच्या बांधणीस जोतीरावांनी जोरदार विरोध केला त्याच मार्केटला त्यांचे नाव देण्यात यावे ही दैवाची विचित्र लीला होय! त्यावेळी आचार्य अत्रे हे म्युनिसिपल सभासद होते. त्यांनी याबाबत विशेष पुढाकार घेतला होता.

## सक्तीच्या शिक्षणाचा भारतातील पहिला पुरस्कर्ता

**"सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणाचे स्वप्नसुद्धा इतर राष्ट्रांस पडले नव्हते तेव्हा जर्मनीत ते सर्रास सुरू झाले होते. लिहिता वाचता न येणे हा तेथे गुन्हा समजला जात होता." – स्वा. विवेकानंद**

"सार्वत्रिक शिक्षणाचा प्रश्न सरकारने ताबडतोब हाती घ्यावा त्याशिवाय बहुजनसमाजाची स्थिती मुळीच सुधारणार नाही" असे जोतीरावांचे ठाम मत होते. सतत ३० वर्षे ह्या एकाच गोष्टीचा ध्यास घेऊन तिचे महत्त्व पटविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. परंतु राज्यकारभारासाठी नोकर तयार करणे हेच सरकारी धोरण होते–तेही फक्त वरिष्ठ वर्गातीलच ! कारण वरिष्ठ वर्गातीलच ' सरकारी नोकर बहुजनसमाजास अत्यंत क्रूरतेने ' वागवीत. जनहितापेक्षा सरकारचे हितच ते जास्त पाहात. त्यामुळे एक वेळ इंग्रज परवडेल पण हे देशी नोकर नकोत अशी बहुजनसमाजात सर्वत्र भावना पसरली होती. बहुजनसमाज शिक्षणाबाबत जोतीरावांनी जागृत केला. त्यामुळे शिक्षणाचे महत्त्व पटून सगळीकडन तशी मागणी होऊ लागली. त्याचा परिणाम होऊन प्राथमिक शिक्षणाबाबत सरकारने मुद्दाम डोळ्यांवर घेतलेली झापड दूर होऊ लागली. सन १८८२ साली हंटर कमिशन शिक्षणाबाबत चौकशी करण्यासाठी सरकारने नेमले. या कमिशनपुढे राजा राममोहन रॉयसारख्या सुधारकाने बहुजनसमाजाच्या शिक्षणप्रसारास विरोध केला आणि आग्रहाने सांगितले की, "प्रथम वरिष्ठ वर्गामध्येच शिक्षणप्रसार करावा; कारण त्यामुळे आपोआप खालच्या वर्गापर्यंत तो पोहचेल." त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील महान् विद्वान पंडित श्री. कुंटे ह्यांनी व अनेक सुशिक्षितांनी बहुजनसमाजाच्या शिक्षणास विरोध दर्शविला. भारतातील वरिष्ठवर्गीय पुढाऱ्यांनी अशा प्रकारे बहुजनसमाजात शिक्षणप्रसार करण्यास विरोध केला. परंतु खेड्यापाड्यात पसरलेला शेतकरी व बहुजनसमाज यांच्यात प्राथमिक शिक्षणाचाच प्रथम प्रसार झाला पाहिजे असे हंटर कमिशनपुढे साक्ष देतांना जोतीरावांनी आग्रहपूर्वक सांगितले. साऱ्या भारतात अशी साक्ष देणारे एकटे जोतीबाच ! कमिशनला त्यांनी स्पष्ट बजावले की, शेतकऱ्यांकडून व बहुजनसमाजाकडून सरकार कररूपाने जो पैसा घेते त्याच्या मोबदल्यात शिक्षणाची सोय करणे हे सरकारचे खरे कर्तव्य आहे. श्रीमंत लोकांकडून सरकारला पैसा मिळत नाही. असे असता त्यांच्या शिक्षणाची सरकार सर्वस्वी काळजी का घेत आहे ? रयतेचे कल्याण व्हावे असे खरोखर सरकारचे ध्येय असेल तर खेड्यापाड्यातून प्रथम शिक्षणाचा प्रसार झाला पाहिजे. दहा खेडी मिळून त्यात एकसुद्धा शाळा नाही, हे प्रमाण देशाच्या प्रगतीच्या आड येईल.

शहरातून कनिष्ठ वर्गासाठी स्वतंत्र शाळा पाहिजेत, बारा वर्षे वयापर्यंतच्या प्रत्येक मुलामुलीस सक्तीचे प्राथमिक शिक्षण दिले पाहिजे, असे हंटर कमिशनपुढे जोतीरावांनी स्पष्ट ठासून सांगितले. आणि याबाबत जागृतीचे कार्य सुरू ठेवले.

**" शिक्षण आणि शासनसंस्था ही जो जो खालच्या वर्गांच्या हातात अधिक येत गेली तो तो युरोपचे पाऊल अधिकाधिक पुढे पडू लागले. "**

**—स्वा. विवेकानंद**

प्राथमिक शिक्षणासाठी सारा महाराष्ट्र जोतीरावांनी खडबडून जागा केला. त्याचा परिणाम सरकारावर होऊ लागला. याबाबत जोतीरावांच्या कार्याचे पुरेपूर महत्त्व जाणणारे श्री. गं. बा. सरदार हे म्हणतात, " मध्यंतरी मुंबई शहरात राष्ट्रसभेचे मंत्रिमंडळ अस्तित्वात आले. त्यावेळी पंतप्रधानांनी आपले शिक्षणविषयक धोरण जाहीर केले होते. ' इतःपर सरकार प्राथमिक शिक्षणाकडेच विशेष लक्ष देईल. देशातील दानशूर धनिकांनी उच्च शिक्षणाला उदार आश्रय द्यावा ' असा त्यांच्या घोषणेचा इत्यर्थ होता. एका दृष्टीने जोतीरावांच्या विचारसरणीचा हा मोठा विजयच आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. " सरकारची उदासीनता व पुढारलेल्या वर्गांचा विरोध अशा परिस्थितीत प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न कित्येक वर्षे जागीच रुतून बसला असता. आज भारतात प्राथमिक शिक्षणाचा सर्वत्र प्रसार होऊन बहुजनसमाज व अस्पृश्य वर्ग यात जो शिक्षणप्रसार दिसत आहे याचे सर्वस्वी श्रेय म. जोतीराव फुले यांनाच आहे.

## छत्रपतींच्या गादीसाठी लो. टिळक व आगरकर यांना तुरुंगवास

भारताच्या इतिहासात राजांच्या गादीखाली सुरुंग लावण्याचे अनेक प्रकार त्यांच्या दिवाणांनी केले आहेत. त्याप्रमाणे शिवछत्रपतीने स्थापन केलेल्या गादीस दिवाणांचा उपसर्ग पोहचलेला आहे. शिवाजी महाराज, संभाजी महाराज, शाहू, प्रतापसिंह या छत्रपतींच्या गादीस त्यांच्या दिवाणांकडून त्रास झालेला आहे. त्याचप्रमाणे कोल्हापूरचे चौथे छत्रपती शिवाजी महाराज यांच्याशी स्वामीद्रोह करण्याचे पाप महादेव वासुदेव बर्वे यांनी केले. छत्रपती अज्ञान असतांना बर्वे त्यांचे दिवाण होते. महाराज वयात आले

व राज्यकारभार पाहू लागले. अशा वेळी इंग्रज एजंटाच्या मदतीने महाराजांना वेडे ठरविण्याचे नीच प्रयत्न बर्वे यांनी सुरू केले. आणि नाना प्रकारे महाराजांचा छळ सुरू केला. या प्रकारामुळे सारा महाराष्ट्र हादरला गेला. टिळक व आगरकर यांनी याबाबत पुढाकार घेतला. 'केसरी' व 'मराठा' या पत्रातून बर्वे यांची पापे उघडी करण्याचे त्यांनी धैर्य दाखविले. त्यात इंग्रज सरकारच्या एजंटालाहि गुंडाळले. सरकारने टिळक व आगरकर यांच्यावर खटला करण्याची बर्वे यांना फूस दिली. खटला दाखल झाला. दहा हजारांचा जामीन मागण्यात आला. सरकारचा रोष होईल या भीतीने जामीन होण्यास कुणीहि तयार होईना. अशा वेळी जन्मजात शिवप्रभूंच्या संबंधी जोतीरावांचे असलेले प्रेम उसळून आले. सरकारच्या नाराजीची पर्वा त्यांनी केली नाही. या कामी त्यांनी विशेष भाग घेतला. 'सत्यशोधक समाजा'चे सभासद श्रीमान रामशेट ऊरवणे यांना जामीन होण्यास जोतीबांनी सांगितले. त्याप्रमाणे ते टिळक व आगरकरांस दहा हजार रुपयांसाठी जामीन राहिले. मुंबई हायकोर्टात खटला सुरू झाला. खटल्याच्या खर्चासाठी पैशांची मदत जोतीरावांनी मिळविली. शेवटी त्या छत्रपतिभक्तास चार महिन्याची साध्या कैदेची शिक्षा झाली. १०१ दिवसांनंतर त्यांची सुटका झाली. मुंबईच्या तुरुंगाच्या दाराशी त्यांना जोतीरावांनी हार घातले. 'सत्यशोधक' समाजातर्फे त्यांची टोलेजंग मिरवणूक काढली. जाहीर सभेत त्यांचा सन्मान केला. त्याचप्रमाणे पुणे येथे समाजामार्फत त्या दोन पुढाऱ्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला. हाच लोकमान्य टिळकांचा पहिला जाहीर सन्मान ! देशभक्तांचा जाहीर सन्मान करण्याची प्रथा महाराष्ट्रात प्रथम जोतीरावांनी सुरू केली. ज्या कोल्हापूरच्या छत्रपतीसाठी जोतीरावांनी हवे ते प्रयत्न केले, तो अभागी छत्रपती नगर येथील किल्ल्यात एका इंग्रज शिपायाच्या जबर मारामुळे मृत्युमुखी पडला.

## ड्यूक ऑफ कॅनाटची मेजवानी

पुणे येथील श्रीमान हरी रावजी चिपळणकर यांनी सन १८८८ च्या मार्च महिन्यात 'ड्यूक ऑफ कॅनाट' यांना मेजवानी दिली. ती अद्यावत इंग्रजी पद्धतीची होती. पुणे व मुंबई येथील अनेक श्रीमंत व प्रतिष्ठित लोक

सरदार व अधिकारी समारंभास हजर होते. फक्त आमंत्रितांसच प्रवेशपत्रिका दिल्या होत्या. समारंभाच्या प्रवेशदारावर कडक बंदोबस्त होता. आमंत्रण-पत्रिका पाहून खात्री केल्यावर प्रवेश दिला जात असे. समारंभास सुरुवात होणार अशा ऐनवेळी जोतीराव प्रवेशदारावर गेले. डोक्यावर मराठेशाही भले मोठे पागोटे, ओबडधोबड धोतर, तेहि अपुरे नेसलेले, अंगावर फाटका अंगरखा (बंडी), व डाव्या खांद्यावर घोंगडी, पायात तुटलेला जोडा, हातात काठी अशा पोषाखात 'प्रवेशपत्रिका' दाखवून ते आत जाऊ लागले. परंतु त्यांच्या पोषाखामुळे पहारेकरी त्यांना आत जाऊ देईना. 'आमंत्रण हे पोषाखास नसून व्यक्तीस आहे' या तत्वास अनुसरून जोतीरावांनी खड्या आवाजात वादविवाद सुरू केला. जोतीराव कां आले नाहीत, या काळजीत चिपळूणकर होते. कारण ते जोतीरावांच्या कार्याचे भक्त होते. जोतीरावांचा आवाज ऐकून चिपळूणकर गडबडीने प्रवेशदाराजवळ गेले. जोतीरावांस हाती धरून त्यांनी व्यासपीठावर नेले. ते खुर्चीवर न बसता खालीच बसले. जोतीरावांचा पोषाख पाहून तेथील लोकांस आश्चर्य वाटले. जोतीरावास वेड तर नाही लागले ! असे आपमात बोलू लागले, 'क्रांतिकारांची प्रत्यक्ष कृती ही गुलामी मनोवृत्तीच्या लोकास वेडेपणाचीच वाटत असते.'

समारंभात अनेकांची भाषणे झाली. नंतर चिपळूणकरांनी जोतीरावांना भाषण करण्यासंबंधी विनंती केली. दुःखी, कष्टी व गांजलेल्या लोकांचे असे मूकात्मे अेकत्रित होऊन ते जणू त्यांच्या मुखवाटे बोलू लागले. खड्या आवाजात त्यांनी इंग्रजीत सांगितले, "येथे जमलेल्या लोकांच्या पोषाखांवरून हिंदुस्थानची स्थिती अशीच आहे अशी आपण कल्पना करून घेऊ नका. कारण येथे जमलेले लोक हे शेतकऱ्यांचे व गरिबांचे प्रतिनिधी नाहीत. शेतकरी हे दरिद्री, अन्नहीन, वस्त्रहीन, अशिक्षित आहेत. याची प्रत्यक्ष कल्पना करून घेण्यासाठी आपण स्वतः कोणत्याहि खेड्यात प्रत्यक्ष भेट द्यावी. म्हणजे हिंदुस्थानचे खरे स्वरूप आपणास त्या ठिकाणी प्रत्यक्ष दिसेल. महार, मांग वगैरे अस्पृश्यांच्या वस्तीत आपण मुद्दाम जावे, म्हणजे तुम्हांस कळून येईल की मानवी जीवांना जगण्यासाठी या वस्त्या सर्वस्वी अयोग्य आहेत ! त्या उकीरड्यासमान आहेत. हाच खरा हिंदुस्थान ! आपण व्हिक्टोरिया राणीस सांगावे की, हिंदुस्थानची जनता दारिद्र्यात खितपत पडलेली आहे. प्रथम सार्वत्रिक

शिक्षणाची लोकांस अत्यंत जरुरी आहे. शिक्षणाशिवाय भारताची सुधारणा मुळीच होणार नाही." अशा अर्थाचे हृदयस्पर्शी भाषण त्यांनी केले व भारताच्या खऱ्या स्वरूपाचे हुबेहूब चित्र त्या समारंभात 'ड्यूक ऑफ कॅनाट'ला जोतीरावांनी दाखविले. भारतातील गोरगरीब व पिळले गेलेले अशा अज्ञानी जनतेचे गाऱ्हाणे इंग्लंडच्या वेशीवर टांगणारे जोतीराव हेच प्रथमचे असणे शक्य आहे.

## दोनशे वर्षांनी

सन १६८० मध्ये पुण्यश्लोक छत्रपती शिवप्रभूंस स्वर्गवास घडला. सन १८८० मध्ये जोतीरावांनी रायगडावरील त्यांच्या समाधीचे दर्शन घेतले. समाधीची दुर्दशा पाहून त्यांचे अंतःकरण शतशः विदीर्ण झाले. ज्या महापुरुषाच्या राजकीय तपश्चर्येमुळे भारताच्या नकाशात महाराष्ट्रास महत्त्वाचे व मानाचे स्थान प्राप्त झाले, भारतरूपी विराट पुरुषाचा महाराष्ट्र हा राजकीय आत्मा ठरला, सबंध जगाच्या नकाशात हिंदुस्थान देशास वैशिष्ट्याचे स्थान ज्यांच्यामुळेच फक्त मिळाले, अशा पुण्यप्रतापी छत्रपतींच्या समाधीकडे जनतेचे लक्ष वेधण्याचे कार्य प्रथम जोतीरावांनी केले. कारण महाराष्ट्राची जनता जवळ जवळ त्या पुण्यस्थानास विसरलीच होती. शिवप्रभूंच्या कृपेमुळे अनेक राजे महाराजे जन्मास आले. त्यांनीहि या समाधीकडे लक्ष दिले नव्हते. समाधीच्या जीर्णोद्धारासाठी जोतीराव व लोखंडे यांनी पत्रक काढले. पुणे व मुंबई येथून समाधीच्या जीर्णोद्धारासाठी मदत मिळविण्याचा प्रयत्न केला. हे कार्य महाराजांच्या मृत्युनंतर बरोबर दोनशे वर्षांनी जोतीरावांनी प्रथम सुरू केले. नंतर सुप्रसिद्ध ऐतिहासिक कादंबरीलेखक ह. ना. आपटे ह्यांनी त्याकडे लक्ष दिले. सन १८९५ मध्ये लोकमान्य टिळकांनीहि महाराजांच्या उत्सवासाठी व समाधीप्रीत्यर्थ कायमची घटना निर्माण केली. जेम्स डग्लस हे समाधीबाबत सांगतात, "ज्या विस्तीर्ण देशावर शिवाजी महाराज मालक व प्रभू होते त्या शिवाजी महाराजांकरिता आता कुणीहि काळजी घेत नाही. एवढेच नव्हे तर महाराष्ट्रस्थापनकर्त्याच्या समाधीच्या दुरुस्तीसाठी एकहि रुपया देत नाहीत. जे लोक आपल्या उद्धारक मुक्तीदात्यास विसरतात त्यांचा देश उर्जितावस्थेस कधी येत नाही व त्यांच्या

मागून येणाऱ्या पिढीला आदर्श उदाहरण घालून देत नाहीत." ठाण्याचे कलेक्टर शिक्लेंदर यांनी, "स्वखर्चानी समाधीच्या दुरुस्तीस मदत केली. मुंबई सरकारने २५ रुपये खर्च करून लोखंडी कठडा केला व वार्षिक चार रुपये अनुदान सुरू केले." शिवाजी महाराजांच्या समाधीकडे दीर्घ काळात म. फुले यांच्याशिवाय कुणीहि लक्ष दिले नाही हेच महाराष्ट्रांचे उघडे दुर्दैव !

## भारतात मजुरांची चळवळ

हल्ली १ मे हा दिवस जगभर कामगार दिन म्हणून पाळला जात आहे. भारतात कामगारांचे महत्त्व जोतीराव यांनीच प्रथम ओळखले. सत्य शोधक समाजाच्या चळवळीमुळे जे अनेक कार्यकर्ते निर्माण झाले त्यात रा. ब. नारायण मेघाजी लोखंडे यांचे स्थान विशेष आहे. यांचा जन्म इ. स. १८४८ मध्ये माळी जातीत ठाणे येथे झाला. मराठी व इंग्रजी शिक्षण घेतल्यावर ते सरकारी नोकरीत शिरले. परंतु समाजसेवेची ज्योत जोतीरावांनी पेटविली. तिच्या प्रकाशात लोखंडे यांना मानवी जीवनाचे खरे हिताहित स्पष्ट दिसू लागले. त्यामुळे सत्यशोधक समाजाचे ते सभासद झाले. सरकारी नोकरी त्यांनी सोडली व समाजसेवेच्या अंगणातच सारी ह्यात घालविण्याचे त्यांनी ठरविले.

जोतीरावांच्या सांगण्यावरून कृष्णाजी पांडुरंग भालेकर यांनी 'दीनबंधु' पत्र सन १८७३ साली काढले. त्याचे संपादकत्त्व सन १८८० मध्ये लोखंडे यांनी स्वीकारले. कामगार चळवळीत आपले सारे लक्ष केंद्रित केले.. समाजसुधारणा व मजुरांची दुर्दशा यांचे चित्र ते त्या पत्रातून जनतेपुढे ठेवू लागले. सरकारचे लक्ष वेधले जावे अशा प्रकारे तळमळीने लिहू लागले. सन १८८४ मध्ये 'दीनबंधु' या नावाची सार्वजनिक सभा स्थापन केली. दर शनिवारी पुढाऱ्यांची भाषणे होत. सभासद-फी दरमहा अर्धा आणा असे. मजुरांची व गरीबांची स्थिती सुधारण्यासंबंधी सभेत चर्चा होत असे. मजुरांची दारुण स्थिती सरकारपुढे मांडून त्यांच्यासाठी कायदे करण्यासंबंधी सरकारला या सभेमार्फत सुचविण्यात येऊ लागले.

मजुरांच्या दुर्धर स्थितीचे चित्र जनतेसमोर व सरकारपुढे लोखंडे मांडू लागले, त्यामुळे सरकार जागे झाले. सन १८८४ साली कापड-धंद्यातील

प्रश्नासाठी सरकारने कमिशन नेमले. त्यावेळी मुंबई येथे लोखंडे यांनी मजुरांची पहिली परिषद भरविली. सुमारे सहा हजार कामगारांच्या सह्यांचा अर्ज सरकारात देऊन त्यात अनेक अडचणी दाखवून अन्यायाबाबत दाद मागितली. सन १८९० ला मुंबई येथे दहाहजार कामगारांची प्रचंड सभा भरवून रविवारच्या सुटीचा प्रश्न धसास लावला. या सभेचे वैशिष्टय म्हणजे स्त्री–कामगार–वर्ग मोठ्या संख्येने हजर होता. सत्यशोधक समाजाच्या चळवळीमुळे स्त्रियात जागृती निर्माण झाली होती. त्याचे प्रत्यक्ष दृश्य म्हणजे सदर जाहीर सभेत दोन कामगार–स्त्रियांनी भाषण केले. स्त्री– मजुरांच्या हालाचे व कष्टांचे वर्णन त्यांनी केले. ऐंशी वर्षांपूर्वी जाहीर सभेत स्त्रियांनी भाषण करण्याचा सबंध भारतात हाच पहिला प्रसंग असेल! याचे मूळ कारण म्हणजे जोतीरावांनी स्त्रियात केलेली जागृती! मजुरांना रविवारची सुटी मिळण्यास लोखंडे हे खरे कारणीभूत आहेत. याचे खरे श्रेय पर्यायाने जोतीरावांस व त्यांच्या सत्यशोधक समाजास दिले पाहिजे.

प्रा. नलिनी पंडित "जातिवाद आणि वर्गवाद" या आपल्या पुस्तकात सांगतात, "सन १८९० साली तर अखिल भारतातील औद्योगिक कामगारांच्या परिस्थितीची पाहणी करून त्या संबंधात सरकारला सूचना करण्यासाठी सरकारने एक मंडळ नेमले. मुंबई प्रांतातील पाहणीच्या वेळी या मंडळाला साहाय्य करण्यासाठी लोखंडे यांची नेमणूक करण्यात आली होती. मुंबईतील गिरणी कामगारांच्या संघटनेचे अध्यक्ष या नात्याने लोखंडे यांनी या मंडळास कामगारांच्या मागण्याची कैफीयत सादर केली. तिच्यावरून भारतातील या पहिल्या कामगार–पुढाऱ्याच्या व्यापक सहानुभूतीची व वास्तववादी दृष्टिकोनाची चांगलीच कल्पना येते. अशा प्रकारे स्त्रिया व अस्पृश्य, शेतकरी आणि कामगार इत्यादि सर्व दलित वर्गाच्या गाऱ्हाण्यांची दखल घेऊन आणि आत्मोद्धारासाठी स्वतःच्या संघटना उभारण्याचा त्यांना आदेश देऊन फुले प्रभृती सत्यशोधक कार्यकर्त्यांनी एका विशाल सामाजिक आंदोलनाचा पाया घातला. सन १८९१ मध्ये फॅक्टरी ॲक्ट होऊन मजरांस ज्या सवलती मिळाल्या त्यांचे खरे श्रेय लोखंडे व सत्यशोधक समाज कार्यकर्त्यांसच आहे." जोतीरावांनी भारतात मजूर चळवळीचा प्रथम पाया घातला हे वरील हकीकतीवरून स्पष्ट होत आहे.

लोखंडे यांच्यामुळे ठाणे हे सत्यशोधकांचे केंद्र बनले. सत्यशोधक समाजाचा वार्षिक उत्सव मोठ्या प्रमाणावर ठाणे येथे झाला. त्यासाठी महाराष्ट्रातून व बडोदे वगैरे ठिकाणांहून अनेक नामवंत कार्यकर्ते आले होते. जोतीरावांचे मुख्य भाषण झाले. समाजाने लोखंडे यांना सत्यशोधक निबंध माला सुरू करण्यास सांगितले. मालेच्या द्वारे मजुरांची दुःखे व कर्मठांचा समाजघातकी दृष्टिकोन यावर लोखंडे सडेतोड लिहीत. अशा या कार्यकर्त्याने सन १८९६ च्या प्लेगच्या साथीत ठाणे येथे मराठा हॉस्पिटल सरकारच्या मदतीने उभारले. लोखंडे व त्यांचे सत्यशोधक कार्यकर्ते घरोघर हिंडून आजाऱ्यांना हॉस्पिटलमध्ये आणून उपचार करवीत. परंतु समाजाच्या दुर्दैवाने लोखंडे यांना सन १८९७ साली प्लेगाच्या रोगाने मृत्यू आला. त्यांच्या मृत्यूने मजुरांचे व समाजाचे मोठे नुकसान झाले. मृत्यूच्या प्रसंगी लोखंडे यांचे वय अवघे एकुणचाळीस वर्षांचे होते.

जोतीरावांचे दीर्घकालचे स्नेही गोवंडे यांनी मजुरांच्या चळवळीतहि विशेष भाग घेतला होता. जोतीरावांच्या प्रत्येक समाजसेवेच्या कार्यात ते अंतःकरणापासून भाग घेत. महाराष्ट्रातील बहुजनसमाज व अस्पृश्य यांच्यावर त्यांचे मोठे ऋण आहे. ता. ८ एप्रिल सन १८८४ साली त्यांना स्वर्गवास घडला. ते जातीने ब्राह्मण होते. पण कृतीने खरे सत्यशोधक होते. त्यांच्या मृत्यूमुळे जोतीरावांना अत्यंत दुःख झाले.

## शेतकऱ्यांची चळवळ

**"कोणाची दृष्टी नसता व स्वतःच्या स्तुतीचा शब्दहि कानी पडत नसता आपली बारीकसारीक कामेसुद्धा केवळ स्वधर्म म्हणून जो जन्मभर करीत असतो तोच खरा पुण्यात्मा ! तोच खरा निरपेक्ष ! आमच्या हिंदुस्थानातील शेतकरी या कोटीतील आहे. आमच्या हिंदुस्थानातील शेतकऱ्यांची आणि त्यात ह्या इतरेजनांची काळजी कुणीच करीत नाही. परक्याने त्यांना जिंकले आणि स्वकीय त्यांना तुच्छ समजतात." – स्वा. विवेकानंद**

जुन्नर भाग हा सत्यशोधकांचा बालेकिल्ला समजण्यात येत असे. त्या भागातील जनता जागृत झाली होती. जुन्नर भागातील जमीनदार व सावकार आपल्या कुळांस राक्षसी जुलमाने भरडून काढीत. त्यामुळे कुळांची

दैना उडाली. शेतकऱ्यात असंतोष निर्माण झाला. त्यांनी संघटना निर्माण केली. त्यांची दाद लावण्याबाबत जोतीरावांनी पुढाकार घेतला. जोपर्यंत अन्याय दूर होत नाही तोपर्यंत जमीनदारांच्या जमिनी कुळांनी करू नयेत असा शेतकऱ्यांस जोतीरावांनी सल्ला दिला. कुळांनी जमिनी पडीत पाडल्या. यामुळे जोतीरावांच्या विरुद्ध जमीनदार, सावकार, सुशिक्षित व देशभक्त म्हणविणारे यांनी एकच काहूर उठविले. काही कुळांस आमिषे दाखवून त्यांची संघटना फोडण्याचा प्रयत्न जमीनदारांनी केला. परंतु तो अयशस्वी झाला. शेवटी जमीनदार व कुळे यांच्यात जोतीरावांच्या मध्यस्थीने योग्य अशी तडजोड झाली. यावेळी 'इंदुप्रकाश' या वर्तमानपत्राने मोठी ओरड केली व अग्रलेख लिहून त्यात त्यांनी असे सांगितले की "ही धोक्याची सूचना आहे. कारण ही साम्यवादाची सुरुवात जोतीराव करीत आहेत." याबाबत जोतीराव म्हणतात की "सरकारने शेतकऱ्यांस जगण्यासाठी अन्न व आसरा दिला पाहिजे. जमीनदार व सावकार यांचा त्यांच्यावरील होणारा कठोर जुलुम दूर केला पाहिजे. अशा योग्य त्या गोष्टी मागण्यासाठी प्रयत्न करणे म्हणजे काय साम्यवाद ?" बारडोलीतील शेतकऱ्यांचा सत्याग्रह म. गांधींनी केला. परंतु त्यापूर्वी कितीतरी अगोदर शेतकऱ्यात अन्यायाचा प्रतिकार करण्याची असहकाराची चळवळ जोतीरावांनी सुरू केली होती. अन्यायाच्या प्रतिकारार्थ सामुदायिक प्रतिकाराची अशी हीच पहिली सुरुवात असेल. जोतीराव म्हणत, "शेतीची प्रत्यक्ष मालकी ही कसणाऱ्याकडेच असली पाहिजे. त्याशिवाय भारतासारख्या शेतकीप्रधान देशाची उन्नती होणार नाही व अन्नधान्यातहि वाढ होणार नाही." या महत्त्वाच्या तत्त्वाचा पुरस्कार जोतीरावांनी त्या काळी केला. त्याचे अल्पसे अनुकरण हल्लीचे काँग्रेस सरकार करीत आहे.

सन १८७५–७६ साली अहमदाबाद, पुणे सातारा, सोलापूर वगैरे भागात दुष्काळाने कहर केला होता. शेतकऱ्यांच्या दैन्यास व हालांस पारावार राहिला नव्हता. अशा त्या दुर्धर स्थितीत जमीनदार व सावकार आपला स्वार्थी व जुलमी दृष्टिकोन बदलण्यास तयार नव्हते. त्यामुळे शेतकऱ्यात व त्यांच्यात भयंकर तेढ निर्माण झाली. काही ठिकाणी बंडाळी झाली. अशा प्रसंगी शेतकऱ्यावर होणारा जुलूम व अन्याय यांबाबत 'सत्यशोधकांनी'

चळवळ करून सरकारास जागे केले, त्यामुळे सरकारला 'डेक्कन अॅग्रिकल्चर अॅक्ट' करावा लागला.

सन १८७९ सालातील दुष्काळात पुण्याजवळ धनकवाडी या ठिकाणी गोरगरिबांच्या मुलांसाठी आश्रयस्थान सत्यशोधकांनी उघडले. सुमारे दोन-हजार मुलांना तेथे अन्न मिळत असे. या कार्यासाठी जोतीरावांनी पुढाकार घेतला. त्यांचे अनुयायी ऊरवणे शेठ, हरी रावजी चिपळूणकर, तिणप्पा वगैरे होते. या कामी सरकारची मदत त्यांनी घेतली. दुष्काळपीडितांस जरूर ती मदत करण्यासाठी जोतीरावांनी अनेक प्रयत्न केले व दुष्काळावर उपाय म्हणून त्यावेळी सरकारास अनेक उपयुक्त व महत्त्वाच्या सूचना केल्या त्यांपैकी काही जरी सरकारने अमलात आणल्या असत्या तरी आज दुष्काळात शेतकऱ्यांचे होणारे हाल कमी झाले असते. एक सालचा दुष्काळ शेतकऱ्यांना बारा वर्षे उजरू देत नाही असे जोतीराव सांगत. प्रत्यक्ष दुष्काळाच्या कठीण प्रसंगात सापडलेल्या जनतेसाठी मदतीचे प्रयत्न करणारे जोतीराव व त्यांचे 'सत्यशोधक' हेच त्या काळी दिसत.

## सरकारने पदवी दिली नाही

इंग्रजी राज्य व त्यांची राज्य करण्याची वृत्ती ही जोतीरावांस मुळीच मान्य नव्हती. फक्त यापूर्वी कोणत्याहि राज्यात आचारस्वातंत्र्य व मत-स्वातंत्र्य नव्हते, ते फक्त या इंग्रजी राज्यात आहे. याबाबत ते म्हणतात, "इंग्रज लोक आज आहेत ते उद्या नाहीत. ते आपल्या जन्मास पुरतील म्हणून कोणासहि खात्री देऊन सांगवत नाही. यास्तव ह्या लोकांचे राज्य देशात आहे तोवर आपण सर्व शूद्रांनी जल्दी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यातून मुक्त व्हावे, यातच शहाणपणा आहे." राज्यकर्त्यांच्या धोरणाबाबत ते सांग "ब्राह्मणांचे समाजातील वर्चस्व जाणून त्यांना मोठमोठ्या जागा देऊन आपल्या बाजूस बळविले व शूद्रांवर कर बसविले." सरकारी धोरणावर त्या काळी जोतीरावशिवाय कोणीहि प्रखर बोलत नव्हते.

पुणे येथील काही राजनिष्ठ मंडळींनी राणीला मानपत्र देण्याचे ठरविले. तारीख ३ जानेवारी सन १८७३ रोजी ते मानपत्र व्हॉइसरॉयजवळ देण्या-साठी ही मंडळी दिल्लीस गेली. मानपत्र हे सर्वांकडून आहे हे दाखविण्यासाठी

कोंडाजी पट्टेवाला यासहि प्रतिनिधी म्हणून बरोबर नेले होते. त्यावेळी जोतीराव दिल्लीस गेले नाहीत व मानपत्रावर त्यांची सही नव्हती. इतकेच नाही तर मानपत्र देण्यासंबंधी नागरिकांची जी सभा बोलाविली होती तिच्या आमंत्रण-पत्रिकेवरहि त्यांची सही नव्हती.

व्हॉइसरॉयच्या मानपत्रासाठी एक हजार रुपये पुणे म्युनिसिपालिटीने मंजूर केले. त्यावेळी फक्त जोतीरावांनीच विरोध केला. सरकारी अमलदारांच्या सत्कारास विरोध करणे ही जणू शिकवणूकच त्यावेळी त्यांनी समाजास दिली. ही गोष्ट धूर्त इंग्रज राज्यकर्त्यांच्या ध्यानी आली होती व जोतीरावांबाबतचे हे शल्य राज्यकर्त्यांच्या मनात अखेरपर्यंत सलत होते जोतीरावांचे कट्टे विरोधक चिपळूणकर सांगतात, "पण मध्यंतरी 'भटपांड्याचे बंड' उपस्थितीत झाल्यामुळे सर्व युरापियन कामगार यास पाहिल्याबरोबर कपाळास आठ्या घालू लागले." बहुजनसमाजावरील अन्यायाबाबत ते सरकारला निर्भिडपणे सांगत व कर्तव्याची जाणीव करून देत. त्यामुळे इंग्रज सरकार जोतीरावांवर नाराज असे.

वरिष्ठ वर्गास हाती धरावे, सरकारी नोकरीच्या रुपेरी बेडीने त्यांना जखडून टाकून राज्याच्या गाड्यास त्यांना पद्धतशीर जुंपावे व बिनधोक राज्य करावे हे सरकारचे समाजघातकी धोरण सर्वांआधी फक्त जोतीरावांनीच ओळखले होते. म्हणून शेतकरी व बहुजनसमाजात शिक्षणप्रसार केला पाहिजे अशी त्यांनी ओरड सुरू केली. जोतीरावांच्या या कृतीतच इंग्रजी सत्तेचे मरण आहे हे धूर्त इंग्रज राज्यकर्त्यांच्या लक्षात त्याकाळी आले होते व अखेर त्याप्रमाणे घडले. ज्या वेळी बहुजनसमाजात शिक्षणप्रसार होऊन जागृती निर्माण झाली त्या वेळी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी प्रयत्न सुरू झाले. अशा वेळी इंग्रजास आपल्या सत्तेचे चंबुगबाळे स्वतः गुंडाळून इंग्लंडचा मार्ग धरणे भाग पडले.

राज्यतृष्णेचा शेवटचा घास सन १८४८ मध्ये सातारचे राज्य खालसा करून इंग्रजांनी घेतला. परंतु महात्मा गांधींच्या बेचाळीसच्या चळवळीत याच सातारा जिल्ह्यातील जागृत अशा शेतकरी व बहुजनसमाजाने ग्रजी सत्ता भारतातून प्रथम नष्ट केली. सभेत, व्याख्यानात व र्तवमानपत्रातील लेखात स्वराज्याची प्राप्ती नाही तर ती बहुजनसमाजाच्य

शिक्षणप्रसारात व जागृतीत आहे, हे जोतीरावांचे ध्येय इंग्रजांनी ओळखले होते. म्हणून त्यांना सरकारने पदवी दिली नाही. लोककल्याणापुढे सरकारी पदवीची किंमत नाही हे जोतीरावांचे ध्येय होते.

## मराठी लेखकांची परिषद

सन १८८५ च्या मे महिन्यात पुणे येथे सुमारे तीनशे लेखकांची परिषद भरली होती. या लेखकवर्गात न्यायमूर्ती रानडे होते. ते प्रागतिक विचारांचे होते. म्हणन परिषदेस हजर राहण्यासंबंधी जोतीरावांस त्यांनी पत्र लिहिले. सदर पत्रास जोतीरावांनी पुढीलप्रमाणे उत्तर दिले: " आमंत्रणाबाबत आभारी आहे. जे लेखक मानवी हक्क नाकारतात त्यांच्या संस्थेशी आमच्या संस्थेचा काही संबंध नाही. त्यांचे ग्रंथ व आमचे ग्रंथ यात जमीनअस्मानचा फरक आहे. त्यांच्या वाडवडलांनी शूद्रांवर व अतिशूद्रांवर सूड घेतला आहे याची कल्पनासुद्धा हल्लीच्या लेखकांस करता येत नाही. आमच्या हालअपेष्टा स्पष्ट असून ते मुद्दाम आंधळे बनले आहेत. शूद्रांची पिळवणूक जे करतात त्यांच्यावर आमचा विश्वास नाही." अशा अर्थाचे पत्र जोतीरावानें लिहिले व ते परिषदेत वाचण्यास सांगितले. स्वमत निर्भिडपणे मांडण्यात व प्रसिद्ध करण्यात ते कधीच भीत नसत. हेच त्यांच्या ठिकाणचे वैशिष्टच अनेकदा स्पष्ट होत आहे.

जोतीरावांनी त्या परिषदेस सहकार्य केले नाही. कारण त्या लेखकांच्या लेखनात–कादंबरी, नाटके व काव्य यात– बहुजनसमाजाच्या उन्नतीचे प्रतिबिंब उमटत नव्हते. त्यात विशेषत: पौराणिक भाग असे. सामाजिक विषय असला तर वरिष्ठ वर्गापुरताच! आपल्या संस्कृतीची ते बढाई करीत. परंतु त्या संस्कृतीचा एकदशांशसुद्धा देशातील लोकात भाग नसे. हल्लीच्या काळीसुद्धा वरिष्ठ वर्गातील बहुसंख्य लेखक त्याच वळणावर लिहीत आहेत.

**"जातिभेद, परक्यांचा अंमल आणि तुमच्याच लोकांनी तुमच्यावर गाजविलेली सत्ता, या गोष्टींच्या हजारो वर्षांच्या प्रचंड आघाताखाली तुमच्या सर्व सामर्थ्याचा चुराडा उडून गेला आहे." –स्वा. विवेकानंद**

**"ढोर, गवार, शूद्र और नारी। केवल ताडणके अधिकारी !"–**
**–तुलसीदास रामायण.**

'जनावरे, अज्ञानी खेडवळ, शूद्र समाज आणि स्त्रिया यांना फक्त मार खाण्याचाच अधिकार आहे' अशा समाजघातक व जुलमी वचनांचा हल्ली काही लेखक निषेध करीत नाहीत इतकेच नाही तर उलट धर्मग्रंथांचा आधार घेऊन अशा अनिष्ट गोष्टींचा पुरस्कार करीत आहेत. तर काही लेखक जुन्या चालीरीतींचे वर्णन करून जातिभेदास महत्त्व देतात. तर कित्येक इतिहाससंशोधन या गोंडस नावाखाली इतिहासाचे सत्य रूप विद्रूप करीत आहेत. याबाबत डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणत, "हल्ली जे वाङ्मय तयार होत आहे, त्यात पूर्वग्रह, अंधश्रद्धा व जुन्या रूढींचा पाठपुरावा होत आहे. शिवाय समाजातील सुमारे शेकडा पाच लोकांसाठी त्या लिखाणाचा जन्म आहे." हेच मत जोतीरावांनी सुमारे पाऊणशे ऐंशी वर्षापूर्वी स्पष्ट केले.

'मामा परमानंद' यांना जोतीरावांनी जे पत्र लिहिले त्यात ते म्हणतात, "सरकारी ब्राह्मण नोकर व इतर पुढारलेले लोक इंग्रज लेखकांस खोटी माहिती देऊन इतिहासाचे सत्य स्वरूप नष्ट करीत आहेत. स्वतःहि त्याच मार्गाचा अवलंब करीत असतात. या जागृतीच्या काळात सुद्धा धार्मिक, सामाजिक व ऐतिहासिक बाबतीत अनेक लेखक एकांगी लिखाण करून समाजास सत्य स्वरूपापासून दूर ठेवण्याचे प्रयत्न करीत आहेत."

श्री छत्रपती संभाजी महाराज यांच्या चरित्राबाबत ऐतिहासिक सत्याचा खून करण्याचे प्रयत्न अनेक लेखकांनी केले. याचे मुख्य कारण संभाजीस बाजूस सारून प्रधान मंडळाने राजारामास गादीवर बसविले होते. प्रधानांची नरडी संभाजीने आपल्या दणगट हाताने व बळकट मनाने दाबली व गिळलेले राज्य त्यांना ओकावयास लावले. हे सत्य लपविण्यासाठी त्याला दुर्गुणाचा असा पुतळा निर्माण करण्याचे खोटे प्रयत्न झाले. संभाजी हा अत्यंत न्यायी राजा होता. त्याला दारूचे व्यसन नव्हते. शिवप्रभुप्रमाणे परस्त्रीस माता समजत असे. राजा असून त्याने एकच लग्न केले होते. श्री रामचंद्राप्रमाणे एकपत्नीव्रताचा तो अधिकारी होता. लढाईच्या काळात णी येसूबाईस राज्याचे सर्व अधिकार तो देत असे, कारण प्रधान मंडळावर याचा विश्वास नव्हता. औरंजेबाजाच्या ताब्यात मराठी राज्याचा प्राण अनाजी

दत्तोने देण्याचा घाट घातला. तसा लेखी पुरावा मिळाल्यावरच त्या निमकहरामास हत्तीच्या पायी दिले. सोयराबाई (संभाजीची सावत्र आई) सन १६८१ च्या ऑगस्ट महिन्यात नैसर्गिक रोगाने रायगडी मृत्यू पावली त्यावेळी छत्रपती संभाजी पन्हाळगडावर होता.

संभाजीसंबंधी ज्या लेखकांनी द्वेषबुद्धीने लिहून अत्यंत विकृत स्वरूपात जनतेपुढे ठेवले आहे त्यांनी महाराष्ट्र– धर्माचा भयंकर असा अपमान केला आहे व आजहि काही करीत आहेत. याबाबत म. फुले यांचे म्हणणे सत्य दिसत आहे. (श्री. बेंद्रे यांचे छत्रपती संभाजी महाराज चरित्र जरूर पाहावे.)

संभाजीच्या चरित्राप्रमाणे शिवाजीच्या जन्मशकाचाहि लेखकांनी वादविषय बनविला आहे.

शककर्ता छत्रपती शिवाजी महाराज यांचा जन्मशक सन १६२७ वैशाख शुद्ध द्वितीया हा आहे. तो जन्मशक सातारा, कोल्हापूर, तंजावर ही त्यांच्याच वंशांची राजघराणी विश्वसनीय म्हणून मानीत आहेत. त्याबाबत ऐतिहासिक आधार त्यांच्याजवळ आहेत. त्याचप्रमाणे भारतातील अनेक राजेरजवाडे तो दिवस शिवजयंती म्हणून पूर्वापार पाळीत आहेत. असे असता, इतिहासाच्या संशोधनाच्या नावाखाली हा जन्मशक इ. स. १६३० ठरविण्याचे काही लेखकांनी आटोकाट प्रयत्न केले व आजहि करीत आहेत. तर काही सन १६२८ हा जन्मशक सांगण्याचे धाष्टर्य करीत आहेत.

समर्थ रामदास स्वामी हे राजकारणी पुरुष नव्हते. फक्त धार्मिक कार्याचे प्रवर्तक होते हे ऐतिहासिक सत्य केळुस्कर, यदुनाथ सरकार, गो. स. सरदेसाई, चांदोरकर, गो. चि. भाटे, सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक न. र. फाटक वगैरे लेखकांनी ऐतिहासिक आधारावर स्पष्ट केले आहे. छत्रपती शिवाजी महाराज व समर्थ रामदास यांचा राजकीय संबंध नव्हता, तर तो फक्त धार्मिक होता; इतर साधुसंतांशी ज्याप्रमाणे होता त्याचप्रमाणे समर्थांशी होता. केळशीचे बाबा याकुत या मुसलमान साधूस (फकीर) शिवाजी महाराज मानीत होते. तरीहि शिवाजी महाराजांचे गुरू रामदास होते, हे सांगण्यासाठी जीवाचा आटापिटा आजहि काही लेखक करीत आहेत. अशा लेखकांसंबंधी त्याकाळी जोतीरावांनी जे सांगितले त्याप्रमाणे आजहि प्रयत्न होत आहेत.

**काही आधुनिक लेखकांची वृत्ती**

**"तुम्हांस सुधारणा पाहिजे असतील तर आधी लोकांस शहाणे केले पाहिजे त्यावाचून सुधारणा घडून येणे शक्य नाही. शिक्षणाचा प्रसार सर्वत्र होईपर्यंत तुम्ही वाट पाहिली पाहिजे. सुधारणा आमूलाग्र झाली पाहिजे." – स्वामी विवेकानंद**

भारताच्या गत इतिहासात स्त्रिया, अस्पृश्य व बहुजनसमाज यांच्या सुधारणेसाठी व सार्वत्रिक शिक्षणप्रसारासाठी कुणीच प्रयत्न केला नाही, म्हणून पारतंत्र्य भारताच्या गळ्यात अडकले. याबाबत स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ हे ऐतिहासिक आधारावर स्पष्ट सांगत आहेत. जे कुणीहि केले नाही ते फक्त प्रथम महाराष्ट्रात जोतीरावांनी केले. इंग्रजी राज्यामुळे समाजास नवदृष्टी प्राप्त होऊ लागली. परंतु या गोष्टीचा फायदा फक्त पुढारलेल्या वर्गाने घेतला. त्यांनी बहुजनसमाजाच्या हिताकडे व शिक्षणाकडे दुर्लक्ष केले. हे उघडे सत्य लपविण्याचे कार्य काही लेखक जाणनबुजून करीत आहेत.

सुप्रसिद्ध लेखक ग. त्र्यं. माडखोलकर यांनी सन १९५४ मध्ये 'चिपळूणकर—काल आणि कर्तृत्व' हे पुस्तक प्रसिद्ध केले. लेखणीचे कौशल्य व बुद्धीचे सर्व बळ खर्च करून चिपळूणकरांस स्वर्गाचे अधिकारी बनविण्याचा त्यांनी प्रयत्न केला व महात्मा फुले यांना जणू पाताळात घालण्याचे ठरविले ते म्हणतात, "लोकहितवादी आणि रानडे यांनीहि पारतंत्र्याला ईश्वरी कृपाप्रसाद मानला ही गोष्ट खरी. पण त्याबरोबरच ब्रिटीश साम्राज्यशाहीच्या शोषक भेदनीतीचे वाभाडे काढायलाहि ते चुकले नाहीत आणि त्यांनी लोकमत त्या नीतीविरुद्ध हळू हळू संघटित केले, हे विसरून चालणार नाही. पण फुल्यांचे डोळे मात्र कधीच उघडले नाहीत. त्यांच्या या एकांगी विकृत जातीय प्रचाराचा आणि पारतंत्र्याच्या राष्ट्रघातकी पुरस्काराचा दुष्परिणाम महाराष्ट्राच्या जीवनावर किती भयंकर झाला याची साक्ष इतिहासच देत आहे." जोतीराव हे इंग्रजी सत्तेस त्याकाळी महत्त्व देत होते त्याचप्रमाणे चिपळूणकरही देत आहेत याचा मात्र माडखोलकरांस विसर पडला. चिपळूणकर हे 'आपल्या देशाची स्थिती' या निबंधात

म्हणतात, "मोगलाईतील आणि पेशवाईतील झोटींग पाच्छाईचा उल्लेख करून त्यांनी असे समर्पक विधान केले होते की, हल्लीच्या राज्यात आम्हांला जितके स्वातंत्र्य आहे तितके यापूर्वी स्वदेशीय राज्यांच्या उत्कृष्ट कारकीर्दीतही कधी नव्हते." यापेक्षा जोतीराव काय निराळे सांगत होते ?

लोकहितवादी, न्या. रानडे आदि पुढाऱ्यांनी स्वातंत्र्य व सुधारणा यांचा शाब्दिक प्रचार केला. परंतु बहुजनसमाजाच्या अंतरंगात शिरण्यासाठी प्रत्यक्ष काय कृती केली ? चिपळूणकरांनी तर आपल्या निबंधमालेतून दहापाच लेख लिहून स्वातंत्र्याची फक्त शाब्दिक गर्जना केली. ते बहुजन-समाजापुढे एकादाहि गेल्याचे आढळत नाही. "**बोलाचाच भात बोलाचीच कढी। जेउनिया तृप्त झाला कोण ।।**" या संतउक्तीप्रमाणे चिपळूणकर व इतर देशभक्तांची कृती होती. त्याच्यात बहुजनसमाजाच्या सुधारणेचा जिव्हाळा नव्हता. शिक्षणासंबंधी तळमळ नव्हती व सुधारणेसाठी अंतःकरणाची ओढ नव्हती.

स्वराज्याची प्राप्ती ही नुसत्या शाब्दिक घोषणेत मुळीच नाही तर ती बहुजनसमाज, स्त्रिया व अस्पृश्य यांच्या खऱ्या सुधारणेतच आहे हे स्वराज्य-प्राप्तीचे खरे मळ फक्त जोतीरावांनीच जाणले होते.

कल्पनेतसुद्धा न येणारी गोष्ट फक्त जोतीरावांच्या कृतीमुळे प्रत्यक्षात घडली, ती म्हणजे भारताची राज्यघटना निर्माणकर्ते बाबासाहेब आंबेडकर-अस्पृश्य समाजातील एक महापुरुष ! व भारताच्या पंतप्रधानपदी एक स्त्री ! ह्या आश्चर्यकारक गोष्टींची कल्पना त्याकाळी चिपळूणकर व लोकमान्य टिळक यांच्या स्वप्नातही आली नसेल. कारण स्वराज्यासाठी हाका मारतांना त्यांनी या महत्त्वाच्या गोष्टींची उपेक्षा केली होती. स्वातंत्र्याचा जिवंतपणा हा सर्व जातींच्या स्त्रीपुरुषांच्या सुधारणेत आहे हे फक्त जोतीरावांनीच जाणले होते. सार्वत्रिक शिक्षणप्रसार झाला, अशा वेळी बहुसंख्य ब्राह्मण स्त्रीपुरुष आपला परंपरागत असलेला जातिश्रेष्ठतेचा व वर्णश्रेष्ठतेचा अहंकार सोडून राष्ट्रऐक्यास मदत करीत आहेत याला मूळ कारण जोतीरावच !

चिपळूणकरांचा राष्ट्रघात झाकण्यासाठी माडखोलकर महात्मा फुले यांच्यावर जातिद्वेष पसरविला म्हणून टीकेची चिखलफेक पसरवीत आहेत. परंतु जातिद्वेष व कृत्रिम उच्चनीचपणा हे जिवंत ठेवण्याचे कार्य महाराष्ट्रात

चिपळूणकरांनी केले याची साक्ष आज अनेक थोर थोर ब्राह्मण लेखक देत आहेत.

महात्मा फुले यांना अखिल अस्पृश्य लोक अवतार मानून त्यांच्या–संबंधी कृतज्ञ आहेत. बहुसंख्य सुशिक्षित स्त्रिया त्यांना आपला उद्धारकर्ता मानतात. बहुजनसमाजाच्या रोमरोमात त्यांच्यासंबंधी जिवंत आदर व प्रेम आहे. अशा श्रेष्ठ पुरुषांवर या जागृतीच्या व सुधारणेच्या काळात हृदयातील वर्णद्वेष व जातिद्वेष व्यक्त करण्यासाठी टीकेचे शितोडे माडखोलकर उडवीत आहेत. हे काय समाजऐक्य ?

बहुजनसमाजाचा जो आदर्श पुरुष त्याच्यावर टीका करणे म्हणजे समाजऐक्यास खीळ घालणे याचा विचार माडखोलकरांनी करणे जरूर होते. परंतु पुढारलेल्या वर्गातील लेखकांसंबंधी म. फुले यांनी त्या काळी जे सांगितले होते ते सत्य स्वरूपात आजही काही लेखकांच्या वृत्तीवरून दिसत आहे. चिपळूणकर यांना श्रेष्ठ ठरविण्याचे कंकण हाती बांधण्याचे ज्यांनी ठरविले आहे, अशांनी एका महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करणे जरूर आहे लोकहितवादी, न्या. रानडे, स्वामी दयानंद सरस्वती, म. फुले वगैरे ज्ञात अज्ञात अशा राष्ट्रसुधारकांप्रमाणे समाजसुधारणेस चिपळूणकरांनी हातभार लावला असता तर अस्पृश्य व मागासलेल्या लोकांपैकी जे परधर्मात गेले तसे घडले नसते. परंतु चिपळूणकरांनी जातिभेद व वर्णश्रेष्ठता यांस महत्त्व दिले व कर्मठ वृत्तीचे गोडवे गाइले. पेशवाईचा पुनरुद्धार करण्याचे स्वप्न मनी धरले. त्यामुळे कर्मठांचा व रूढीदासांचा अस्पृश्यांसंबंधीचा विकृत दृष्टिकोन बदललेला नाही. ते समाजसुधारणेस सतत विरोध करीत आहेत. त

**"नुसत्या पुस्तकी ज्ञानाच्या प्रदर्शनाने जनतेवर कधीहि खरे वजन पडत नसते, आपली उच्च तत्त्वे ज्या मायाने आपल्या रोजच्या वागणुकीत प्रत्यक्ष दिसू लागतात त्या मानाने आपल्याबद्दल लोकांचा आदर व पूज्यभाव वाढ जातो." – स्वामी विवेकानंद.'**

**" बोले तैसा चाले । त्याची वंदावी पाऊले "**

या संतोक्तीप्रमाणे ज्योतीरावांचे आचरण असल्यामुळे ते समाजाच्या आदरास पात्र झाले होते. हल्लीच्या काळी त्यांच्या संबंधीचा आदर दिवसेंदिवस वाढत आहे. बहुसंख्य ब्राह्मण त्यांच्या कार्याचा मुक्त कंठाने

गौरव करीत आहेत. त्यांच्या पुण्यतिथीनिमित्त महाराष्ट्रातील बहुतेक पत्र-कार गौरवपूर्वक अग्रलेख लिहून त्यांच्या श्रेष्ठ कार्याचे महत्त्व जनतेसमोर ठेवीत आहेत. हाच त्यांच्या श्रेष्ठतेचा रोख पुरावा!

### काँग्रेसची सुरुवात

**"सामान्य जनतेची उपेक्षा हेच महत्तम राष्ट्रीय पातक आमचे हातून घडले असून आमच्या अवनतीच्या कारणांपैकी हे एक कारण आहे असा माझा समज आहे. हिंदुस्तानातील सामान्य जनता पुनः एकवार चांगली सुशिक्षित होईपर्यंत आणि तिला पोटभर खावयास मिळेपर्यंत तुम्ही कितीही राजकीय खटपटी केल्यात तरी त्या साऱ्या फुकट जातील, असे मला वाटते. वरिष्ठ वर्गाच्या शिक्षणाचा खर्च हीच सामान्य जनता देते. तुमचा धर्म जिवंत राखण्याचे कार्य हीच सामान्य जनता करते. आणि ह्या उपकाराबद्दल तुम्हा सुशिक्षितांकडून तिला लाथा मात्र मिळतात."—स्वा. विवेकानंद**

काँग्रेसची सुरुवात ह्यूम वेडरबर्न यांच्यासारख्या इंग्रज सरकारी नोकराने केली. त्या कामी लाटसाहेबांचा त्यांना आशीर्वाद होता. जनतेची न्याय्य गाऱ्हाणी राज्यकर्त्यांच्या कानी घालणे हा मुख्य उद्देश होता. नंतर भारतातील सुशिक्षित व मोठमोठे व्यापारी काँग्रेसमध्ये सामील झाले. त्या वेळी काँग्रेसचे ध्येय स्वातंत्र्य नव्हते. तर मोठ्या अधिकाराच्या नोकऱ्या व इतर सवलती मिळविणे हाच मुख्य उद्देश होता. बहुजनसमाज व इतर सर्वसामान्य जनता यांच्या नावावर त्यांनी काँग्रेसची चळवळ सुरू केली होती. म्हणून काँग्रेस या संस्थेबाबत जोतीराव पुढीलप्रमाणे सांगत आहेत: "धूर्त आर्य भट ब्राह्मणांच्या मल्लांनी ज्या सभा उपस्थित केल्या आहेत, त्यांपैकी मुख्य पुणे येथील सार्वजनिक सभा आणि नॅशनल काँग्रेस. त्यात कुळंबी, माळी धनगर वगैरे शेतकरी किंवा साळी, कोष्टी, खत्री वगैरे कारागीर यांचे नावसुद्धा नाही. उलट बारा आले त्यांपैकी ब्राह्मण, जोशी, उपाध्ये आले त्यांचा मात्र या सभेत भरणा आहे. बाकीचे सरकारी कामगार, वकील, अगर श्रीमंत आहेत. यात महार, मांग मग कसे असणार? अथवा त्यांच्या पडझडीसंबंधाने या सर्वांनी कधी सरकारास अर्ज केल्याचेहि माझ्या कानावर नाही. उलट मोघम हिंदूंच्या नांवावर कलेक्टरांच्या जागा इंग्रज सरकारने द्याव्यात म्हणून या

सभेच्या रेकॉर्डीत अर्ज असतील. परंतु ते अर्ज अविद्वान शूद्रादि अतिशूद्रांच्या काय उपयोगाचे–कारण मोघम नाव हिंदूंचे आणि उपभोग घेणारे एकटे ब्राह्मण–वाहावारे–सभा! आणि वाहावारे तिचे दुटप्पी रेकार्ड! यावरून या बलीस्थानातील एकंदर शूद्रादि अतिशूद्रांसह भिल्ल, कोळी वगैरे सर्व लोक विद्वान होऊन विचार करण्यालायक होईपावेतो ते सर्व सारखे एकमत झाल्याशिवाय ती सभा "नॅशनल" होऊच शकत नाही. असे असता एकट्या उपऱ्या आर्य भट ब्राह्मणांनी अगर चार व्यापाऱ्यांनी नॅशनल कॉंग्रेस स्थापिली तर तिला कोण विचारतो?" देशातील सर्व लहानमोठ्या पीडित जातींस कॉंग्रेसमध्ये प्रवेश नाहीच परंतु राष्ट्रातील बहुसंख्य जो शेतकरी वर्ग तोहि नाही. त्याच्याकडे हे कॉंग्रेस पुढारी जाणनबुजून दुर्लक्ष करीत आहेत शेतकरी हा भारताचा कणा आहे. तो हल्ली कोणत्या दुर्धर प्रसंगात सापडला. असून विपन्नावस्थेत आहे याची जाणीव कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांस देण्याचे जोती–रावांनी ठरविले. त्याप्रमाणे एका अधिवेशनप्रसंगी तसे केले.

सन १८८९च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात कॉंग्रे-सची सभा भरली होती. अध्यक्ष वेडरबर्न होते. सभेच्या प्रवेशद्वारासमोर शेतकऱ्याचा भव्य असा गवताचा पुतळा सत्यशोधकांनी उभारला होता. त्याच्या अंगावरील अंगरखा फाटक्या चिंध्यांचा होता. गाल खोल गेलेले होते. भुकेमुळे पोट पाठीस चिकटले होते. डोळ्यात दुःखाश्रू होते. दारिद्र्य, निराशा, दुःख व गांजणूक यांचा जणू तो मूर्तिमंत असा देखावा होता. देशातील एकंदर शेतकऱ्यांच्या दारुण परिस्थितीचे उघडे स्वरूप त्या पुतळ्याच्या ठिकाणी जणू एकवटलेले दिसत होते. असा तो पुतळा उभा करून कॉंग्रेस कार्यकर्त्यांचे लक्ष वेधण्याची ही उपाययोजना केली होती.

शेतकीप्रधान भारताचा शेतकरीसमाज हा प्राण आहे. त्याच्या अडचणी व अज्ञान दूर केल्याशिवाय राष्ट्रोन्नती होणार नाही. शेतकरी व अठरापगड जातींचे लोक कॉंग्रेसमध्ये सामील झाल्याशिवाय तिला खरे नैतिक धैर्य प्राप्त होणार नाही. स्वराज्य व स्वातंत्र्याची ती हक्कदार ठरणार नाही. ही सत्य परिस्थिती त्या पुतळ्याच्या द्वारे दाखविण्याचा प्रयत्न जोती-रावांनी व सत्यशोधकांनी केला.

**"हिंदुस्तान देश वर यावा असे वाटत असेल तर खालच्या वर्गासाठी प्रथम खटपट केली पाहिजे." –स्वा. विवेकानंद**

काँग्रेसचे नेतृत्व महात्मा गांधी यांच्याकडे आले. अशा वेळी खादी, ग्रामोद्योग, अस्पृश्यता-निवारण, साक्षरता-प्रसार वगैरे लोकहिताच्या गोष्टींस काँग्रेस मान्यता देऊ लागली. शेतकरी व मजूर यांच्या आशाआकांक्षा यांची दखल घेऊ लागली. म्हणून बहुजनसमाज मोठ्या संख्येने काँग्रेसमध्ये सामील होऊ लागला. त्यामुळे तिचे खरे बळ वाढीस लागले. आणि स्वराज्यमागणीचे नैतिक धैर्य तिला प्राप्त होऊ लागले. अखेर स्वराज्य मागण्यास ती पात्र ठरली. काँग्रेसची खरी शक्ती कोणत्या गोष्टींवर अवलंबून आहे हे सर्वांआधीं फक्त जोतीरावांनी जाणले होते. त्यांच्या त्या ध्येयाप्रमाणे महात्मा गांधींनी काँग्रेसला वळण दिले. त्याचे प्रत्यक्ष फळ म्हणजे स्वराज्यप्राप्ती !

शेतकरी, कामगार, अस्पृश्य, आदिवासी वगैरे बहुजनसमाजातील लोक काँग्रेसमध्ये सामील होऊ लागले. अशा वेळी पुढारलेल्या जातीतील बहुसंख्य लोक भराभर काँग्रेसबाहेर पडू लागले. निरनिराळे पक्ष त्यांनी काढण्यास सुरवात केली व हल्लीहि अनेक पक्ष जन्मास येत आहेत. आणि काँग्रेसची खरी शक्ती खच्ची करीत आहेत. यावरून जोतीरावांनी त्यावेळी केलेले भविष्य खरे ठरत आहे हे दिसून येईल. ते म्हणत "अठरा पगड जातींचे व सर्व धर्मांचे लोक काँग्रेसमध्ये असले तरच तिला खरे बळ प्राप्त होईल.

महात्मा फुले यांचा सत्यशोधक समाज व स्वामी दयानंद सरस्वती यांचा आर्य समाज या दोन संस्थांनी खालच्या वर्गात शिक्षणप्रसार केला स्त्री–शूद्राहि बहुजनसमाजात स्वाभिमानाची ज्योत पेटविली. जनता जागृत केली. त्यामुळेच स्वराज्याची प्राप्ती झाली. स्वातंत्र्याचे मूळ कोणत्या गोष्टीत आहे हे प्रथम ओळखणारे महात्मा फुलेच !

## सामाजिक परिषद

**"अर्वाचीन जातिभेदामुळे हिंदुस्तानचे पाऊल पुढे पडत नाही. या धोरणामुळे समाजाचे लहान लहान तुकडे पडून ते आपल्या कक्षेत कुजू लागले आहेत." – स्वा. विवेकानंद**

'काँग्रेसच्या सुरवातीच्या काळी न्या. मू. रानडे वगैरे सुधारक त्या

संस्थेत होते. त्यामुळे काँग्रेसच्या मंडपातच सामाजिक परिषद भरत असे परंतु पुण्यातील सनातनी वृत्तीच्या लोकांस ती गोष्ट मान्य नव्हती. त्यांच्या राष्ट्रघातकी आग्रहास लो. टिळक बळी पडले. सामाजिक परिषद सन १८९५-पासून काँग्रेसच्या मंडपात भरण्याचे बंद झाले' (न्या. मू. रानडे चरित्र)

जातिभेद व कृत्रिम उच्चनीचपणा यातच देशाचे दुर्दैव साठविले आहे असे जोतीरावांचे ठाम मत होते. यामुळेच भारतावर अनेक शतके परकीयांनी मनमानेल तशी सत्ता गाजविली. ते म्हणत, "आमचे स्वातंत्र्य अनेकदा नष्ट झाले याला मुख्य कारण आमच्यातील सामजिक मतभेद! भारताला टिकाव स्वराज्य पाहिजे असेल तर प्रथम सामाजिक सुधारणा झाली पाहिजे." आज राष्ट्रास स्वातंत्र्य मिळाले तरी सामाजिक समतेच्या लाभ जनतेस मिळत नाही. ती विषमतेच्याच आपदा भोगीत आहे. भारताच्या पंतप्रधान या उच्च स्थानावर एक स्त्री आहे, तर याच देशात कित्येक समाजातील स्त्रिया अंगात चोळी घालीत नाहीत. लमाण (वंजारी) जातीच्या स्त्रिया अंगावर किलो दोन किलो वजनाचे पितळी दागिने व शेकडो वर्षांपूर्वीचाच जुना पेहराव घालून शहरात दिसत आहेत. याशिवाय अनेक समाजघातक हिडीस प्रकार रूढीधर्माच्या व सामाजिक बंधनाच्या नावावर सर्वत्र दिसत आहेत. कित्येक ठिकाणी अस्पृश्यांस समानतेची वागणूक मिळत नाही. अशा असंख्य गोष्टी प्रखर स्वरूपात जोतीरावांच्या काळी असत. म्हणून ते आग्रहाने सांगत, प्रथम सामाजिक सुधारणा झाली पाहिजे.

## अन्यायाचा प्रतिकार

**"गरीबांच्या स्थितीचा विचारसुद्धा आमचे लोक करीत नाहीत. तेच आपल्या निढळाच्या घामाने आमच्यासाठी अन्न उत्पन्न करतात. मजुराची सुखदुःखे ऐकून घेण्यास कोणी तयार नाही." –स्वा. विवेकानंद**

अन्यायाचाच प्रतिकार करणे हे जणू जोतीरावांचे ध्येयच ठरले होते. जेथे जेथे अन्याय दिसेल त्या ठिकाणी ते धावून जात. हीच शिकवण त्यांनी आपल्या अनुयायांस दिली होती. मुंबई म्युनिसिपालिटी आपल्या भंगी–कामगारांवर अन्याय व जुलूम करू लागली. या कामी सत्यशोधकांनी पुढाकार घेतला. त्यांचा संप घडवून आणला. त्यांचे दुःख वेशीवर टांगले. संप यशस्वी

केला. शेवटी म्युनिसिपालिटीने नाइलाजास्तव तडजोड केली व भंगी लोकांचे म्हणणे मान्य केले. भंगी समाजाबाबत जोतीराव कळवळून म्हणत, "डोक्यावरून मैला नेतांना ज्या मानसिक यातना भंगी लोकांस होत असतील याची कल्पनासुद्धा करता येणे अशक्य! परंतु स्पृश्य समाज त्याबाबत विचार करीत नाही."

अलीबाग भागात (कुलाबा जिल्हा) गवताच्या कुरणांचे मोठमोठे मालक होते. गवत कापणाऱ्या महार जातीवर ते भयंकर जुलुम व अन्याय करीत. जिवापाड कष्ट करून मजुरास पोटास अन्नसुद्धा मिळत नसे. अंगावर धड कपडा नसे. बायका-मुलांसह राबून ठरलेली मजुरी त्यांना मिळत नसे. त्यामुळे त्यांची भयंकर दुर्दशा झाली होती. त्या जुलमाकडे सत्यशोधकांचे लक्ष गेले. त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाची जाणीव मजुरांस त्यांनी करून दिली. मजुरांची संघटना निर्माण केली. गवतकापणीचे काम बंद पाडले. जुलुमाचा प्रतिकार संघटित रीतीने केला. मालक ठिकाणावर आले. त्यामुळे ठरलेली मजुरी वेळच्या वेळी देऊ लागले. अन्यायाचाच प्रतिकार करण्याची शिकवण जोतीरावांमुळेच महाराष्ट्रात जन्मास आली.

## खेड्यापाड्यातून पहिला दौरा

**"कोणत्याहि मोठ्या कार्याला लागणाऱ्या उत्साहाचा जन्म बुद्धिपासून होत नसून तो फक्त अंतःकरणापासून होतो." – स्वा. विवेकानंद**

अज्ञान, दारिद्र्य, रूढींची गुलामगिरी वगैरे अनिष्ट गोष्टींचे प्राबल्य जनतेत जितके जास्त तितके राज्य बिनधोक हे तत्त्व राज्यकर्त्यांस अवगत असल्याने ते जनतेच्या सुधारणांकडे दुर्लक्ष करतात. बहुसंख्यजनता खेड्यापाड्यातून असते म्हणून खेड्याच्या सुधारणांकडे राज्यकर्ते दुर्लक्ष करतात. हीच परंपरा इंग्रजांनी पाळली होती. सुधारणेचे सारे लक्ष त्यांनी फक्त शहराकडे लावले होते.

गत इतिहासात न सापडणारी गोष्ट जोतीरावांनी केली. ती म्हणजे खेड्यात जागृती करणे. भालेकर हे जोतीरावांचे एकनिष्ठ भक्त होते. त्यांच्यासह जोतीरावांनी खेड्यापाड्यातून जागृती करण्यासाठी दौरा सुरू केला. खेड्यापाड्यातून सत्यशोधक सभा ते घेऊ लागले. सभेत प्लॅटफार्म अगर इतर

गोष्टींची जरूर नसे. गावातील चव्हाटयावर (मैदान) त्यांच्या सभा भरत सभेतून शिक्षणाचे महत्त्व अनिष्ट चालींचे निर्मूलन वगैरे लोककल्याणाच्या बाबी ते अंतःकरणापासून सांगत. त्यामुळे जनता जागृत होऊ लागली. जागृतीसाठी व्याख्याने, पोवाडे व गाणी यांचा उपयोग ते करीत. शेतकऱ्यांच्या घामावर जगणारे जमीनदार, सावकार, कर्मठ, अरेरावी करून लाच खाणारे लहान-मोठे सरकारी अधिकारी व गावचे पाटील, कुलकर्णी यांच्या अन्यायी वर्तनाबद्दल निर्भीडपणे ते सांगत. बहुजनसमाजाची रूढ भाषा त्यांची असल्याने तिचा परिणाम होत असे. 'दीनबंधु' पत्रातून भालेकर हे खेडयाच्या दुर्दशेचे खरे चित्र दाखवीत व सरकार या गोष्टींकडे लक्ष देत नाही असे स्पष्ट लिहीत. खेडयापाडयातून जागृतीसाठी म. गांधींच्या कितीतरी अगोदर दौरा करणारे भारतातील पहिले जोतीराव ! राष्ट्रोन्नती ही खेडयांच्या सुधारणांवर आहे हे तत्त्व जोतीरावांनी कृतीने व स्वयंस्फूर्तीने समाजास दाखविले. त्याच तत्त्वाचा अंमल महात्मा गांधींनी केला व स्वराज्यप्राप्तीचे ध्येय गाठले.

## कै. नामदार बाळासाहेब खेर

१९३७ मध्ये मुंबई राज्यात काँग्रेस मंत्रिमंडळ स्थापन झाले. मुख्य मंत्री म्हणन बाळासाहेब खेर यांची निवड झाली. त्यांनी शिक्षणखाते स्वतःकडे घेतले. खेडयापाडयातील जनता व बहुजनसमाज यांच्या उन्नतीसाठी जोतीरावांनी लावलेल्या शिक्षणप्रसाररूपी वृक्षावर जबरदस्त वार खेरांनी केला. मेडिकल, इंजीनिरिंग कॉलेजसाठी व सरकारी नोकरीत प्रवेश मिळण्यासाठी त्यांनी विद्यार्थ्यांवर ठराविक मार्कांची अट घातली. सर्पाच्या विषाप्रमाणे खेडयातील शिक्षणप्रसाराचा थंडपणे प्राण घेण्यास त्यामुळे सुरुवात झाली. मार्क हे सर्वस्वी विद्यार्थ्यांच्या हुषारीवर अवलंबून नसतात तर विशेष अशा सोयींवर अवलंबून असतात. खेडयात दुय्यम शिक्षणाची सोय नसते. दोनचार मैलांवरून विद्यार्थ्यास हायस्कूलमध्ये शिक्षणासाठी यावे लागते. शिवाय खेडे म्हणजे दारिद्र्याचे माहेरघरच ! त्यामुळे बुद्धिमान अशा विद्यार्थ्यांस केवळ गैरसोयीमुळे पाहिजे तसे मार्क मिळत नाहीत. त्यामुळे खेडयातील बहुजनसमाज कॉलेजचे शिक्षण व सरकारी नोकरी यात दिसणा-नाही. खडकवासला येथील लष्करी शाळेत तर वयाची व मार्कांची अट.र

त्यामुळे त्यांना त्या संस्थेचा लाभ होत नाही. या एकंदर गोष्टींमुळे खेडी व शहरे असा संघर्ष निर्माण होण्याचा संभव आहे. कारण खेड्यातील जनता जागृत होत आहे. महाराष्ट्र राज्यात हल्ली जे शेतकऱ्यातील, मंत्रिपदावर आहेत याला कारण महात्मा फुले! ते खेड्यातील जनतेच्या मतदानावरच निवडून येतात. महात्मा फुले यांनी खेड्यांसाठी जी तपश्चर्या केली तिच्याकडे लक्ष देणे हे त्यांचे परम कर्तव्य आहे. महात्मा फुले यांचे ध्येय खेरांनी नष्ट केले असे म्हणणे, फारशी चूक होणार नाही. यामुळे राष्ट्राच्या प्रगतीस खीळ बसेल.

## प्राथमिक शाळेतून विणकाम

देशातील सुमारे ऐंशी टक्के जनता शेतकरी व शेतीचे मजुर आहेत. राष्ट्राची उन्नती ही शेतीसुधारणेवर अवलंबन आहे म्हणून शंभर वर्षांपूर्वी जोतीराव सरकारला आग्रहाने सांगत, प्रत्येक प्राथमिक (मराठी) शाळेस शेती पाहिजे तिच्याद्वारे विद्यार्थ्यांस सुधारलेल्या पद्धतीचे शेतकीचे शिक्षण द्यावे. शेतीस उपयुक्त अशी धंदेशिक्षणाची सोय पाहिजे. परंतु महाराष्ट्र सरकारने त्यांच्या त्या राष्ट्रोद्धारक सूचनेकडे दुर्लक्ष केले. सूतकताई व विणकाम हे शाळेतून सुरू केले. शेतकऱ्यांची मुले कधीच विणकर होणार नाहीत. कारण कापड. गिरणीच्या माऱ्यामुळे पिढीजात विणकर उपाशी मरून वणवण त आहेत या गोष्टींमुळे शेतकऱ्यांच्या मुलांचे शिक्षणाबाबत नुकसान होत आहे.

शेतकऱ्यात शिक्षणविषयक चळवळ त्याकाळी महात्मा फुले यांनी केली नसती तर हल्लीच्या महाराष्ट्र सरकारमध्ये जे शेतकरी वर्गातील मंत्री दिसतात ते आणखी पन्नास वर्षातहि दिसले नसते. महात्मा फुले यांच्या ध्येयासाठी व शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी तरी महाराष्ट्र मंत्रि–मंडळाने प्राथमिक शाळेतील सूतकताई व विणकाम बंद करून तोच पैसा जोतीरावांच्या सूचनेप्रमाणे शेतीशिक्षणासाठी खर्च केल्यास खरी राष्ट्रोन्नती होणार आहे.

## पुणे शहरात प्रिन्स ऑफ वेल्सची भेट

**"विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय केवळ ब्राह्मणापुरती करणे म्हणजे समुद्रात मीठ टाकणे होय. याकरिता दरिद्री, तुडविले गेलेले अज्ञ असे लोक हेच आपल्या सेवेला अधिक योग्य आहेत.". –स्वा. विवेकानंद**

त्याकाळी वरिष्ठ वर्गाच्या शिक्षणाकडे इंग्रज सरकार विशेष लक्ष देत असे. शिक्षणविषयक बाबतीत वरिष्ठ वर्ग स्वतःपुरतेच पाहात होता. अशा वेळी 'दीन बंधु' या नावाची संस्था शिक्षणप्रसारार्थ पुणे येथे स्थापन केली होती. त्या संस्थेची एक शाळा होती. तिच्यात सर्व जातींची व सर्व धर्मांची गोरगरिबांची मुले होती. त्यांना मोफत शिक्षण दिले जात असे. बहुजन-समाजात शिक्षणप्रसार व्हावा म्हणून त्या संस्थेची स्थापना केली होती. हल्लीच्या काळात महाराष्ट्रभर बहुजनसमाजाच्या शिक्षणप्रसारार्थ अनेक कार्यकर्ते प्रयत्न करीत आहेत. त्यांना त्या संस्थेमुळेच स्फूर्ती मिळालेली आहे.

सन १८८९ साली प्रिन्स ऑफ वेल्सने पुणे शहरास भेट दिली. त्यांच्या स्वागतासाठी सरकारी नोकर व श्रीमंत यांनी विशेष तयारी केली होती. ज्या रस्त्याने ते येणार होते तो विशेष प्रकारे सुशोभित केला. पोलीस-बंदोबस्त अत्यंत कडक होता. अशा प्रसंगी दीनबंधु संस्थेचे सुमारे दीडशे विद्यार्थी त्या रस्त्यावर अत्यंत शिस्तबद्ध असे उभे केले होते. दोन मोठ्या बांबूस भव्य असा लाल पडदा बांधलेला होता. त्यावर पुढील घोषवाक्ये होती: "राणीला सांगा तुमच्या राज्यामुळे आम्ही सामाजिक दृष्ट्या साधारण सुखी आहोत. परंतु एकोणीस कोटी जनता निरक्षर आहे. या खंडप्राय देशात शेकडा पाच-सुद्धा लोक साक्षर नाहीत. शेतकरी, मजूर, स्त्रिया व अस्पृश्य यांना शिक्षणाची अत्यंत जरूर आहे. यासाठी ते सक्तीचे पाहिजे." या प्रसंगी जोतीराव आजारामुळे अंथरुणावर पडून होते. तरी त्यांचे अनुयायी सदर प्रसंगी मोठ्या संख्येने हजर राहिले व भारताची दुर्दशा इंग्लंडच्या कानांवर घालण्याचे कार्य त्यांनी केले. नंतर ही निदर्शने करण्याची परंपरा भारतात जोरात सुरू झाली. या परंपरेचे मूळ कल्पक जोतीरावच असतील !

## विद्यार्थ्यांची चळवळ

विद्यार्थी वर्गास चळवळींची शिकवणूक ही 'दीन बंधू' सभेपासूनच मिळाली असावी. या गोष्टीचा उगम हा जोतीरावांच्या कल्पनेतूनच प्रथम झाला. याचे दृश्य रूप म्हणजे ज्या ज्या वेळी महात्मा गांधी यांनी विद्यार्थ्यांस राष्ट्रकार्यासाठी हाक दिली त्या प्रत्येक प्रसंगी महात्माजींच्या इच्छेप्रमाणे ते वागले हेच होय.

• • •

## प्रकरण अकरावे

# जन्म – साफल्य

"परमेश्वराने तुम्हास पुरुषांचा जन्म दिला आहे. त्याअर्थी काही पुरुषार्थ करून त्याची सतत आठवण राहणारी खूण मागे ठेवा."

—स्वा. विवेकानंद.

प्रातःस्मरणीय शिवछत्रपतींनी वयाच्या सोळाव्या वर्षी स्वराज्य स्थापन व स्वधर्मरक्षण या कार्यास सुरुवात केली. तद्वत् महात्मा फुले यांनी वयाच्या विसाव्या वर्षी समाजसुधारणा व दलितोद्धार या कार्यास सुरुवात केली. या उभय महापुरुषांच्या कार्यात रूढीच्या पर्वतप्राय अडचणी व स्वार्थाच्या भयंकर अशा दऱ्या स्वजनांनी निर्माण केल्या. त्यांच्या अंगीकृत कार्यात अडथळे आणले. तरी स्वकर्तव्यनिष्ठेवर ते समाजाचे निरंतरचे मार्गदर्शक ठरले व दिगंत कीर्तीचे धनी बनले.

## नोकरशाही

हिंदूंच्या जातीभेदाचा मुसलमानांनी राज्यव्यवस्थेसाठी पुरेपूर फायदा घेतला. ब्राह्मण समाज इतर जातीला तुच्छ समजतात. त्यांच्यासंबंधी काडीचा जिव्हाळा नसे, म्हणून ब्राह्मणास मुलकी खात्यात नोकऱ्या देत. सैन्यात राजपूत व मराठे यांची भरती करीत. ह्या तिन्ही वर्गांस इतर हिंदूबद्दल काडीचे प्रेम नसे. त्यामुळे ते मुसलमानी सत्तेस स्वत्व विसरून मदत करीत. इंग्रजी राज्यात त्यांच्या तलवारी इंग्रजांच्या हातात गेल्या. आणि त्यांच्या हातात नांगर आला. सरकारी नोकरीत ब्राह्मण व इंग्रज सर्वत्र दिसू लागले. प्रजेच्या हालास सुरुवात झाली. सर्वत्र वशिलेबाजी व लाचलुचपत बोकाळली. याबाबत त्या काळी जोतीरावांनी आवाज उठविला. त्यासाठी गाणी रचली. ती गायली. सरकार व जनता यांना जागृत करण्यासाठी त्यांनी अनेक प्रकारे प्रयत्न केले. नोकरांच्या बेबंदशाहीमुळे शेतकऱ्यांवर दिवसेंदिवस कराचा बोजा वाढत आहे. त्यांची दुर्दशा होत आहे असे स्पष्ट सांगितले. शंभर वर्षापूर्वी सरकारी

नोकरांच्या बाबत जनतेत जागृती करणारे महात्मा फुलेच हेच! प्रा. गं. वा. सरदार हे त्या काळच्या नोकरांच्या वृत्तीबद्दल पुढीलप्रमाणे सांगत आहेत :– 'ब्राह्मणादी उच्चवर्णियांनी इंग्रजी शिक्षणाची संधी प्रथम साधली. तेव्हा साहजिकच सरकारी कामदार बहुधा ब्राह्मणच असत. मात्र त्यांची वृत्ती अतिशय संकुचित होती. समाजाशी आपला काही जिव्हाळ्याचा संबंध आहे याची त्यांना बिलकुल जाणीव नव्हती. रात्रंदिवस ढोर मेहनत करूनहि शेतकरी व कारागीर रोजच्या रोज अर्धपोटी रहात होते. त्यांच्या मुलाबाळांची अन्नान्नदशा पाहून पाषाणालाहि पाझर फुटला असता. पण पाश्चात्य विद्येच्या वारुणीने अन्मत्त बनलेल्या आमच्या सुशिक्षित कामदारांनी त्यांच्या अडी अडचणींचा कधीहि सहानुभूतिपूर्वक विचार केला नाही. उलट स्वतःच्या क्षुद्र स्वार्थासाठी लोकांच्या अज्ञानाचा व दुबळेपणाचा फायदा घेऊन त्यांना अमानुषपणे पिळून काढण्याचा मात्र त्यांनी पुरुषार्थ गाजविला. त्यांच्या ह्या किळसवाण्या स्वार्थांधतेचा लोकहितवादींनी आपल्या शतपत्रात अत्यंत कडक शब्दात निषेध केला आहे. ज्या अर्थी लोकहितवादींसारख्या थोर सत्वशील मनुष्यानेहि आपल्या ज्ञातिबांधवांवर इतक्या निष्ठुरपणे प्रहार केले, त्या अर्थी आम्हा उच्चवर्णियांच्या सामाजिक नीतीमत्तेचे त्यावेळी दिवाळेच निघाले असले पाहिजे हे स्पष्ट आहे."

जनतेवरील जुलमाचे प्रा. सरदारांनी सत्य स्वरूप दाखविले आहे. त्या वेळी देशातील पुढारी वर्गातली लोक कलेक्टरसारख्या मोठ्या हुद्याच्या जागा पाहिजेत, म्हणून मागणी करीत. अशा वेळी जोतीराव आग्रहाने म्हणत, "सर्व जातीच्या लोकांस नोकरीत प्रवेश पाहिजे. त्याशिवाय जनतेस न्याय मिळणार नाही."

**"अनुभव स्वतः लक्षून। सांगतो खरे निक्षून। सर्व जाती निवडून घ्यावा संख्या प्रमाण। द्यावी कामे नेमून। होईल सुख समाधान।। चाल।।**

**घालीतो पदरी चकीस। नेमिता एका जातीस। प्रवेश नाही शूद्रास शूद्रास।। चाल।।**

**एका जातीचे सर्व मिळून देशास नाडीती। बाकीचे तोंडाकडे पाहती।। जोतीराव बोधी करू नये एक जात भरती। भरती होळकरी पोती।।**

वरिष्ठ वर्गातील लोक बहुसंख्य जनतेवर जुलूम करून सरकारचे हित

पाहात म्हणून सरकारने बहुजन समाजातील लोकांस सरकारी नोकरीची दारेच जवळजवळ बंद केली होती. अशा वेळी जनमत जोतीरावांनी जागृत केले. त्यामुळे सरकार सर्व जातीच्या लोकास अल्प प्रमाणात नोकऱ्या देऊ लागले. त्या काळी जोतीरावांनी प्रयत्न केला नसता तर हल्ली जे सर्व जातीचे लोक नोकरीत दिसतात ते दिसले नसते.

जोतीरावांचे म्हणणे असे होते, "शहरे व खेडी ही समपातळीवर आली पाहिजेत." परंतु हल्लीच्या राज्यात मार्कांच्या अटीमुळे शहरवासीयांचा सरकारी नोकरीत विशेष भरणा दिसून येत आहे. त्यामुळे खेडी व शहरे असा संघर्ष निर्माण होईल. खेड्यापाड्यातील जनतेकडून सरकारला जास्त पैसा मिळतो म्हणून त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात त्यांना नोकऱ्या देणे जरूर आहे."

## जन्मदात्याचे श्राद्ध

**जित्या नाही अन्न। मेल्यावरी पिंडदान ।।** **—तुकाराम महाराज.**

आपल्या माळी जातीतच नव्हे तर संबंध हिंदु समाजात जे कोणास करता आले नाही ते समाजसुधारणेचे कार्य फक्त आपल्या सुपुत्राने केले, त्याने नावलौकिक मिळविला याबद्दल गोविंदराव स्वतःस धन्य समजत मुलामुनेस त्यांनी घरी आणले. **'तुका म्हणे आईबापे। ही देवाचीं स्वरूपे ।।'** या तत्त्वानुसार वडीलांची सेवा उभयतांनी केली. गोविंदरावास स्वर्गवास घडला. त्यांच्याप्रीत्यर्थ तेराव्या दिवशी जोतीरावांनी अंध–पंगू, निराश्रित अशांना मिष्टान्नाचे पोटभर जेवण दिले. विद्यार्थ्यांस कपडे, पुस्तके व पाट्या दिल्या व समाजास उदाहरण घालून दिले.

उत्तरक्रिया (श्राद्ध) याबाबत जोतीराव म्हणत, "जिवंत आईबाप अन्नासाठी तळमळत असता त्यांना वेळेवर घासभर अन्न देत नाही. मेल्यावर मोठमोठी दाने ब्राह्मणास देतात. हे व्यर्थ आहे. जिवंत बापास माडीवर बसवावे. तळमजल्यात त्यांच्या नावाने पोटभर जेवण ब्राह्मणास द्यावे. नंतर माडीवर जाऊन वडीलास विचारावे, पोट भरले काय ? हे जसे शक्य नाही तद्वत् स्वर्गात मेलेल्या माणसास काही मिळत नाही. ही धूर्त लोकांची निव्वळ लबाडी आहे. जिवंतपणी आईबापांची सेवा करणे हाच खरा धर्म आहे.

शेतकरी व बहुजनसमाजातील लोक आईबापांच्या नावाने मोठमोठी कार्ये करून कर्जबाजारी होतात ही चूक आहे." या अनिष्ट चालीबाबत त्यांनी बराच प्रचार केला. सत्यशोधकांना तसे प्रयत्न करण्यास ते सांगत.

**'यशवंत'चे लग्न**

**"धर्माच्या नावावर मोडणाऱ्या नाना प्रकारच्या गारुड्यांचे आणि भोंदूचे येथे एवढे फावते याचे कारण आमची दुर्बलता."–स्वामी विवेकानंद.**

यशवंत या अनाथालयातील मुलास जोतीरावांनी दत्तक म्हणून घेतला होता. कारण सावित्रीबाईस मूल झाले नव्हते. जोतीरावांनी दुसरे लग्न करावे म्हणून सावित्रीबाईने व इतरांनी आग्रह केला. परंतु ते द्विभार्या करण्याच्या विरुद्ध होते. "**जया घरी दोन नारी। तया घरी पाप भारी।।**"–**तुकाराम महाराज**. या संतोक्तीस अनुसरून ते म्हणत, "द्विभार्या–पद्धत समाजातून नष्ट झाली पाहिजे. तद्वत लहान नवरी व वयस्कर नवरदेव ही पद्धतसुद्धा अनिष्ठ आहे. तसेच आईवडिलांच्या संमतीनेच मुलाने लग्न करणे."यशवंताचे लग्न करणे जरूर होते, परंतु सामाजिक बंधने त्यांच्यापुढे उभी राहिली. पूर्वकाळात हिंदूसमाजात अशी विषमता नव्हती.

**"वशिष्ठाचा बाप ब्राह्मण आईचा पत्ता नाही. नारदाची आई दासी बाप बेपत्ता, जाबालाची अवस्था तीच. व्यासाचा बाप पाराशर ब्राह्मण, मत्स्यगंधा (आई) कोळीण."–स्वामी विवेकानंद.**

ही परंपरा नष्ट होऊन विवाहबंधने अत्यंत कठीण झाली. याबाबत रा. ब. दादोबा पांडुरंग सांगत आहेत, "सुरतेत असता एक त्रिवेदी भार्गव ब्राह्मण येऊन मला सांगू लागला. तो म्हणाला, आमच्या जातीची सर्व चार-पाच घरे आहेत त्यात कन्याव्यवहार तितक्यातच झाला पाहिजे. दुसरे कोणी भार्गव आमच्या मुलास मुली किंवा मुलीस आपले मुलगे देत नाहीत. यावरून आमची काय अडचण असेल? कन्या झाली तर आम्हास फार संकट पडते ते सांगता येत नाही." हीच परंपरा सर्व जातीत होती. दिवेकरशास्त्री सांगतात, "ब्राह्मणात सुमारे दोनशे (पोटशाखा) आहेत." त्या काळी महाराष्ट्रात देशस्थ, कोकणस्थ, देवरुखे व कऱ्हाडे यांच्यात आपसात विवाह होत नसत. इतर जातीत हा प्रश्न मोठाच कठीण असे. अशा स्थितीत यशवंताला मुलगी मिळणे कठीण झाले.

सुधारणारूपी वृक्षाची वाढ अत्यंत मंदगतीने होत असते. शिवाय, त्याच्यावर विघ्ने फार येतात, त्यामुळे लावणारास त्याची फळे क्वचितच दिसतात. परंतु सत्यशोधकरूपी वृक्षास समता तत्त्वाचे फळ जोतीरावास दिसले. माळी जातीतील ग्यानबा ससाणे यांनी आपली मुलगी राधा ही यशवंताला देण्याचे धैर्य दाखविले. ते हडपसरचे राहणारे होते. आजच्या सुधारणेच्या काळात माळी, सोनार, शिंपी, माळी, मराठे वगैरे जाती आपल्याच पोटशाखेतील मुलास मुली देत नाहीत व मुली करीत नाहीत. मग त्या शंभर वर्षांपूर्वी ससाणे यांचे समाजसुधारणेचे धैर्य विशेष होते. कारण तो काळ म्हणजे अज्ञानाचा काळोख ! रूढींची भयंकर अशी शृंखलाच ! ! अशा वेळी त्यांची कृती म्हणजे दिव्यच होते.

समाजघातक्यांनी ससाणे यांच्याविरुद्ध माळी जातीस उठविले. रूढीदासांनी त्यांच्याभोवती काहूर केले. धर्म बुडाला म्हणून कर्मठांनी ओरड सुरू केली. अशा कोणत्याच गोष्टीस ससाणे यांनी भीक घातली नाही. कारण ते खरे सत्यशोधक होते !

सन १८८९ मध्ये सत्यशोधक समाजमताप्रमाणे राधा–यशवंत विवाह पुणे येथे झाला. विवाहप्रसंगी जोतीरावांनी केलेली मंगलाष्टके वधूवर म्हणाले व एकमेकांच्या गळ्यात त्यांनी हार घातले. अशा प्रकारे हा विवाह कमी खर्चात केला. मुंबई, सातारा, बडोदे येथून बरीच मंडळी लग्नासाठी आली होती. या समारंभात एका हाताच्या बोटाइतकेसुद्धा ब्राह्मण नव्हते. जी सुधारक मंडळी होती त्यांच्यावर जातिबहिष्काराचे शस्त्र उगारले व त्यांना त्रास देऊ लागले.

परंतु त्याच पुणे शहरात हल्ली आंतरजातीय विवाह ब्राह्मण समाजात राजरोस होत आहेत. इतकेच नाही तर ब्राह्मण वधू व परधर्मीय वर यांचे विवाह याच पेशवेनगरीत होत आहेत. असल्या लग्नांचा पुरस्कार पुरुषच नाही तर ब्राह्मण स्त्रिया पुढाकाराने करीत आहेत. या सुधारणेचे मूळ म्हणजे ससाणे यांचे धैर्य ! व सत्यशोधक चळवळ हेच होय.

## महात्मा पदवी

"महात्म्यास देव आकाशात, तीर्थात, देवळात दिसत नसून खेड्यात

**असलेल्या अज्ञानी, अस्पृश्य, रूढीच्या वरवंट्याखाली चेंगरलेल्या बहुजनात त्यांना भगवंताचे दर्शन घडत असते."–स्वामी विवेकानंद**

जोतीरावांच्या वयास साठ वर्षे झाली. अंगीकृत कार्यासासाठी कडकडीत व खडतर अशी तपश्चर्या त्यांनी चाळीस वर्षे केली. महाराष्ट्राचा कानाकोपरा धुंडाळला. समाजजागृतीसाठी अहोरात्र झटले. अज्ञानी जनतेस ज्ञानगंगेकडे वळविले. अन्यायाच्या प्रतिकाराची जनतेस शिकवण दिली. लोकात खरी जागृती केली. अशा श्रेष्ठ साधुवृत्तीच्या सत्पुरुषाचे अल्पसे उतराई व्हावे अशी त्यांच्या भक्तांस इच्छा झाली. मनुष्यात ते साधुवत दिसत तर साधूस ते सामान्य माणसासारखे भासत. त्यांचे सारे जीवन ऋषिवत होते.

**"महर्षित्व हे फक्त एका जातीला किंवा पंथाला आंदण दिले असे नाही. तुमच्या आमच्यासारख्या सामान्य माणसालाहि ऋषी होणे शक्य आहे.'–स्वामी विवेकानंद**

अशा युगपुरुषाचा सत्कार त्यांच्या अनुयायांनी करण्याचे योजिले. तारीख ११ मे सन १८८८ साली मांडवी कोळीवाडा (मुंबई) येथील भव्य हॉल सर्व प्रकारे शृंगारण्यात आला. मुक्तिदात्याचे व उद्धारकर्त्याचे ऋण फेडण्यासाठीच हा समारंभ होता. सभास्थानी सुशिक्षित, श्रीमंत, पागोटे घातलेले व फेटेवाले होते. तर जीर्ण टोप्या व फाटके कपडे घातलेले असंख्य भाविक होते. श्रीमंत घराण्यातील स्त्रिया व ठिगळांचे लुगडे असलेल्या बहुसंख्य बाया होत्या. दारिद्र्याने पिडलेले, पोटासाठी वणवणारे, अज्ञानाने मनुष्यत्वास पारखे झालेले अशांचा तो समाज होता. समारंभासाठी, बडोदे, सातारा, पुणे वगैरे भागातील अनेक नामवंत आले होते.

जोतीराव सभास्थानी आले. त्यांचे दर्शन होताच पीडितांच्या डोळ्यात कृतज्ञता चमकू लागली. तर काहींच्या डोळ्यावाटे ती ओघळू लागली. समारंभास सुरुवात झाली. जोतीरावांचे असामान्य धैर्य, त्याग, ध्येयनिष्ठा, समता, व समभाव यांचा पुरस्कार, मानवी हक्काचे दरवाजे ते प्रथम उघडणारे वगैरे प्रकारे त्यांच्या गुणवर्णनपर भाषणे काही वक्त्यांनी हृदयाच्या बोलाने अंतरीच्या ओढीने केली. तर इतरांनी सांगितले की सतत अहोरात्र चाळीस वर्षे निःस्वार्थीपणाने जनसेवा करणारा हाच महाराष्ट्रातील आद्य असा महापुरुष ! एकांडी शिलेदाराप्रमाणे प्राणपणाने अज्ञानाविरुद्ध, सनातन्यांविरुद्ध

रुढीदासाबरोबर निकाराने लढा देणारा हाच एक युगप्रवर्तक ! असा महात्मा इतिहासात शोधू गेला असता सापडणार नाही.

**"ज्याच्यापाशी स्वार्थ नावासहि उरला नसेल. आणि ज्याचे सारे जीवन शुद्ध प्रेममय बनले असेल असा मनष्य आज जगाला हवा आहे. अशा माणसाचा एकेक शब्द म्हणजे वज्र आहे."–स्वामी विवेकानंद**

रा. ब. विठ्ठलराव कृष्णराव वंडेकर यांनी हार हातात घेतला व सांगितले, "यांच्या तपश्चर्येमुळे अखिल महाराष्ट्रातील स्त्री–पुरुषास मानवी हक्कांचा, जागृतीचा व चैतन्याचा कायमचा ठेवा मिळाला. म्हणून हाच आमचा खरा महात्मा !" महात्मा फुले की जय असा त्रिवार जयघोष त्यांनी केला व हार जोतीरावांना अर्पण केला. ते पुढे म्हणाले, "आम्ही स्वयंस्फूर्तीने जोतीरावांना 'महात्मा' पदवी अर्पण करीत आहोत." सदर समारंभप्रसंगी बडोद्याचे राजे सयाजीराव महाराज गायकवाड यांनी मुद्दाम संदेश पाठवून त्यात सांगितले, "जोतीराव हे भारताचे बुकर. टी वाशिंग्टन आहेत."

महात्मा फुले यांनी सत्कारास मोजक्या शब्दात उत्तर दिले. "**जनी जनार्दन । संत बोलती उत्तर**" या वचनाप्रमाणे मी अल्पसे कार्य केले. मानवांची सेवा हीच देवाची सेवा असे माझे मन मला नित्यहि ग्वाही देत आहे यात्रमाणे केले व पुढेहि करीत राहीन. सत्यशोधक समाजाचे कार्यास तुम्ही निष्ठापूर्वक साह्य करीत जाणे. हजारो वर्षे जे पददलित म्हणून ठरले गेले, यांना माणुसकीचे हक्क देण्यासाठी झटणे यापेक्षा मी दुसरा कोणताच. धर्म मानीत नाही. हेच प्रत्येकाचे कर्तव्य आहे. स्त्रिया व अस्पृश्य यांना त्यांच्या जन्मास येण्याचे साफल्य करणे. त्यांच्या दुर्दशेकडे व हालांकडे आजपर्यंत धर्माच्या व शास्त्राच्या नावावर मुद्दाम डोळेझाक झाली, ती दूर करण्यास मदत करा. मी माझे कर्तव्य केले. यात विशेष असे माझ्या हातून घडले नाही" असे बोलून स्वस्थानी बसताच जमलेल्या जनसमूहाने 'महात्मा फुले की जय' असा घोष केला.

राजेरजवाड्यांचे सत्कार त्यांच्या आश्रितांकडून झाले असतील धनवंताचे श्रीमंतांकडून घडले असतील. परकीय सत्तेपासून मायभूमीची सुटका व्हावयासाठी ज्यांनी प्रयत्न केले त्यांचे सत्कार सुशिक्षितांकडून होणे शक्य आहे, परंतु गोरगरीब, पिळले जाणारे मजूर, केवळ पोटासाठी जगणारे

व अज्ञानरूपी चिखलात फसलेले स्त्रीपुरुष अशा बहुजनांकडून अंतरीच्या भावनेने सत्कार होणारे फक्त महात्मा फुलेच ! म्हणून जोतीराव हेच खरे महात्मा ! संस्कृतीचा जिवंतपणा हा फक्त उच्चवर्णीयात होता. असे असता स्वयंस्फूर्तीने कनिष्ट वर्गाकडून महात्मा पदवी मिळविणारे भारतातील पहिले जोतीरावच !

या समारंभानंतर बऱ्याच वर्षांनी गांधींना महात्मा ही पदवी जनतेकडून मिळाली.

## दोन महात्मे

**जे का रंजले गांजले त्यासी म्हणे जो आपुले।**
**तोचि साधु ओळखावा। देव तेथेचि जाणावा।।**

**– संतश्रेष्ठ तुकाराम महाराज.**

महात्मा फुले व महात्मा गांधी हे भारतातील महात्मे आहेत. प्रथमचे महात्मा फुले. नंतर महात्मा गांधी. दोघेहि शेतकऱ्यात मिसळत. शेतकरी समाजाबद्दल उभयतांना नितांत प्रेम व आदर होता. शेतकरी हाच राष्ट्राचा आधार आहे, या महत्त्वाच्या गोष्टीकडे भारतात प्रथम जोतीरावांनी लक्ष दिले. नंतर महात्मा गांधींनी दिले. या उभयतांनी बहुजनसमाजात स्वातंत्र्याची आवड निर्माण केली. हातात काठी, अर्धा पोशाख, गोरगरीबांबद्दल जिवाची तळमळ. सत्याची आवड व परमेश्वरावर निःस्सीम निष्ठा हे गुण दोघातहि होते असहकारी प्रतिकाराचे तत्त्व जनतेत दोघांनी रुजविले. म. गांधींच्या अगोदर या तत्त्वांची शिकवण म. फुले यांनी दिली. दोघेहि सत्याचे उपासक होते "सत्यमेव जयते" हा शिक्का जोतीरावांच्या पत्रलेखनाच्या कागदावर होता तेच वाक्य आज स्वतंत्र भारताच्या राज्यमुद्रेवर दिसत आहे. बहुजनसमाजाचे दोघेहि खरे कैवारी होते. महात्म्याच्यावर ओढवणारे प्रसंग दोघावरहि आले होते.

"**काही कोळी आणि अक्षरशत्रू लोक ख्रिस्ताला देव समजले. आणि विद्वानांनी त्यांचा जीव घेतला. काही वैश्य आणि गुराखी हेच भगवान बुद्धाचे पहिले शिष्य."–स्वामी विवेकानंद.**

साध्याभोळ्या अशा बहुजनसमाजाने या उभयतांस देवासमान

मानले. परंतु विद्वान म्हणविणाऱ्यांनी त्यांचा प्रत्यक्ष प्राण घेण्याचे प्रयत्न केले. अस्पृश्यता दूर करण्याचे अनेक प्रयत्न त्यांनी केले व त्यांना जवळ केले. महात्मा फुले यांनी अस्पृश्यांच्या हातचे अन्नपाणी उघड ग्रहण करून अस्पृश्यतेचे मूळच नष्ट करण्याचे प्रयत्न केले. म. गांधी चातुर्वर्ण्याचे व जातिव्यवस्थेचे पुरस्कर्ते होते. म. फुले यांना हे मान्य नव्हते. म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे फक्त म. फुले यांनाच महात्मा म्हणत. अस्पृश्यांबाबत म. गांधींना आत्यंतिक प्रेम होते. अस्पृश्य समाजासाठी स्वतंत्र मतदार संघाची मागणी बाबासाहेब आंबेडकरांनी केली. त्यावेळी प्राणांतिक उपोषणाचा प्रयत्न म. गांधींनी केला व बाबासाहेबांचे मतपरिवर्तन केले. कारण अस्पृश्यांनी स्पृश्य हिंदूपासून दूर जाऊ नये हाच महात्मा गांधींचा पवित्र हेतू होता.

भारत पूर्ण स्वातंत्र्य भोगू लागला अशा वेळी केवळ नाइलाजास्तव डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बौद्ध धर्म स्वीकारणे भाग पडले. अशा वेळी महात्मा गांधी हयात असते तर सनातन हिंदूंची बधिर मने त्यांनी जागृत केली असती व कर्मठ वृत्तीच्या सनातनी लोकांनी आपला अस्पृश्यांबद्दलचा दृष्टिकोन सोडावा म्हणून प्राणांचे मोलहि दिले असते. आणि लक्षावधी अस्पृश्यांस बौद्ध धर्मात जाऊ दिले नसते! पण यावेळी भारतात एकहि महात्मा नव्हता.

**"लढाईच्या गोष्टी ऐकताचि सुख। करिता हे दुःख अवघड"**
**तैसि हरीभक्ति सुळावरील पोळी। निवडे तो बळी विरळा शूर ॥**
**–तुकाराम महाराज**

स्त्रिया, अस्पृश्य, शेतकरी, मजुर, पीडित व अशिक्षित यांच्यासाठी जोतीरावांनी सारी हयात एखाद्या व्रतधारी महापुरुषासारखी निष्ठेने घालविली. लोकोद्धाराचा मार्ग स्वतःनीने खुला केला. यासाठी टीका, छळ, अपमान, विरोध वगैरे सर्व गोष्टी त्यांनी साधुवृत्तीने आनंदाने सहन केल्या. म्हणून ते महात्मा पदवीचे धारक ठरले. म. फुले व म. गांधी यांनी पिडित जनतेच्या उद्धारासाठी प्रयत्न केले. मानवी हक्कांची देणगी दिली. म्हणून भारतात फक्त हे दोनच महात्मे!

## सयाजीराव महाराज (बडोदे)

रामचंद्रराव धामणस्कर हे मराठा जातीतील होते. शिक्षण मॅट्रिकपर्यंत

परंतु अंगच्या हुशारीवर ते बडोदे राज्याचे दिवाण बनले होते. ते महात्मा फुले यांचे एकनिष्ठ भक्त होते. सत्यशोधक समाजाच्या वार्षिक समारंभास ते नियमाने हजर राहत.मामा परमानंदांशी त्यांचा स्नेहसंबंध होता. महात्मा फुले यांच्या श्रेष्ठ कार्याची एकंदर माहिती सयाजीराव महाराजांना त्यांनी दिली. त्यापूर्वीहि म. फुले यांच्या कार्यासंबंधी महाराजांना कल्पना होतीच.

म. फुले यांनी बडोद्यास भेट द्यावी म्हणून महाराजांनी आग्रहपूर्वक लिहिले. त्याप्रमाणे सन१८८४ मध्ये बडोद्यास जोतीराव गेले. प्रथमभेटीतच महाराज आकर्षित झाले. त्यांची व्याख्याने त्यांनी करविली. त्यांपैकी काही प्रसंगी महाराज जातीने हजर राहिले. त्यांच्याशी त्यांनी खाजगी चर्चा केली. जोतीरावांच्या ऋषीतुल्य त्यागी जीवनाचा व विचारांचा महाराजांच्या मनावर विशेष परिणाम झाला. त्यामुळे महाराजांची दृष्टी समाजसुधारणेकडे वळली. आपल्या राज्यात शैक्षणिक व सामाजिक सुधारणा त्यांनी केल्या. प्रजेच्या मोडक्यातोडक्या संसारास कररूपी जळवा लावून आणलेला पैसा राजेमहाराजे स्वतःची पापे नष्ट होण्यासाठी दानधर्माच्या नावावर भरमसाठ खर्च करीत. त्याप्रमाणे बडोदे राज्यात खिचडी (कोरडा सिधा) ब्राह्मणांस दररोज वाटण्याची प्रथाच होती. ती परंपरा सयाजी महाराजांनी बंद केली. हाच पैसा प्राथमिक शिक्षण व समाजसुधारणेकडे ते खर्च करू लागले. तसेच अस्पृश्यतेच्या उच्चाटणास सुरुवात केली. महाराजास सत्यधर्माची दृष्टी जोतीरावांमुळे मिळाली. त्याचे दृश्यफल म्हणजे सन १९३४ साली अमेरिकेत सॅनफ्रँसिको शहरी विश्वधर्म परिषद भरली. तिचे अध्यक्ष सयाजीराव होते. जोतीरावांचे सर्व वाङमय महाराजांनी वाचले होते. त्याबद्दल त्यांना आदर होता. त्यांची दृष्टी विश्वव्यापी होण्यास हे ग्रंथ कारणीभूत झाले. अमेरिकेत 'निग्रोंची गुलामगिरीतून सुटका झाल्यानंतर त्यांची सर्वांगीण सुधारणा बुकर टी. वॉशिंग्टन या निग्रो पुढाऱ्याने केली. तद्वत भारतात बहुजनसमाज हजारो वर्षे सामाजिक दास्यात होता. त्यातून त्याची सुटका जोतीरावांनी केली. म्हणून जोतीरावांना सयाजीराव भारताचे बुकर टी. वॉशिंग्टन म्हणत.

मामा परमानंद हे जोतीरावांचे मित्र होते. तसेच सयाजीराव महाराजांचे स्नेही होते. त्यांनी तारीख ३१ जुलै १८९० रोजी महाराजांना पत्र

लिहिले. त्यातील महत्त्वाचा भाग:–" जोतीरावांचे अखेरचे व महत्तम स्वरूपाचे व सार्वजनिक स्वरूपाचे कार्य म्हटले म्हणजे ते म्हणतात त्याप्रमाणे अनेक बंधनातून मराठ्यांची मने मुक्त करणे हेच होय. आयुष्यातील अखेरचा काळ त्यांनी या कार्यासाठी खर्च केला. त्यासाठी त्यांनी अपरंपार लिहिले, उपदेशिले, असंख्य व्याख्याने दिली. गाणी रचिली व गायली, बोलण्याप्रमाणे कृती करून दाखविली आणि मला वाटते की, दख्खनमधील व इतरत्र असलेल्या मराठा समाजात आजवर आपल्यावर होत असलेल्या अन्यायाची जी जाणीव निर्माण झाली आहे तिला त्यांचेच एकट्याचे परिश्रम कारण आहेत. तसेच आपण तेवढे उच्चवर्णीय व इतर सर्व कनिष्ठ या जाणिवेने त्या विशिष्ट वर्गातील लोकांना जी बंधने लादली आहेत व पूर्वी नव्हती त्या शृंखलातून आपण आमची सुटका करून घेतली पाहिजे. त्यांच्यापुढे निमूटपणे मान न वाकविता आपण स्वतंत्र बाण्याने व बाणेदारपणाने वागले पाहिजे. ही जाणीव उत्पन्न व्हायला जोतीबाचे परिश्रम कारणीभूत झाले आहेत."

अठ्याहत्तर वर्षांपूर्वीच्या या पत्रावरून हेच स्पष्ट होत आहे की महाराष्ट्रातील बहुजनसमाजास स्वाभिमानाची व स्वत्वाची देणगी ही महात्मा फुले यांच्यामुळेच मिळाली.

## महात्मा फुले यांच्या स्मारकाचे मूळ कल्पक सयाजीराव महाराज

महात्मा फुले अर्धांगवायूने आजारी पडले. त्यावेळी महाराजांनी मदत केली. त्यांच्या मृत्यूनंतर पत्नीस व मुलास पेन्शन सुरू केले. महात्मा फुले यांची आज जी स्मारके दिसत आहेत त्याचे कल्पक सयाजीराव महाराज आहेत. बडोद्याचे दिवाण धामणस्कर यांनी मामा परमानंद यांना ता. १ मार्च सन १८९२ रोजी पत्र लिहिले. त्यातील महत्त्वाचा भाग : "महाराजांच्या बोलण्यात आणखी एक गोष्ट आली. ते म्हणाले, "जोतीरावांचे स्मारक होणे जरूर आहे आणि ते करण्याचे कोणी मनावर घेत असल्यास त्यांच्या स्मारक फंडासाठी मदत करण्याची माझी तयारी आहे.' "

महात्मा फुले या राष्ट्रपुरुषाची योग्यता व श्रेष्ठपणा प्रथम सयाजीराव महाराजांनी ओळखला होता. या महापुरुषाचे स्मारक हे समाजास

आदर्शवत राहून निरंतरचे मार्गदर्शक ठरणार हे सयाजीराव महाराजांनी प्रथम ओळखले होते. म. फुले यांची खरी योग्यता व त्यांच्या कार्याचे महत्त्व ओळखणारे व त्यांचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवून सुधारणा करणारे सयाजीराव महाराज व कोल्हापूरचे छत्रपती शाहू महाराज हेच दोन राजे होत.

## संतवृत्तीचे प्रसंग

संत–महात्मे व त्यांचे वैरी हे एकाच वेळी जणू जन्मास येतात. अशा अनेक उदाहरणांची ग्वाही इतिहास देत आहे. महात्मा फुले यांचे भक्त त्यांची व्याख्याने ठेवून सन्मान करीत. त्यांच्या मुखातून स्रवणाऱ्या ज्ञानगंगेने पावन होत.

परंतु एका समारंभात पुष्पहाराचा वर्षाव महात्माजींवर होत असता एका मानवहिताच्या वैऱ्याने जिवंत सर्प हारात बांधला. स्वतःचा जीव बचावून, तो हार महात्माजींच्या गळ्यात घातला. परंतु त्या विषारी प्राण्याने आपला जन्मजात गुण सोडला! निश्चल वृत्तीने महात्म्याच्या मुखाकडे तो सर्प पाहू लागला. या दृश्याकडे एका भक्ताचे लक्ष गेले. त्याने तत्काळ महात्माजीस सांगितले, 'हारात जिवंत सर्प आहे, जपून फेका.' हार संतवृत्तीने महात्माजींनी बाहेर टाकला. त्या सर्पास मारण्यास त्यांनी मनाई केली व म्हणाले, "ह्या प्राण्याने आपला जन्मजात गुण सोडला. परंतु जे कर्मठ वृत्तीचे असतात ते ते आपला स्वभाव मात्र विसरत नाहीत." अशाच एका प्रसंगी जिवंत विंचू बांधून तो हार महात्माजींच्या गळ्यात घालण्यात आला! असे अनेक प्रसंग घडले. परंतु त्यापासून त्यांना त्रास कधीच झाला नाही. याचे कारण त्यांचे संतहृदय! त्यांच्या ठिकाणी द्वेष नावासहि उरला नव्हता. मनुष्यप्राण्याकडेच नव्हे तर अखिल चराचरांकडे ते परमात्म भावनेने पाहात. कारण ते संतपदास पोहोचले होते.

**"भंगी, महार, इत्यादी जाती पशूंच्या पंक्तीला येऊन बसल्या आहेत. परंतु हे पशुत्व त्यांच्यावर कोणी लादले? त्यांच्यासंबंधी आमची वागणूक अत्यंत निर्दयपणाची आहे.–स्वामी विवेकानंद.**

स्वतःचे कष्ट हेच मुख्य भांडवल, दिवसभर केलेल्या कष्टातूनच संध्याकाळची भाकरी निर्माण होणार, असे अस्पृश्य समाजातील नवराबायको

मजुरीसाठी बाहेर गेले. अशा वेळी त्यांचा पाचसहा वर्षांचा मुलगा भुकेमुळे ओक्साबोक्सी रडू लागला. डोळ्यातील अश्रू नाकातील शेंबडास भेटले. असा मुलगा महात्माजींच्या नजरेस पडला. त्यांचे संतहृदय कळवळून आले. उपरण्याने त्यांनी त्याचे तोंड साफ केले. दुकानातून पोहे आणून त्याला खाण्यास दिले. हे पाहून बरोबरचा सुशिक्षित त्यांना म्हणाला, "हा मुलगा अस्पृश्याचा असता त्याचे तोंड तुम्ही साफ केले. याबद्दल तुम्हांस काहीच वाटले नाही?" महात्माजी म्हणाले, "त्याचे तोंड साफ केल्याने उलट माझे हृदय स्वच्छ झाले. त्याचा व माझा निर्माता एकच आहे. उच्चवर्णीयांनी अस्पृश्यांस ही दशा आणली."

**"जगातील सर्व दुष्ट, दुःखी, कष्टी आणि गरीब लोकांचे आत्मे जेथे एकत्रित होतात तोच समवादी परमात्मा माझ्या पूजेचा हेतू होय. या जिवंत परमेश्वरास सोडून काल्पनिक पडछायेमागे का धावता आणि एकमेकांशी भांडणे करून लढाया का करता? या प्रत्यक्ष परमेश्वराचेच पूजन करा."—स्वामी विवेकानंद**

महात्मा फुले आळंदीस जात होते. त्यांना एकाने प्रश्न केला, "तुम्ही देव मानीत नाही. मग यात्रेस का जाता?" ते म्हणाले, "मी देव मानतो. याच्या अस्तित्वावर माझी पूर्ण श्रद्धा आहे. परंतु तो देवळात नाही. देवळे ही पुढाऱ्यांची दुकाने आहेत."

वाटेत असह्य स्थितीत एक वारकरी त्यांना दिसला. तो रस्त्याच्या बाजूस पडला होता. प्राणांतिक वेदनांनी तो तळमळत होता. वारकरी त्याच्याकडे लक्ष न देता जात होते. **"भूती भगवद्‌भाव । मात्रासहित जीव ।"** या भागवत-धर्माच्या तत्त्वाकडे कोणी लक्ष दिले नाही. महात्मा फुले त्याच्याजवळ गेले. त्याला पाणी पाजले, खाण्यास दिले. त्याच्या प्रवासाची सोय केली. अशा वेळी तो डोळ्यात अश्रू आणून म्हणाला, "बाबा, तू खरा वारकरी आहेस. तू न भेटतास तर मी देवाचे नाव न घेता पाणी पाणी म्हणत मेलो असतो."

महात्मा फुले यांचे धार्मिक आचरण बाह्य अवडंबरात नव्हते. ते वृत्तीत होते. दुःखी, कष्टी, वृद्ध, अपंग, आजारी यांच्या सेवेस ते परमात्मसेवा मानीत. ते म्हणत, "धर्मतत्त्वे प्रत्यक्ष आचरणात पाहिजेत. बाह्यविधी हे धर्माचे

खरे स्वरूप नाही. त्यामुळे फक्त धार्मिक दांभिकपणा वाढतो." अनाथाच्या सेवेसाठी आयुष्याचा बराच भाग त्यांनी खर्च केला.

**जन्म--साफल्य**

**"जन्मासी आलीया वेचे पळ पळ। घातले घड्याळ आयुष्याचे ।।"**

महात्मा फुले यांच्या वयास त्रेसष्ठ वर्षे झाली. त्यातील त्रेचाळीस वर्षे त्यांनी समाजसेवेसाठी देह झिजविला. शरीरधर्माकडे लक्ष दिले नाही की विश्रांती घेतली नाही. कर्मयोग्याप्रमाणे ते कर्म करीत राहिले. आयुष्यात एकदाच आजारी पडले. आजारात उजवा हात निकामी झाला तर डाव्या हाताने 'सत्य धर्म' हा ग्रंथ लिहिला. ते ध्येयसाध्या-साठी शरीरास महत्त्व देत नव्हते. अखेरचा आजार आला व तो प्राण घेऊन गेला.

**"उपजला प्राणी न राहे संसारी। बैसला शेजारी काळ उसा ।।"**

**—तुकाराम महाराज**

जन्मदिवशीच मृत्यूचा दिवस ठरलेला असतो. तारीख २७ नोव्हेंबर सन १८९० हा काळ दिवस उजाडला. या दिवशी अखिल महाराष्ट्रातील पीडित जनतेवर दुर्दैवाची छाया पडण्यास सुरुवात झाली. सूर्यनारायण जसजसा वर येऊ लागला तसतसा हा दीनोद्धारांचा सूर्य मावळण्याच्या पंथास लागला. सूर्य मावळल्यावर या महात्म्याची प्राणज्योत मावळण्याचे चिन्ह स्पष्ट दिसू लागले. सती सावित्री व मुलगा यशवंत हे रात्रंदिवस जवळ होते. त्यांना देवाची प्रार्थना करण्यास सांगितले. असंख्य भक्त जमा झाले. जोतीरावांच्या दर्शनार्थींनी तर त्या घरास जत्रेचे स्वरूप आणले होते. डॉ. घोले आपले सर्व वैद्यकीय कौशल्य पणास लावीत होते. त्यांना उपचार करण्यास म. फुले यांनी मनाई केली. सर्वांस शांततेने स्थिर बसण्यास सांगितले. नेहमीच्या आवाजात निर्धाराच्या स्वरूपात ते म्हणाले, "जन्मलेला प्राणी हा मरणारच ! तुम्ही सत्याचे उपासक बना, सत्य हाच धर्म माना. कोणासहि फसवू नका, फस-णारास मार्ग दाखवा, शेतकरी, मजूर, स्त्रिया, अस्पृश्य व अज्ञानी यांच्या उन्नतीसाठी झटा. हजारो वर्षे ते जुलुमाखाली चेंगरले गेले. त्यातून त्यांची सुटका शिक्षणामुळे होईल. शिक्षणप्रसार व सत्यधर्माचा प्रचार करा. याच

गोष्टीस मी धर्म मानीत होतो. तुम्ही तेच करा व जन्माचे साफल्य साधा." असे बोलून त्यांनी देवाची प्रार्थना केली व म्हणाले, "भगवंता, आता उशीर न लावता पदरात घे." असे म्हणताच जोतीची प्राणज्योत विझली !

रात्री दोन वाजून वीस मिनिटांनी ते परमेश्वरस्वरूपात विलीन झाले. (२८ नोव्हेंबर १८९०) सकाळी प्रेतयात्रा सुरू झाली. हजारो भक्तांनी आपल्या उद्धारकर्त्यास हार अर्पण केले. असंख्य स्त्री–पुरुषांच्या अश्रूंनी तो रस्ता ओला होऊ लागला. दुःखास पारावार राहिला नाही स्मशानात डॉ. घोले, न्या. रानडे, रा. ब. लोखंडे, वाळवेकर, ससाणे वगैरेंची महात्म्याच्या गुणवर्णनपर भाषणे झाली. त्यात भाऊराव कोंडाजी पाटील यांचे अत्यंत स्फूर्तिदायक भाषण झाले. "शूद्रादि अतिशूद्रांचा उद्धारकर्ता", "स्त्री व अस्पृश्य यांचा त्राता", "मानवी हक्कांचा संरक्षक व शेतकरी व मजूर यांचा मार्गदर्शक कायमचा गेला !" महाराष्ट्रातील मराठी व इंग्रजी वर्तमानपत्रांनी लेख लिहून सांगितले, "महाराष्ट्राचा आद्य सुधारक व दलितांचा पुढारी गेला !"

## संसारसमाप्ती

सती सावित्रीबाई यांची पतिनिष्ठा व पतिभक्ती अत्यंत श्रेष्ठ अशी होती. त्या माऊलीने आपले सारसर्वस्व त्यांच्या समाजसेवेस वाहिले होते. तिचे स्त्रीशिक्षण, प्रेम व समाजसुधारणा त्या काळी अखिल भारतात इतरत्र सापडणे कठीणच ! अशी ही राष्ट्रमाऊली सन १८९७ साली प्लेगच्या आजाराने स्वर्गवासी झाली. मुलगा यशवंत मेडिकल डिप्लोमा मिळवून सैन्यात नोकरीस होता. तोहि त्याच वर्षी प्लेगने गेला ! अशी म. फुले यांची संसारसमाप्ती झाली. पण त्यांनी जन्मास येऊन महात्मा ही पदवी मिळवून जन्मसाफल्य साधले.



# जागती ज्योत

कास घालोनी बळकट। झालो कळीकाळासी नीट
केली पायवाट भवसिंधू वरुनि ॥१॥
यारे यारे लहान थोर। याति भलते नारी नर। करावा विचार।
न लगे चिंता कोणाशी ॥२॥

– संत तुकाराम महाराज

भारताचे महाराष्ट्र हेच मुख्य क्षेत्र ! त्याचे मूळ सत्य स्वरुप नष्ट झाले होते. त्या स्थळी ब्राह्मण्याची असंख्य काटेरी झुडपे, स्पर्शास्पर्शाच्या बोरी, विषमतेच्या बाभळी, वर्णश्रेष्ठाचे निवडुंग, भेदाभेदाची दाट पसरलेली हरळी (हे खोलवर जाणारे गवत) यांनी ते क्षेत्र व्यापून टाकले होते व त्याचे मूळ स्वरुप नष्ट केले होते.

महात्मा फुले हे माळी असून पिढीजात शेतकरी होते. हे क्षेत्र साफ करण्याचे त्यांनी ठरविले. समतारुपी कुऱ्हाड व सुधारणा हीच जणू कुदळ हातात घेतली. निष्ठेने व धैर्याने ते साफ केले. मानवहिताचा लोखंडी नांगर हाती धरला. दणगट हाताने व बळकट मनाने सतत चाळीस वर्षे तो नांगर त्यांनी हाकला. त्याचे सारे थर उफाळून वर आणले व राष्ट्रीय उपयोगासाठी ते क्षेत्र योग्य बनविले. त्यात समता, समभाव, अस्पृश्योद्धार स्त्रीसुधारणा व मानवताधर्म अशी रोपे स्वहस्ते लावली. त्याच्या संरक्षणासाठी देहाचे काटेरी कुंपण भोवती उभे केले. त्यांच्या वाढीसाठी प्राणाच्या मोलाने निरनिराळे अनेक प्रयत्न केले.

धार्मिक हक्काच्या नावावर होणाऱ्या जुलमास महात्मा फुले यांनी हादरा दिला. हजारो वर्षे रुढीरुपी चिखलात रुतलेले अस्पृश्य व स्त्रिया यांच्यामध्ये मनुष्यपणाचा व मानवी हक्काचा हुरूप त्यांनी निर्माण केला. कोट्यावधि लोकांच्या अन्तःकरणात नवविचाराचा व नवआचाराचा संचार उत्पन्न केला. धर्माच्या नावावर जुलमाचा व भोंदूपणाचा उघड बाजार

मांडणाऱ्या नकली दुकानदारांवर गंडांतर आणले. हजारो वर्षे पारतंत्र्य भोगण्यास कारणीभूत असलेली विषमता ठार केली. स्वातंत्र्याचे मूळ जी समता ती निर्माण केली. कनिष्ठांच्या सुधारणेसाठी व शिक्षणप्रसारासाठी ब्राह्मण्याचा हिमालय त्यांनी गदगदा हालविला. अन्यायाचा प्रतिकार केवळ असहकाराने करता येतो हे जनतेस पटविले व करून दाखविले. कनिष्ठ वर्गाच्या गळ्यात पुराणांचे बंधन हजारो वर्षे अडकविलेले होते ते त्यांनी धैर्याने तोडले.

## क्षत्रियत्वाची देणगी

शिवछत्रपतीने राज्याभिषेक करून क्षत्रियत्व प्रगट केले. परंतु पेशवाईत नाना फडणवीसाने मराठे सरदार शूद्र म्हणून लिहिण्यास सुरुवात केली. नंतरच्या काळात पेशव्यांनी क्षत्रिय शब्द परशुरामाच्या अवताराच्या नावावर नष्ट केला. परंतु म. फुले यांनी परशुरामाच्या काल्पनिक अवताराचे बंड फोडले. त्यामुळे मराठे, माळी, धनगर, भावसार, सोमवंशी आर्य हे सर्व त्यावेळपासून स्वतःस क्षत्रिय म्हणू लागले.

मानसिक व धार्मिक गुलामगिरी नष्ट करण्याचे अनेक प्रयत्न केले जनहितासाठी त्यांनी वरिष्ठ वर्ग व सरकार यांच्या नाराजीची कधीच पर्वा केली नाही. मानवी सुखाचे, समानतेचे व नैतिक हक्कांचे युग त्यांनी निर्माण केले.

## गैरसमज

त्या काळात म. फुले इंग्रज राज्याच्या पूर्णतः विरुद्ध नव्हते; पेशवाईतील कठोर जुलमाची त्यांना कल्पना होती. इतकेच नाही तर पेशवाईतील जुलमाने होरपळलेले शेतकरी, मजूर, स्त्रिया व अस्पृश्य असे त्यांच्या वेळी हयात होते. त्यांच्या प्रत्यक्ष तोंडून ब्राह्मणी राज्यातील अत्याचार, अन्याय वा कठोरता त्यांना ऐकण्यास मिळाली होती. शिवाय ऐतिहासिक घटनांचे त्यांना ज्ञान होते. त्या आधारावर ते स्पष्ट सांगत, 'देशी व मुसलमानी राज्यात स्त्रिया, अस्पृश्य व बहुजनसमाज यांना आपल्या उन्नतीचे हक्क व स्वातंत्र्य कधीच नव्हते. ते या इंग्रजी राज्यात आहेत. ब्रिटिश राजवट कधीतरी खलास होणारच ! कारण समाज सुशिक्षित व जागृत झाला तर तो आपल्या

इच्छेप्रमाणे घडवून आणील.' त्याकाळी पूर्ण स्वातंत्र्याची कोणतीच चळवळ देशात नव्हती. म्हणून त्यांनी धार्मिक व सामाजिक सुधारणेचे कार्य सुरू केले. त्यावेळी राष्ट्रास खरी जरूर त्याच कार्याची होती. या महान कार्यासाठी संसारसुखास स्वहस्ते त्यागरूपी अग्नी लावला. त्याच्या उजेडात जनहित पाहिले व त्याचे महत्त्व स्वकृतीने जनतेस पटविले. मोठमोठे नामवंत दादाभाई नवरोजी, रानडे, वगैरे अनेक जण सरकारी नोकरीच्या मोहास त्याकाळी बळी पडले होते. एवढेच नाही तर लोकमान्य टिळकांनीसुद्धा मुन्सफीच्या नोकरीसाठी अर्ज केला होता. परंतु सरकारी नोकरीच्या मोहाचा स्पर्श सुद्धा म. फुले यांनी केवळ जनहितासाठी मनास होऊ दिला नाही.

त्याकाळी महाराष्ट्रात मोठमोठ्या व्यक्तींना ब्रिटिश राज्य संपावे असे वाटत होते. परंतु त्यांना पेशवाई काळात किंवा ब्राह्मण्यात शिरण्याची इच्छा होती. राजकीय कार्यासाठी त्यांनी मोठा त्याग केला हे सत्य आहे. पण कनिष्ठवर्गाच्या दुःखांची, हालाची व अज्ञानाची त्यांना मुळीच जाणीव नव्हती. बदलत्या काळाचे मूल्यमापन खऱ्या अर्थाने त्यांना करता आले नाही. त्यांचे स्फूर्तिस्थान भूतकाळ होता. राजकीय शिखराच्या शिडीवरच्या शेवटच्या पायरीवर ते उभे होते. परंतु तळाशी बहुजनसमाज कोणत्या हालात व विपन्नावस्थेत आहे या महत्त्वाच्या गोष्टीकडे ते लक्ष देत नव्हते. स्वातंत्र्यासाठी बेंबीच्या देठापासून ते टाहो फोडीत. परंतु आपल्या मागासलेल्या बांधवांस साधे माणसकीचे हक्क देण्यास ते तयार नव्हते. त्याकाळी लोकोद्धाराचे खरे कार्य फक्त म. फुले पोटतिडकीने करीत होते. [लोकमान्य टिळकांचे राजकीय कार्य अत्यंत त्यागाचे व श्रेष्ठ दर्जाचे आहे. परंतु त्यावेळचे त्यांचे 'केसरी' व 'मराठा' ह्या पत्रातील लेख पाहिले तर स्त्रीशिक्षण, अस्पृश्यतानिवारण व सामाजिक सुधारणेस ते अनुकूल नव्हते, हेच दिसून येते. याबाबत डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे हे 'ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद' उत्तरार्ध (वसंत, जुलै १९५२) च्या लेखात म्हणतात, "विष्णुशास्त्री व व टिळक यांनी नव्या सुधारणेस विरोध केला. इतकेच नव्हे तर टिळकांनी राजर्षी शाहू छत्रपतींच्या वेदोक्त प्रकरणात व पुढे पटेल बिलाच्या वेळी सनातन्यांची बाजू घेतली ही गोष्ट अत्यंत वाईट झाली. त्यामुळे आपल्या समाजाची मोठी हानी झाली आहे हे खरे आहे."

म. फुले आग्रहाने सांगत ," प्रथम सामाजिक सुधारणा झाली पाहिजे. नंतर राजकीय सुधारणा." स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणत, " प्रथम सामाजिक सुधारणा पाहिजे, त्याशिवाय स्वातंत्र्य मिळाले तरी ते टिकणे अशक्य !" हेच म. फुले जनतेस त्याकाळी सांगत.

ब्रिटिश राजसत्तेने शारीरिक दृष्टचा गुलाम केले. परंतु हजारो वर्षे समाजास ब्राह्मण्याने बौद्धिक दृष्टचा गुलाम केले. ब्रिटिश पिळवणुकीने हिंदुस्थान दरिद्री बनत आहे. परंतु आमच्यातील पुढारलेल्या वर्गाने बहुजन समाजास अन्नास महाग व कपडयास पारखे केले आहे. त्यातून त्यांची प्रथम सुटका झाली पाहिजे. त्यांच्या दारिद्रयाकडे व हालाकडे लक्ष दिले पाहिजे असे महात्मा फुले कंठरवाने सांगत व त्याप्रमाणे जनतेत जागृती करीत.

## राष्ट्रभक्तांची इच्छा

राजकीय पुढाऱ्यांचे असे मत होते की, ' राज्यकारभारात भारतीयांचा भाग पाहिजे, मोटमोठचा अधिकारांच्या जागा भारतीयांना पाहिजेत तर म. फुले म्हणत, " राज्यकारभारात सर्व जातींचा प्रवेश झाला पाहिजे. इतकेच नाही शूद्रादि शूद्रांनासुद्धा सरकारी नोकऱ्या देणे जरूर आहे. वशिलेबाजी, लाचखाऊ वृत्ती व काळाबाजार ह्या गोष्टी राज्यकारभारातून मुक्त झाल्या पाहिजेत. अरेरावी व लाचखाऊ सरकारी नोकरांवर कडक बंधने पाहिजेत." असे लोक परकीय असोत अगर स्वकीय असोत, अशांच्या विरुद्ध ते आवाज उठवीत. आज देशास पूर्ण स्वातंत्र्य लाभले तरी म. फुले यांच्या या म्हणण्याची अत्यंत आवश्यकता या काळातहि आहे हे दिसून येईल.

## लूट

इंग्रज हे देशाची लूट करीत आहेत, म्हणून देशभक्त त्यांच्या नावाने ओरड करीत. परंतु शेतकऱ्यांची लूट सावकार करतात याबाबत सरकारने काही प्रयत्न केले. त्या त्या प्रत्येक वेळी सर्वच देशभक्तांनी व वर्तमानपत्रकारांनी सावकारांची बाजू घेतली. शेतकऱ्यांची घेतली नाही. फक्त म. फुले हेच शेतकऱ्यांची बाजू एकटेच घेत. आपल्यावरील होणाऱ्या अन्यायाबाबत ओरड करण्याची शेतकऱ्यास त्यांनी शिकवण दिली.

## शेतकरी

त्या काळी शेतकरी हा अज्ञानात फसलेला होता. त्याच्या भोळेपणाचा व प्रामाणिकपणाचा फायदा सावकार व सरकार घेत असे. शेतकऱ्यांच्या हिताकडे लक्ष न देता सरकार करवाढ करीत होते. याबाबत म. फुले यांनी शेतकऱ्यात जागृती केली. सरकारला त्यांच्या हालांची व अज्ञानाची जाणीव होण्यासाठी ते प्रयत्न करीत. शेतकऱ्यावरील कराच्या प्रमाणात सरकार त्यांच्या सुधारणेसाठी प्रयत्न करीत नाही म्हणून ते सरकारला अनेक सूचना करीत. यांत्रिक युगाने भारताचे छोटे छोटे हस्तव्यवसाय बसतील. देशाचा सर्व भार शेतीवर पडेल. त्यासाठी शेतकऱ्यात शेती सुधारणेबाबत जागृती करणे, त्यांची औते पुराण काळातील आहेत— त्याऐवजी सुधारलेली औते देणे, खताचे महत्त्व पटविणे, पाश्चात्य देशातील सुधारलेल्या शेतीची त्यांना माहिती देणे, हजारो वर्षात जमिनीस बंदिस्ती नाही. तिची धूप होत आहे. ती थांबविली पाहिजे. ती निकस झाली आहे. ती सुधारली पाहिजे. जास्तीत जास्त जमीन पाण्याखाली येण्यासाठी हवे ते प्रयत्न करणे, परदेशातील दुभाळ जनावरे व बकऱ्या आणणे व त्यांच्या जोपासनेचे शिक्षण देणे, जनावरांसाठी व मनुष्यांसाठी सर्वत्र दवाखाने सरकारने काढणे, शेतीचा धंदा हा भांडवलाचा आहे— म्हणून वेळच्या वेळी शेतकऱ्यास सरकारने कर्जरूपाने पैसा देणे व प्रामाणिकपणाने त्यांच्या पदरात तो पडेल असे पाहणे वगैरे गोष्टी सरकारला सुचवून शेतकऱ्यास सुधारलेल्या पद्धतीने शेती करण्याबाबत आग्रहाने सांगत. शेतकऱ्यांच्या सुधारणेसाठी त्यापूर्वीच्या काळात असे प्रयत्न केल्याचे आढळत नाही. म. फुले यांच्या शिकवणुकीचे प्रत्यंतर आज महाराष्ट्रात सर्वत्र शेतकऱ्याच्या व शेतीसुधारण्याच्या कार्यात दिसत आहे.

## माळी नगर, सहकारी साखर कारखाने व बागायतदार

म. फुले माळी समाजातील आहेत. त्यांनी सुचविलेल्या गोष्टी माळी समाजाने अंमलात आणल्या. सुधारलेल्या पद्धतीने ते शेती करू लागले. कै. हणमंतराव गिरमे व त्या काळचे पुढारी यांनी माळी समाजाच्या वसाहती निर्माण केल्या. प्रगतीच्या मार्गास तो समाज लागला. सुधारलेल्या पद्धतीने

सहकार्य व संघटना समाजात निर्माण केली. त्याचे दृश्य फळ म्हणजे दिमासवड माळी साखर कारखाना, माळीनगर, जि. सोलापूर.

माळीनगर ही भारतातील शेतकऱ्यांची आदर्श अशी वसाहत आहे. म. फुले यांचा भव्य असा पुतळा त्या ठिकाणी आहे. तेथील शेतकऱ्यास तो जणू ध्येयजागृत करीत आहे. शेती व शेतकरी यांची सुधारणा तेथे विशेष झाली आहे. माळरानाचे नंदनवन बनले आहे. तेथील एकंदर प्रगती पावलागणिक महात्मा फुले यांचे शेतीसुधारणेचे तत्त्वज्ञान जणू सांगत आहे, असा भास होतो. महाराष्ट्रातच नव्हे तर अखिल भारतात माळीनगर हे आदर्शवत आहे.

लोणी (जि. नगर) येथील पद्मश्री विठ्ठलराव एकनाथराव विखे पाटील हे महात्मा फुले यांचे भक्त आहेत. शेतीसुधारणेत त्यांनी म. फुले यांच्या सूचनेचा अवलंब केला. शेतकऱ्यात ऐक्य निर्माण करून प्रवरानगर सहकारी शेतकरी साखर कारखाना निर्माण केला. त्यांचे अनुकरण इतर शेतकऱ्यांनी केले. महाराष्ट्रात अनेक सहकारी साखर कारखाने निर्माण झाले व होत आहेत.

अनेक शेतकरी उत्साहाने शेतीसुधारणेकडे वळले. मोठमोठे बागायतदार बनले. लक्ष्मी त्यांनी घरात आणली. ज्वारी ज्यांना उड पिकवित येत नव्हती ते साखर पिकवू लागले. भर उन्हाळ्यात पायास पादत्राण नसे ते आज मोटारीतून फिरत आहेत. मुलाबाळांना उच्च शिक्षण देत आहेत. याचे मूळ कारण महात्मा फुले यांनी सुधारलेल्या शेतीबाबत केलेली जागृती ! शेतकरी सुखी तर जग सुखी असे महात्मा फुले म्हणत. व तसे सरकारलवा पुढाऱ्यास सांगत.

## मानवतेचा पुरस्कार

म. फुले यांनी मानवता धर्माचा पुरस्कार केला. जात, पंथ, धर्म यांसंबंधीचे भेद त्यांना स्पर्श करू शकले नाहीत. मानवाचे हित हाच त्यांचा धर्म ! ब्राह्मण ब्राह्मणेतर हा शब्द उभ्या आयुष्यात त्यांच्या तोंडातून निघाला नाही. ते फक्त ब्राह्मण्याच्या विरुद्ध होते. ब्राह्मणांच्या नव्हे. त्यांचे खरे सहकारी ब्राह्मण होते. ब्राह्मण स्त्रियांची वपनापासून त्यांनीच प्रथम सुटका केली.

ऋषी-मुनी, शास्त्रीपंडितांनी मानवहिताकडे लक्ष दिले नाही. उलट म. फुले यांनी अखिल मानवहितासाठी तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध ग्रंथ निर्माण केले. व मानवहिताचा मार्ग दाखविला. त्यात जातिभेद, पंथभेद व धर्मभेद यांस थारा दिला नाही तर सामाजिक व धार्मिक ऐक्याचा मार्ग दाखविला. त्यांच्या ग्रंथाची भाषा ही बहुजनसमाजाची रूढ भाषा आहे. त्यामुळे ती बहुजन-समाजाच्या मनाची पकड तत्काळ घेते.

म. फुले यांनी सन १८८४ साली लिहिलेल्या ' शेतकऱ्यांचा आसूड ह्या पुस्तकात पानापानातून व शब्दाशब्दातून त्यांचे शेतकऱ्याविषयींचे तळमळते अंतःकरण जणू ओतू येत आहे. भारतीय शेतकऱ्यांच्या दुर्दशेचे गाऱ्हाणे सर्वप्रथम सरकारी वेशीवर म. फुले यांनी टांगले. शेतकऱ्यांच्या उन्नतीकडे, शेतीसुधारणेकडे सरकारने लक्ष देणे हे अत्यंत जरूर आहे असे सांगणारा हाच पहिला कृषी क्रांतिकारक ग्रंथ !

पुढारलेल्या वर्गातील सुधारकांचे कार्य हे भूतदया व परोपकार या शब्दात अडकले होते. त्यात प्रत्यक्ष कृती नव्हती. म. फुले बोलल्याप्रमाणे कृती करणारे होते. त्यांनी सर्वांगीण सुधारणा घडून आणण्यासाठी लोकमताची पर्वा केली नाही. विरोधास जुमानले नाही. एखाद्या युगप्रवर्तकाच्या कृतीने, निधडया छातीने व असामान्य धैर्याने त्यांनी हे सर्व कार्य केले. सन १८५१ मध्ये पुण्यासारख्या सनातन्यांच्या बालेकिल्ल्यात त्यांनी मुलींची शाळा स्थापन केली. स्त्रीजातीस नोकरीचा दरवाजा खुला करण्यासाठी स्वतःच्या बायकोस मास्तरीण केली. त्याचे दृश्य फळ म्हणजेच आज भारताच्या पंतप्रधानपदावर एक स्त्री विराजमान झाली आहे. सन १८५२ मध्ये भारताच्या गत इतिहासाच्या स्वप्नातहि न दिसणारी अस्पृश्यांची शाळा काढली. त्याचे दृश्यफळ म्हणजे भारतातच नव्हे तर जगन्मान्य महापुरुष डॉ. बाबासाहेब आंबेडकर निर्माण झाले. शेतकरी व बहुजनसमाज यांच्यात शिक्षणप्रसार करण्यासाठी सरकारला सतत तीस वर्षे हालवून हालवून जागे केले. सरकारला व जनतेला सार्वत्रिक शिक्षणाचे महत्त्व पटविले. भारताच्या गत इतिहासात असा प्रयत्न कोणीहि यापूर्वी केला नाही. तो फक्त या महापुरुषाने केला व भारताच्या स्वातंत्र्याचे खरे हित जाणले. व जनतेचे निरंतरचे ते मार्गदर्शक

बनले. आज देशात सार्वत्रिक शिक्षणप्रसार जो दिसत आहे; शेतकरी समाजाचे असंख्य मंत्री दिसत आहेत. त्याचे सर्व श्रेय म. फुले यांनाच आहे.

पुढारलेल्या वर्गातील समाजसुधारकांची सामाजिक व धार्मिक सुधारणा शाब्दिक सहानुभूतीच्या स्वरूपात होती ती कृतीत नव्हती. परंतु महात्मा फुले प्रत्यक्ष कृती करणारे होते. त्यामुळेच त्यांना सामाजिक व शैक्षणिक सुधारणा करता आली.

## ज्योतीच्या प्रकाशात

म. फुले यांनी सामाजिक व शैक्षणिक सुधारणेची ज्योत पेटविली तिच्या प्रकाशामुळे अनेक कार्यकर्ते निर्माण झाले. कै. महर्षि विठ्ठल रामजी शिंदे, भास्करराव जाधव, वासुदेव लिंगोजी बिर्जे, हणमंतराव गिरमे, सी के. बोले, लठ्ठे, जेधे, जवळकर, श्रीपतराव शिंदे, दीनमित्रकार मुकुंद पाटील वगैरे असंख्य ज्ञातअज्ञात कार्यकर्ते महाराष्ट्रभर निर्माण होऊन त्यांनी आयुष्यभर म. फुले यांच्या ध्येयधोरणाचा पुरस्कार केला.

रा. ब. पी. सी. पाटील, रावसाहेब डी. आर. भोसले, शामराव देसाई वगैरे अनेक वृद्ध कार्य करीत आहेत. परंतु हल्लीच्या सार्वजनिक संस्थांतील व कौन्सिलातील मानाच्या जागा यांकडेच अलीकडेच तरुण आपले लक्ष वेधीत असून म. फुले यांच्या ध्येयाकडे दुर्लक्ष करीत आहेत हे शेतकऱ्यांचे व बहुजनसमाजाचे दुर्दैव समजले पाहिजे.

## शिक्षणप्रसार

म. फुले यांच्या ध्येयाप्रमाणे बडोदे येथील सयाजीराव महाराज व कोल्हापूरचे शाहू छत्रपती या उभय राजांनी म. फुले यांच्या तत्त्वांस अनुसरून सामाजिक सुधारणा करून आपल्या राज्यात विशेष शैक्षणिक कार्य केले रावसाहेब डी. आर. भोसले (कोल्हापूर) हे सन १९१३ सालात नाशिक जिल्ह्यात पोलीस फौजदार होते. म. फुले यांचे शिक्षणप्रसाराचे ध्येय त्यांच्या रोमारोमात उसळत असे. नाशिक जिल्ह्यातील शेतकऱ्यात त्यांनी जागृती केली कै. रावसाहेब थोरात (वणी) व गणपराव मोरे यांच्याकडे पुढारीपण दिले. नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाजाची स्थापना सन १९१३ साली केली. याच संस्थेतून कै. भाऊसाहेब हिरे व काकासाहेब वाघ

यांच्यासारखे अनेक कार्यकर्ते निर्माण झाले. सदर संस्थेचे कॉलेज, हायस्कूल वगैरे अनेक शाखा असून नाशिक जिल्ह्यात शिक्षणविषयक मोठी जागृती ही संस्था करीत आहे.

कै. कर्मवीर भाऊसाहेब हिरे हे तर महात्मा फुले यांना दैवतासमान मानीत. त्यांनी मालेगांव (जि. नाशिक) येथे अनेक कॉलेज व हायस्कूले काढली· दऱ्याखोऱ्यात राहणारा जो खरा उपेक्षित आदिवासी समाज यांच्यासाठी डोंगरकपारीत आश्रमशाळा काढून खरे कार्य केले.

पुणे येथे शिक्षणमहर्षी बाबूरावजी तथा बा. ग. जगताप यांनी त्य भागात शिक्षणसंस्था काढून म. फुल्यांची कार्यपरंपरा पुढे चालविली आहे.

कै. पद्मभूषण भाऊराव पाटील यांनी उभे आयुष्य महात्मा फुले यांच्या ध्येयानुसार खर्ची घातले. शिक्षणकार्यास ऋषीतुल्य जीवनाने सुरुवात केली. बायकोच्या अंगावरील दागिने विकून पस्तीस रुपयांवर रयत शिक्षण-संस्था सातारा येथे सुरू केली. या संस्थेचा वडाच्या झाडासारखा महाराष्ट्रभार प्रसार झाला. या संस्थेचे हल्लीचे अंदाजपत्रक काही कोटींवर आहे हीच. एक गोष्ट तिच्या कार्याचे महत्त्व स्पष्ट करीत आहे. सदर संस्थेचे अध्यक्ष ना. यशवंतराव चव्हाण (गृहमंत्री, भारत सरकार) हे आहेत.

कै. बॅ. पंजाबराव देशमुख (उमरावती) हे म्हणत, "महात्मा फुले यांच्यामुळे मी शेतकऱ्याचा मुलगा बॅरिस्टर झालो." त्यांनी कायद्याच्या बाजारात उभे राहून स्वसुख संपादिले नाही तर म. फुले यांच्या तत्त्वज्ञाना-नुसार शिक्षणकार्य केले. त्यांच्या कार्याने साऱ्या विदर्भातील अनेक गावे व्यापली. त्याच्या संस्थेचे बजेट कोटीवर आहे.

कर्मवीर डॉ. दादासाहेब घोगरे (धुळे) हे सतत पंचावन्न वर्षे महात्मा फुले यांच्या तत्त्वाचा प्रसार करीत आहेत. त्यांनी शिक्षणकार्यासाठी मोठा स्वार्थत्याग केला. कॉलेज, हायस्कूल वगैरे संस्था ते चालवीत आहेत.

बौद्धवासी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सतत तीसपस्तीस वर्षे महात्मा फुले यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार दलित समाजात करून तो समाज जागृत व स्वाभिमानी बनविला. अनेक कॉलेज व शिक्षणसंस्था महाराष्ट्र-भर स्थापन करून दलित समाज महात्मा फुले यांच्या ध्येयानुसार स्वोद्धाराच्या मार्गास लावला.

महाराष्ट्र, विदर्भ व मराठवाडा या भागात असंख्य कार्यकर्ते शिक्षण-संस्था स्थापून बहुजनसमाजात आज शिक्षणप्रसाराचे कार्य करीत आहेत. त्यांच्या त्या श्रेष्ठ कार्याची माहिती स्थलाभावी देता येत नाही.

हल्ली शिक्षणप्रसार सर्वत्र दिसत आहे. याचे मूळ कारण महात्मा फुले यांनी प्रथम पेटविलेली शिक्षणरूपी ज्योत. त्यांच्याशिवाय असा प्रयत्न यापूर्वी कोणी केला नाही हे इतिहास ग्वाही देऊन सांगेल.

## जोतीची देणगी

भारतरूपी महापुरुषाचे महाराष्ट्र हे जणू हृदय आहे. शेकडो वर्षांची गुलामगिरीच महाराष्ट्राने नष्ट केली व स्वातंत्र्याचा मार्ग खुला केला. परंतु ह्या जातिद्वेष, वर्णश्रेष्ठता वगैरे रोगांनी तो जर्जर झाला होता. त्याला ब्राह्मण्याने हतबल केले होते. त्या सर्वांतून महात्मा फुले यांनी त्याची सुटका केली.

म. फुले यांच्या तपश्चर्येमुळे ब्राह्मण्य जवळजवळ नष्ट होऊन फक्त ब्राह्मणच सर्वत्र दिसत आहेत. त्यामुळे असंख्य ब्राह्मण स्त्रीपुरुष महात्मा फुले यांच्या ध्येयास पाठिंबा देत आहेत.

परंतु काही गोष्टी चमत्कारिक वाटतात. साम्यवादाचे पुरस्कर्ते कॉ. डांगे यांनी एका भाषणात जातिवादाचा पुरस्कार शाहू छत्रपतींनी केला असे सांगितले होते. परंतु लो. टिळकांनी केलेला जातिवादाचा पुरस्कार मात्र त्यांना आठवला नाही. समाजवादाचे पुरस्कर्ते साथी ना. ग. गोरे भागवत-धर्मीय संतांचे समता व समभाव हे कार्य विसरून फक्त समर्थ रामदासांनाच राष्ट्रसंत समजतात. परंतु समता, समभाव व अस्पृश्योद्धार या महत्त्वाच्या प्रश्नांचा उल्लेख रामदासी वाङ्मयात चुकूनहि आढळत नाही. याबाबत धुळ्याचे समर्थभक्त कै. देव हे चरित्र खंड ३ रा पान १४० वर स्पष्ट सांगतात, "चारी वर्ण आणि चारी आश्रम ब्राह्मणाधीन असल्यामुळे एका ब्राह्मण्याचे रक्षण झाले म्हणजे वैदिक धर्माचेच रक्षण झाले असे समजावे असे शंकराचार्यांप्रमाणे समर्थांचे मत होते." अशा गोष्टींकडे श्री. गोरे हे लक्ष देत नाहीत हे आश्चर्य!

## आचार्य अत्रे

म. फुले यांचे खरे एकनिष्ठ भक्त आचार्य अत्रे आहेत. म. फुले यांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्यासाठी त्यांनी म. फुले हा चित्रपट स्वतःच्या हिंमतीवर निर्माण केला. महाराष्ट्रातील बहुजन व अस्पृश्य समाजावर त्यांनी या

द्वारे मोठेच उपकार केले. हल्लीचे काँग्रेस सरकार अस्पृश्योद्धारासाठी लाखो रुपये खर्च करीत आहे. परंतु फक्त आचार्य अत्रे यांचा महात्मा फुले चित्रपट खेडोपाडी दाखविण्याचे केले तर खरा अस्पृश्योद्धार होणार आहे. व समता व समभाव निर्माण होणार आहे. पुणे येथील मार्केटला म. फुले हे नाव देण्यात त्यांचाच पुढाकार होता.

## भूमिपूजन

सध्याचे सरकार धर्मातीत आहे असे सांगितले जाते. परंतु कोणत्याहि बांधकामाच्या सुरुवातीस भूमिपूजन करण्यास नामवंत पुढारी व मंत्री उपस्थित राहतात. अशा वेळी खेड्यापाड्यातील एखाद्या ब्राह्मणास बोलावून त्याच्याकडून विधी करण्यात येतो. ही प्रथा कै. बाळासाहेब खेर यांच्यापासून सुरू झाली असावी. या प्रकारामुळे जमलेल्या लोकात जातिश्रेष्ठतेचे व वर्णश्रेष्ठतेचे बीज पेरले जाते, हे महात्मा फुले यांच्या तत्त्वाविरुद्ध दिसते.

## जागती ज्योत

राष्ट्राच्या हितासाठी निरंतर जागी राहील अशी महान् ज्योत पेटविण्यासाठी म. फुले यांनी खडतर अशी तपश्चर्या प्राणाच्या मोलाने केली. या ज्योतीच्या प्रकाशात जातिऐक्य, धर्मऐक्य, समता, समभाव सार्वत्रिक शिक्षण प्रसार, अस्पृश्योद्धार, व स्वातंत्र्यरक्षण यांचे महत्त्व जनतेस सतत दिसणार आहे.

भगवान बुद्धानंतर समता, समभाव व मानवताधर्म या कार्याच्या निरंतरच्या जागेपणासाठी भारतात सत्यधर्माची ज्योत प्रथमच पेटविणारा फक्त महात्मा फुले !

## आदरांजली

महात्मा फुले यांना दे. भ. रंगनाथराव त्र्यंबकराव रत्नपारखी यांनी पुढीलप्रमाणे आदरांजली वाहून आपला खरा ब्राह्मणपणा व्यक्त केला.

• • •

# म. फुले यांना श्रद्धांजली

(वृत्त : भुजंगप्रयात)

अभिमान वर्णामुळे फार झाला। तिथे उच्च नीचादि हा भेद आला।
कुणी एकमेकां न मानी समान। जगी दुर्दशा भारताची म्हणून ॥१॥
नसावा कधी भेद हा मानवात। नसे शास्त्रआधार मानव्य यात।
रुढी दुष्ट य। तोडणे हाच धर्म। असा दाविला 'जोतिबाने' स्वधर्म॥२॥
असावा जगी देव नी धर्म एक। नसावे वृथा पंथ कोठे अनेक।
तया कारणे यत्न केले सदाही। खरा धैर्यमेरू भिती ज्यास नाही ॥३॥
पुरस्कार केला जनी सत्य ज्याने। किती भोगल्या आपदाही तयाने॥
विरोधी खरा तो असे कर्मठांचा। समाचार घेई रुढिप्रिय त्यांचा ॥४॥
करी फार धिःकार अस्पृश्यतेचा। निदीध्यास त्या असे शिक्षणाचा।
स्त्रिया शूद्र यांचाहि कैवार घेई। असा ध्येयवादी दुजा कोणी नाही ॥५॥
इसाइ न, इस्लाम व्हावे न कोणी। सदा सज्ज ती लेखणी आणि वाणी।
खऱ्या हिंदु धर्मास पाळीत नित्य। इसाअी वृथारोप काही न सत्य ॥६॥
अनुरूप पत्नी ही सावित्रीबाई। पतीला उणे ना पडू देच काही ॥७॥
सतीला किती देऊ मी धन्यवाद। तिची योग्यता थोर हे निर्विवाद।
असे 'गौतमा' सारखे 'जोतीराव'। जनांचा असे त्यावरी पूर्ण भाव॥
'महात्मा' म्हणूनी जगी धन्य झाला। नमस्कार माझा 'फुले' पादुकाला ॥८॥
(अनुष्टुप) 'बुद्धा' नंतर 'महात्मा'। फुले प्रथम भारती॥
तयांचे चरणी माथा। आदरे सर्व ठेविती ॥१॥
माला 'अष्ट' फुलांची ही। कवि विनय गुंफितो॥
भक्तियुक्त मनाने ही। 'जोतीरावा'स अर्पितो ॥२॥

— कवि विनय
(रंगनाथ त्र्यंबक रत्नपारखी, नांदगाव)